# जिंजीवास

अथवा

## छत्रपति राजाराम महाराज

आली जरी कष्ट दशा अपार ॥
न टाकिती धैर्य तथापि थोर ॥
केला जरी पोत बळें शिखाळें ॥
ज्वाला तरी ते वरती उफाळे ॥१॥

भर्तृहरि.



किंमत १। रुपया.





# जिंजीवास

अथवा

# छत्रपति राजाराम महाराज.

ठारें जरी तोडिलें हो वटाला । तरी जोम येई फुटे पाम त्याला ॥
रारे पुन्हा तो नटांचा पसारा । तयें व्यापि आधीं तळप्रांत सारा ॥
टाचे पहा वृक्ष होती अचाट [illegible] व्यापिती देश भोंतीं अफाट ॥

हा ग्रंथ

आजपर्यंत छापून प्रसिद्ध झालेल्या बखरी, कित्येक
इंग्रजी इतिहास व जुनी माहिती
यांच्या आधारानें.

**विष्णु लक्ष्मण काळे,**
अ. मास्तर लं. मि. हायस्कूल बेळगांव
आणि ‘ हिंदुस्थानचा इतिहास ’ व
‘ संगीत उद्योगप्रशंसा ’ यांचे कर्ते.

यांणीं लिहिला
तो

शहापूर येथें
‘ धुंडिराज ’ छापखान्यांत छापिला.



सन १८९३

किंमत १। रुपया.

हा ग्रंथ

श्रीमंत वेंकटराव राजेसाहेब

ऊर्फ

साहेब घो

न मुधोळ

यांस

ावृद्धीविषयीं अभिरुचि, सौजन्य,

द्धि, प्रजावात्सल्य वगैरे

सद्गुणांस लुब्ध होऊन

परवानगीनें

ग्रंथकर्त्यानें कृतज्ञतापूर्वक

अत्यादरें

अर्पण केला आहे.

# प्रस्तावना.

दृष्टं किमपि लोकेऽस्मिन्न निर्दोषं न निर्गुणम् ।
आवृणुध्वमतो दोषान्विवृणुध्वं गुणान् बुधाः ॥ १ ॥

गद्यरूप ग्रंथ लिहून आपल्या महाराष्ट्र भाषेची सेवा करण्याचा हा माझा दुसरा प्रयत्न होय. प्रथम आपल्या देशाचा संक्षिप्त इतिहास लिहून विद्वज्जनसमूहापुढें येण्याचें जें मी धाडस केलें, त्याकामीं मला सुशिक्षित देशबांधवांकडून बरेंच साहाय्य व उत्तेजन मिळाल्यामुळें आजचा हा यत्न करण्यास मला उमेद आली. केवळ इतिहास, स्वकपोलकल्पित कादंबऱ्या किंवा नाटकें लिहिल्यानें जरी ग्रंथसमूहामध्यें भर पडून भाषेला एक प्रकारचें सौंदर्य प्राप्त होतें, तरी प्रस्तुत आपल्या व आपल्या देशाच्या स्थितीकडे पाहिलें असतां ती सुधारण्याचे कामीं मनोरंजक कादंबऱ्या किंवा कंटाळवाणे इतिहास यांच्या योगानें व्हावा तितका उपयोग होत नाहीं. तेव्हां वाचनाची गोडी उत्पन्न करण्यास मनोरंजनासारखा मोहक गुण, आणि दिवसें दिवस आपली आपण ओळख विसरत चालल्यामुळें

अंतःकरणांतील नष्ट होत चाललेला सदभिमान जागृत करणारा पूर्वजांच्या वंद्य कृतींचा इतिहास, ह्या दोहोंचा ज्यांत समावेश होईल अशा प्रकारचीं पुस्तकें आज आपल्यास हवीं आहेत. कारण 'आपले पूर्वज, त्यांचीं अद्भुत कृत्यें, त्यांनीं गाजविलेले पराक्रम इत्यादिकांचें विस्मरण किंवा तत्संबंधानें अनास्था हेंच राष्ट्राच्या पतितकालाचें लक्षण होय' असें जें एका विद्वानानें ह्मटलें आहे, त्याप्रमाणें प्रस्तुत आपली स्थिति झाली आहे. ह्मणून मराठ्यांच्या इतिहासांतील अतिमहत्वाचा व प्रत्येक महाराष्ट्रियानें लक्षांत ठेवण्यासारखा जो काल— ज्यावेळीं औरंगजेबासारख्या कट्टया धर्माभिमानी व महा प्रबल शत्रूनें संभाजीचा वध करून हिंदुपदपादशाहीचें निर्मूलन करण्याचा प्रसंग आणिला त्यावेळीं आपल्यांतील कित्येक बुद्धिमान् व चतुर मुत्सद्यांनीं आणि धाराशूर पुरुषांनीं अकांडतांडव करून हिंदूचें हिंदुत्व राखिलें—त्याचें या पुस्तकांत ऐतिहासिक कादंबरीरूपानें वर्णन करण्याचा मी यत्न केला आहे. आतां तो कितपत साधला आहे व एकंदरीनें भाषासरणी, सन्मार्गदर्शन, रसाविर्भाव वगैरे गुण कसे उतरले आहेत, याचें परीक्षण करण्याचें काम सुज्ञ वाचकांकडे सोंपवितों.

ग्रंथकर्ता.

दुसरी एक गोष्ट माझ्यानें येथें लिहिल्यावांचून राहवत नाहीं; ती ही कीं, हें पुस्तक प्रसिद्ध करण्याचें मुख्य श्रय **श्री० वेंकटराव राजेसाहेब** ऊर्फ **बाळासाहेब घोरपडे** यांजकडे आहे. त्यांजकडून मला एक उंची वस्त्र व बरीच रकम बक्षीस मिळाली. त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी असून त्यांनीं उदार बुद्धीनें आपल्या मराठी भाषेचा जो हा सत्कार केला, तो त्यांच्यासारख्या गुणज्ञ व थोर पुरुषांस खरो-खरच भूषणावह आहे.

हें पुस्तक लिहिण्याचे व छापविण्याचे कामीं मला माझे परम मित्र **रा. रा. अनंत नरसिंह कुलकर्णी** व **रामचंद्र काशिनाथ हळवे** यांणीं जें वेळोवेळीं साहाय्य दिलें त्याबद्दल त्यांचा व हिंदुस्थानी भाषणें लिहिण्यासंबंधानें **साहेब पीरजादे मकानदार** यांचा मी फार आभारी आहें.

**ग्रंथकर्ता.**



# शुद्धिपत्रक.

| पान | ओ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३ | १५ | बारा ... ... | बावीस. |
| ३ | १७ | हात ... ... | फूट. |
| २२ | ४ | त्र्यैलोक्य ... ... | त्रैलोक्य. |
| २४ | २३ | निवटुं ... ... | निवट्टं |
| ३२ | ४ | वयनी ... ... | वहिनी |
| ३४ | २५ | झाल ... ... | झालें |
| ५६ | ९ | वयनी ... ... | वहिनी |
| ९९ | १३ | कळकट ... ... | बळकट |
| १२५ | ८ | दोन तीन ... ... | दोनतीनशें |
| १६९ | २५ | काशिमखाना ... | अलिमर्दिखाना, |
| १७१ | ५ | काशिमखाची ... | अलिमर्दिखानाची |
| १८९ | ११ | राजनीती ... ... | राजनीति |
| १९३ | ८ | दुर्भल ... ... | दुर्लभ |

———०००———

**सूचना**—हें पुस्तक मुदतींत प्रसिद्ध झालें असतें; परंतु कांहीं अनिवार्य अडचणीमुळें दिनावधी करावी लागली याबद्दल व वरील शिवाय या पुस्तकांत आणखी कांहीं चुका राहिल्या असल्यास त्याबद्दल आश्रयदाते क्षमा करतील अशी आशा करितों.

**प्रकाशक.**

# अभिप्राय.

"**जिजिवास**" हें पुस्तक चांगलें साधलें आहे. याची भाषा सरळ असून गोड आहे; आणि प्रसंगवर्णनें चित्तवेधक आहेत. आमच्या देशाचा इतिहास मनांत ठसण्यास अशीं पुस्तकें झालीं पाहिजेत.

ता० ६ जुलई १८९३. } सही-**विनायक कोंडदेव ओक,**
अ. डे. ए. इन्स्पेक्टर, नासिक.

---

"**जिजिवास** अथवा **छत्रपति राजाराम महाराज**" हे पुस्तक वाचून पाहिले. यांतील विषय ज्या काळाचा आहे तो काळ मराठ्यांच्या इतिहासांत फारच महत्वाचा असून त्याचें वर्णन ग्रंथकर्त्यानें फारच चित्तवेधक रीतीनें केले आहे. खरा इतिहास सोडून फक्त देशाभिमान जागृत करण्यासाठींच लिहिलेलीं कांही ऐतिहासिक पुस्तकें अलिकडे प्रसिद्ध होत असतात; परंतु प्रस्तुत पुस्तक कादंबरीरूपाने असूनही तें इतिहासाकडे दुर्लक्ष्य न करिता लिहिलें आहे, हें पाहून मला फार आनंद झाला. पुस्तकाची भाषा चांगली व चटकदार असून कांहीं स्थळें तर उत्तमच साधलीं आहेत. एकंदरींत हें पुस्तक मराठी वाचकांच्या आश्रयास पात्र आहे

ता० १८ जुलई १८९३. } सही-(आनरे.) **विष्णु रघुनाथ नातू,**
बि ए. एल्. एल् बी.

---

"**जिजिवास**" या नांवाची ऐतिहासिक कादंबरी वाचून पाहिली. शिवाजी महाराजाच्या पश्चात् मराठी राज्यावर जे घोर प्रसंग आले त्यांतून मराठ्यांनी मोठ्या युक्तीनें, प्रसंगोचित् पराक्रमानें, ऐक्यानें, स्वराज्याभिमानानें आणि सतत परिश्रमानें औरंगजेबासारख्या मोठ्या कारस्थानी व पराक्रमी पुरुषाशीं टक्कर देऊन राजाराम महाराजाकरवीं मराठी राज्याची कसकशी उभारणी केली याचें चांगलें मनोहर वर्णन यांत दिलें आहे. तेव्हां "महाराष्ट्र" या नांवाचा अभिमानी अशा प्रत्येक मनुष्यानें हें पुस्तक वाचण्यासारखें आहे.

ता० २० जुलई १८९३ } सही-**रामचंद्र भिकाजी गुंजीकर,**
अ. डे. ए. इन्स्पेक्टर, बेळगाव.

"**जिजिवास** अथवा **छत्रपति राजाराम महाराज**" या नांवाचें पुस्तक अभिप्रायाकरितां आलेलें समग्र वाचून पाहिलें. पुस्तकाची रचना चांगली असून भाषाही सरळ आहे. एकंदरींत हें पुस्तक वाचण्यासारखें आहे व संभाजीच्या मरणानंतर जीं दहा वर्षे गेलीं त्या कालाचा यथार्थ इतिहास सर्वांनीं ध्यानांत धरण्यासारखा आहे.

ता० २० जुलई १८९३ } सही–(आनरे.) **महादेव गोविंद रानडे,** सि. आय्. ई एम्. ए. एल्. एल्. बी.

---

"**जिजीवास**" या नांवाचें ऐतिहासिक कादंबरी स्वरूपाचें पुस्तक अभिप्रायार्थ मजकडे आलेलें मी समग्र वाचून पाहिलें, व मला तें बहुत आवडलें. ग्रंथकर्त्यानें मराठी भाषा फारच चटकदार लिहिली असून ठिकठिकाणीं व विशेषत: ब्रह्मनाळच्या स्वामीसंबंधीं लिहितांना व प्रल्हादपंत, खंडो बल्लाळ यांचे वर्णन करितांना भाषा इतकी मनोवेधक, उत्साहजनक व स्फूर्तिकारक आहे कीं, ती वाचतांना कोणाचेंही अंत:करण सद्गदित झाल्यावांचून व उच्च आणि महत्वाच्या आवेशानें व सद्भिमानानें भरल्यावांचून राहणार नाहीं. एकंदरींत अशा लिहिण्याचा नवीन पिढीवर कांहीं तरी सत्परिणाम व्हावा, असें मला वाटतें; व ह्मणूनच हें पुस्तक लोकाश्रयास पात्र आहे.

ता० २० जुलई ८९३ } सही–**श्रीधर गणेश जिनसीवाले,** एम्. ए.

---

"**जिजीवास**" हें पुस्तक समग्र वाचून पाहिलें. पुस्तकाची रचना चांगली असून भाषा सरळ व जोरदार आहे. स्वदेशाभिमान, स्वधर्मप्रीति, कर्तव्य जागरूकता, निस्सीम स्वामिभक्ति, शौर्य, धैर्य वगैरे जे अनेक उदात्त गुण पूर्वीच्या लोकांचे ठिकाणीं पुष्कळ अंशानें वास करीत होते, त्यांची जागोजागीं सुरेख उदाहरणें दिलेलीं आहेत. प्रल्हाद निराजी, संताजी घोरपडे, रामचंद्रपंत बावडेकर वगैरे ब्राह्मण व मराठे वीर पुरुषांनीं एकदिलानें त्या महापुरुषाचे (शिवाजीचे) मरणानंतर बहुतेक अंशीं लयास गेलेल्या मराठी राज्याचें पुनरुज्जीवन करण्याकरितां किती जिवापाड श्रम केले

त्याचें हुबेहूब चित्र सदहू पुस्तकांत दाखविलें आहे. अशा प्रकारच्या ऐतिहासिक पुस्तकांची सांप्रत किती अवश्यकता आहे हें सांगावयास नकोच. अशीं पुस्तकें वाचल्यानें हल्लीं सर्वस्वी नष्ट झालेला स्वाभिमान थोड्या अंशानें तरी जागृत होईल.

ता० २७ जुलई १८९३. } सही—**बळवंत रामचंद्र सहस्रबुद्धे**, बी. ए.
प्रिन्सिपाल. ट्रे. कॉलेज, पुणे.

---

"**जिंजीवास**" या नांवाचें अभिप्रायार्थ आलेलें पुस्तक समग्र वाचून पाहिलें. तें फारच मनोरंजक असून भाषा कित्येक ठिकाणीं तर इतकी चटकदार आहे कीं, ती वाचतांना अंतःकरण सद्गदित होतें. प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत, संताजी, खंडोबल्लाळ, धनाजी वगैरे पुरुषांच्या निस्सीम स्वामिभक्तीचें तर यांत हुबेहूब चित्र रेखिलें आहे. एकंदरींत हें पुस्तक वाचनीय असून लोकाश्रयास खरोखर पात्र आहे.

ता० ३१ जुलई १८९३. } सही—**बी. एच. भिडे**. बी. ए.
प्रिन्सिपाल. ट्रे. कालेज. धुळें.

---

"**जिंजीवास**" या नांवाचें आपण अभिप्रायार्थ पाठविलेलें पुस्तक समग्र वाचून पाहिलें. यांत संभाजीच्या वधापासून साताराच्या गादीची स्थापना होईपर्यंत राजारामाच्या कारकीर्दीचें वर्णन एकंदरींत सुरेख वठलें आहे. मराठ्यांच्या इतिहासांत राजारामाची कारकीर्द विशेष स्मरणीय आहे; कारण ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांनीं जुटीनें वागून आमच्या देशाचें स्वातंत्र्य राखिलें व त्यामुळें औरंगजेबासारख्या बादशहास मनोरथ पूर्ण न होतां मरावें लागलें. आपल्या पुस्तकासारखीं आणखीं पुस्तकें होऊन शाहूस राज्याभिषेक होईपर्यंतच्या काळांतील थोर पुरुषांची माहिती आपल्या देशांत अधीक पसरली पाहिजे. आपण या कामास आरंभ करून एकदांची दिशा दाखविलीत. आतां त्या दिशेनें दुसरे ग्रंथकार जातील अशी मला आशा आहे.

ता० २।८।९३. } सही—**राजाराम रामकृष्ण भागवत**.
स. झे. कॉलेज मुंबई.

'**जिंजीवास**' या नांवाचें पुस्तक समग्र वाचून पाहिलें. याची भाषा फारच गोड व हुरुप आणणारी असून विषयाची रचनाही उत्तम साधली आहे. **संभाजी**च्या मागें संपूर्ण महाराष्ट्रीयांवर जो आणीबाणीचा प्रसंग येऊन गुदरला होता, तशा राज्यक्रांतीच्या प्रसंगीं आपल्यांतील कित्येक विलक्षण बुद्धीच्या व शूर पुरुषांनी जी करामत दाखविली व एकीच्या आणि राजनिष्ठेच्या जोरावर मोंगलासारख्या प्रबल शत्रूस खालीं पहावयास लाविलें, त्याचें या पुस्तकांत हुबेहुब चित्र रेखिलें गेले आहे, यांत संशय नाहीं. ग्रंथकर्त्याचा वर्णन करण्याची शैली फारच खुबीदार असल्यामुळें पुस्तकांतील कोणताही भाग वाचूं लागलें तरी अंतःकरणावर त्याचा ठसा उमटल्या वांचून राहत नाहीं. ही **राजारामा**ची कारकीर्द इतकी महत्वाची आहे कीं, ती प्रत्येक महाराष्ट्र बंधूनें व विशेषें करून आपल्यास 'मराठा' असें म्हणविणाऱ्या प्रत्येक मनुष्यानें अगत्यपूर्वक वाचून पहावी. दिवसेंदिवस आंगीं मुरत चाललेला शिथिलपणा नाहींसा होऊन स्वाभिमान जागृत होण्यास या तोडीचीं पुस्तकें आपल्या भाषेंत झालीं पाहिजेत.

ता. १५ जुलई १८९३ | **शंकर रामचंद्र फातरफेकर** बी. ए.
फ. अ. मा. लं. मि. हायस्कूल बेळगांव.

At the Author's request, I have carefully read his book styled. "*Jinji Was*" or the stay of Rajaram at the celebrated fort of Jinji, in the Carnatic.

This is the most glorious period of Maratha history — a period in which so many of the sons of Maharashtra nobly rose superior to considerations of a personal nature The deeds of such men and the events of such a period yield themselves readily as all engrossing subjects for historical novels, which in their turn, impress them on the minds of the readers in a far stronger and favourable way than mere historical works can do As such we welcome the Jinjiwas heartily. The book is written in an easy and engaging style and contains much historical information which is not usually within reach of ordinary readers of Maratha history. The book well deserves the patronage of the Maratha reading public.

RAO BAHADUR N. J. KIRTANE.
Poona

22nd August 1893.

# जिंजीवास.

## अथवा

# छत्रपति राजाराम महाराज.

### उपक्रम

न यत्र स्थेमानं दधुरतिभय भ्रांतनयना *
गलद्दानोद्रेकभ्रमदलिकदंबाः करटिनः ।
लुठन्मुक्ताभारे भवति परलोकं गतवतो
हरेरद्य द्वारे शिव शिव शिवानां कलकलः॥

भामिनीविलास.

**नर्मदा** व **महानदी** यांच्या दक्षिणेस **कन्याकुमारी**पर्यंत चिंचोळा होत गेलेला जो विस्तीर्ण भूप्रदेश, तें **दक्षिणहिंदुस्थान**. ह्याच्या वायव्येकडील भागास **महाराष्ट्र** असें ह्मणतात. ह्या **महाराष्ट्राचे कोंकण** व **देश**, असे निरनिराळे दोन भाग आहेत. त्या दोहों भागांमध्यें जी दक्षिणोत्तर लांबचलांब डोंगराची ओळ दिसते, तो **सह्याद्रिपर्वत**.

---

* ज्या गुहेपुढें आलें असतां मदोन्मत्त हत्तींनीं भय पावून क्षणभरही तेथें न ठरतां दूर पळून जावें, जींत हत्तीच्या गंडस्थळांतील मोत्यांचा खच पडला आहे, त्याच सिंहाच्या गुहेंत आतां भालूंची गर्जना ऐकूं येते. शिव शिव !!

ह्या पर्वतावरील कित्येक शिखरें समुद्राच्या सपाटी-पासून इतकीं उंच आहेत कीं, तेथून **कोंकण** व **देश** ह्या दोहों प्रदेशांची रमणीय शोभा एक समयावच्छे-देंकरून दृष्टीस पडते. मावळत्या अंगास पहावें तों, **भगवान् परशुराम** याच्या चरणसंयोगानें पवित्र झालेली ती वालुकामय चिंचोळी **कोंकणपट्टी** दिसूं लागते. तिज-वरील उंच सखल टेंकड्यांची उधळलेली गर्दी, दऱ्या-खोऱ्यांचे भयाण प्रदेश, व डोळे फिरावयाजोग्या मो-ठाल्या खोल ओघळी, यांच्या देखाव्यानें नजर थक्क होऊन जाते. दूर क्षितिजावर दिसणारी ती समुद्रोद-काची चित्रविचित्र कांति पाहून अंतःकरण आल्हादि-त होतें. कित्येक पर्वतराजींपासून तुटलेले अजस्र कडे, त्यांजवरून दोनदोन तीनतीन हजार हात खोलीच्या खोऱ्यांमध्यें धडाधड उड्या घेणाऱ्या नद्या, आणि त्यां-चीं सर्पाकृति लवणें दृष्टीस पडलीं ह्मणजे तर,

**विविधकामहितः सहितांभमः ।**
**स्फुटसरोजवना जवनानदीः ॥**

या **भारवि** कविवचनाची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं. असो.

याप्रमाणें सृष्टिसौंदर्याचें वसतिस्थान व कविकुल-बुद्धिवैभवाचें माहेरघर असा जो हा पर्वतराज **सह्याद्रि** त्याजवर जागोजाग मेघमंडलानें व्याप्त अशीं अनेक शिखरें आहेत. तशा त्या उंच व अवघड ठिकाणीं **सिं-हगड, प्रतापगड, रायगड, पन्हाळा, विशाळगड** वगैरे इतिहासप्रसिद्ध असे अनेक धुरंधर किल्ले बांधिले

गेले आहेत. ते शैलवीर स्वपराक्रमेंकरून आज हजारों वर्षे एकसारखें संपूर्ण महाराष्ट्राचें संरक्षण करीत असल्यामुळें आतां अगदीं थकून गेल्यासारखे दिसतात. प्रस्तुतकाळीं त्यांना प्राप्त झालेली ती दुर्धरावस्था व तें त्यांचें केविलवाणें स्वरूप ह्यांकडे पाहिलें ह्मणजे, पूर्वी शिवछत्रपतीचा भगवाझेंडा ज्यावेळीं त्यांच्या तटावर फडकत होता, व सकलगुणैश्वर्यमंडित महाराष्ट्रियांची राजवधू त्यांच्या अंकावर लोळत होती, त्यावेळचें तें त्यांचें वैभव व त्यांस शोभविणारीं तीं त्यांचीं प्राकारादि भूषणें यांची आठवण होऊन मन सखेदाश्चर्य भरित होतें इतकेंच नव्हे, तर शिरोभागीं लिहिलेल्या श्लोकाची सत्यता मनांत बिंबून कालमहिमा अतर्क्य आहे, असें ह्मणावें लागतें.

वर निर्दिष्ट केलेल्या किल्ल्यांपैकीं **रायगड** हा किल्ला **पुणें** शहराच्या नैर्ऋत्यभागीं सुमारें बारा कोसांवर आहे. तो ज्या पर्वताच्या सुळक्यावर बांधिला आहे, त्याची उंची समुद्राच्या सपाटीपासून सुमारें तीन हजार हात आहे. त्याच्या माथ्यावर पूर्वपश्चिम अदमासें पाउण कोस, व दक्षिणोत्तर अर्धकोस, एवढी सपाट जागा आहे. तेथें ह्या किल्ल्याची रचना असल्यामुळें पूर्व, पश्चिम व दक्षिण ह्या बाजूंवरील तुटलेल्या भयंकर कड्यांनींच त्याचा स्वाभाविक तट बनून गेला आहे. फक्त वायव्येकडील कांहीं भाग मात्र बांधिलेला दिसतो. ह्या किल्ल्यास पूर्वी **रायरी** असें ह्मणत. इसवी सनाच्या बाराव्या शतकांत एकदां हें ठाणें कित्येक मराठे सर-

दारांच्या ताब्यांत होतें. पुढें विजयनगरकरांनीं तेथें कांहीं कालपर्यंत आपली सत्ता स्थापिली होती. पण सोळाव्या शतकाच्या सुमारास जेव्हां त्यांच्या राज्याचा जोम मोडत जाऊन महंमदीलोकांचे चांद दक्षिण हिंदुस्थानभर हुतुतु घालूं लागले, तेव्हां ती बळकट जागाही त्यांच्या ताब्यांत गेली. तथापि, त्या ठिकाणीं पुनः एकवार मराठ्यांची नौबत झडावी असा योगायोग असल्यामुळें, सत्राव्या शतकाच्या आरंभीं तेथें स्वातंत्र्य सुखाचें वारें पुनः वाहूं लागलें. शिवाजीसारखा हिंमतदार धनी व मावळ्यांसारखे त्याच्या अर्ध्या वचनांत वागणारे विश्वासु सेवक, यांचा महाराष्ट्रांत उदय होतांच, सन्न सोळाशें अठ्ठेचाळीसांत रायगडचें स्वामित्व परत मराठ्यांच्या हातीं आलें. तेव्हांपासून त्या स्थळाचें महत्व वाढत जाऊन तेथें स्वराज्यवैभव पूर्ववत् नांदूं लागलें. येसजी, तान्हाजी सारख्या पराक्रमी पुरुषांच्या समागमानें, व साधुश्रेष्ठ रामदासासारख्या सत्पुरुषांच्या चरणधूलीनें तें स्थल धन्यता पावलें. शेवटीं छत्रपति शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकोत्सवानें तर रायगडचें नांव जगाच्या इतिहासांत कायम होऊन बसलें. पुढें शिवछत्रपतीचा काल झाल्यावर देखील कांहीं कालपर्यंत त्या किल्ल्याचें संगोपन मराठ्यांच्या हातून घडत होतें, व त्याच्या तटावर भोंसले घराण्याचा विजयध्वज फडकत होता.

आज सुमारें दोनशें वर्षें होऊन गेलीं. त्यापूर्वी एके दिवशीं अस्तमानकालीं आकाशाचे तांबडे, पांढरे, जां-

मळे, निळे इत्यादि रंग एकवटून गेल्यामुळें त्यांपासून परावर्तन पावलेल्या सूर्यकिरणांच्या योगानें **रायगडा**वरील उच्च प्रदेशास विलक्षण शोभा प्राप्त झाली होती. पर्वतराजींवरील तरुवरांवर पसरलेले आपले कोमल कर आटोपून **दिनकर** अस्ताचलास चालल्यामुळें सभोंवतालचा सर्व वनप्रदेश फारच रमणीय दिसत होता. तशांत वसंतऋतूची छबी नुकतीच निघाल्याकारणानें वनांतील संपूर्ण लतावृक्ष नूतन पल्लवांकुरांनीं सुशोभित होऊन ते फुलं लागले होते. प्रदोषकालच्या शीतल वायूच्या मंदमंद वाहणाऱ्या झुळकीबरोबर त्या विकसित पुष्पांचा सुगंध एकवटून जाऊन त्याच्या घमघमाटानें दशदिशा भरून गेल्या होत्या. भक्ष्य शोधण्याकरितां दूरवर गेलेले पक्ष्यांचे कळप भराऱ्या मारीत आसमंतात् भागच्या वृक्षांवरील घरट्यांकडे धांव घेत होते. व्याघ्र, कोल्हे, तरस, डुकर, लांडगे इत्यादि निशाचर हिंसक पशु, दऱ्याखोऱ्यांतील आपआपल्या गुहांमधून बाहेर पडण्याच्या घाईत होते; गुरें चारीत पर्वताच्या खालच्या प्रदेशीं उतरलेले गुराखी परत गुरें हांकून वर चढण्याच्या बेतांत होते. अशा वेळीं, कोणीएक तरुण पुरुष किल्ल्याच्या उतरणीवरील प्रदेशाची शोभा पहात तटावर उभा होता.

त्याच्या शरीराचा बांधा जरी लहानसर होता, तरी त्याची एकंदर आंगलट कसदार दिसत होती. वर्ण काळसांवळाच, पण डोळे पाणीदार असून त्याच्या मुखश्रीवर सौजन्य, धूर्तता, शहाणपण इत्यादि गुणांचें

तेज झळकत असल्यामुळें ती टवटवीत दिसत होती. ओंठावरील अद्याप अव्यक्त दिसत असलेल्या मिसरुडीवरून त्याच्या वयाचें अनुमान करणें फारसें कठीण नव्हतें. अशा त्याच्या गुलजार व मोहक चेहऱ्याकडे पाहिलें ह्मणजे प्रथमदर्शनीं तो मोठा आनंदी प्राणी असावा असें वाटे; पण लक्षपूर्वक अवलोकन केलें असतां त्याच्या चित्तवृत्तीवर किंचित् औदासीन्याची छाया दृष्टीस पडत होती. त्यावरून त्याच्या अंतःकरणांत कांहीं मानसिक व्यथा डांचत असावी, असा सहज तर्क होई. त्याचा पोषाख अगदीं साधाच होता. पण आंगांत घातलेल्या शिलेदारी अंगरख्याबाहेर गळ्यांतील मोत्याच्या कंठीचे कित्येक पदर अस्ताव्यस्त रीतीनें पडलेले दिसत असल्यामुळें तो कोणी थोरामोठ्यांच्या कुलांतील असावा, असें वाटे. त्याच्या जवळच एक पोक्त मनुष्य त्याच्याशीं मोठ्या आदबीनें बोलत उभा होता. त्याचा पोषाख ह्मटला ह्मणजे, आंगांतील रूदार अंगरखा, तंगदार चाळणा, पीळदार तांबडी पगडी व कंबरेस घट्ट गुंडाळलेलें पांच हात लांबीचें एक वस्त्र अशीं एकंदर साडेतीन वस्त्रें होतीं. त्याच्या पायांत जुन्या चालीची दांडगी वहाण असून डाव्या हातांत वजनदार असें एक चांदीचें लठ्ठ कडें होतें. उजव्या हातांत कंबरेपासून जमिनीपर्यंत लटकणारी अशी लांब व वरून बनातीचें म्यान असलेली तरवार दिसत होती. असा हा सेवक आणि त्याचा तरुण धनी उभयतां कांहीं वेळपर्यंत परस्परांशीं भा-

षण करीत तटावर उभे आहेत तों एकाएकीं खाड्खाड् असा शद्ब दुरून त्यांच्या कानीं पडला. ते इकडे तिकडे पाहूं लागतात तों खालच्या मार्गानें कोणी एक घोडेस्वार आपल्या थकून गेलेल्या घोड्यास टांचा हाणीत किल्ल्यावर चढून येत आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. फार दुरून आल्यामुळें वाटेच्या श्रमानें व उन्हाच्या तापानें थकून जाऊन त्या स्वाराचा जीव अगदीं टेंकीस आला होता. घोड्याच्या आंगाचें तर पाणीपाणी होऊन तोंडावाटें एकसारखा फेंस गळत होता. पण जवळ तसेंच कांहीं जरूरीचें टपाल असल्यामुळें जनावराकडे किंवा आपल्या जिवाकडे न पाहतां तो स्वार मोठ्या झपाट्यानें किल्ल्याच्या दरवाजाजवळ येऊन पोंचला. पुढें तो आंत वळून आपला घोडा भरधांव टाकीत राजवाड्याकडे निघाला असें पाहतांच वर सांगितलेला सेवक आपल्या तरुण यजमानास ह्मणतो, "महाराज, खचीत, थोरल्या महाराजांकडील कांहीं वर्तमान आलें असावेंसें वाटतें. तो पहा, तो घोडेस्वार राजवाड्याकडे वळला. तर चला, आपणही आतां तिकडेसच जाऊं, ह्मणजे काय आहे तें समजेल." असें ह्मणून ते उभयतांही तटावरून खालीं उतरून वाड्याकडे निघाले.

---



# भाग २ रा.

---o:o---

॥ खलःकरोति दुर्वृत्तं नूनं फलति साधुषु ॥

प्रि॰ रत्नावली.

आह्मां महाराष्ट्रियांच्या अल्पकालीन स्वातंत्र्यसुखाचें केवळ निधान, व भोंसल्यांच्या कुलाचें खरें भूषण अशा शिवछत्रपतीवर दुष्ट मृत्यूनें घाला घातल्यामुळें पुढें राजव्यवस्था कशी करावी, असा पदरच्या मंडळीस मोठा विचार पडला. वडील पुत्र संभाजी यांस गादीवर बसवावें तर त्याच्या हातून राज्याचें रक्षण व्हावयाचें नाहीं, असें शिवाजी महाराजांनीं आपल्या अंतकालीं सांगितलें होतें. बरें, महाराजांच्या आज्ञेप्रमाणें त्यांचा धाकटा पुत्र राजाराम यास गादीवर बसवून राज्यकारभार चालवावा तरी कठीण. कारण संभाजीची प्रकृति आधींच तापट; त्यांतून त्याचा हा असा अपमान झाला ह्मणजे मग तर कोणत्या वेळीं कोणावर कसा प्रसंग येईल याचा नेम लागणार नाहीं, अशी सर्वांस भीति वाटत होती. तेव्हां एकीकडून आड आणि एकीकडून विहीर अशी अडचण येऊन पडल्यामुळें प्रधानमंडळास मोठीच काळजी उत्पन्न झाली. पण मोरोपंत ( मुख्यप्रधान ) अण्णाजी दत्तो वगैरे प्रमुख प्रमुख मुत्सद्दी एकत्र जमून त्यांनीं विचार केला कीं, कांहींही होवो, पण याप्रसंगीं न डगमगतां सर्वा-

**ळीं** एकविचारें वागून **महाराजांच्या** इच्छेप्रमाणें **रा-जारामास** गादीवर बसवायचेंच. राज्याभिषेक होईप-र्यंत **महाराजांच्या** मरणाची वार्ता बाहेर फुटूं न देण्याविषयीं योग्य बंदोबस्त करून एकदां कार्य-भाग उरकला ह्मणजे पुढें पाहतां येईल, असा विचार करून मंडळींनीं **सोयराबाई साहेबांच्या** ( राजारा-माची आई ) मसलतीनें राज्याभिषेकाची गुप्त रीतीनें तयारी चालविली.

ह्यावेळीं **संभाजी** पन्हाळ्यावर होता. त्याला **शिवाजी महाराजांनीं** आपण जिवंत असतांच त्या-च्या दुर्वर्तनाबद्दल तेथें प्रतिबंधांत ठेविलें होतें. तेथें ही **महाराजांच्या** मरणाची वार्ता कळूं न देण्याविषयीं मंत्री मंडळानें जरी बरीच खबरदारी घेतली होती तरी वरील राजकारण शेवटास जाण्यापूर्वींच सेनानायक **हंबीरराव** व **सरनौबत** यांच्या द्वारें तें **संभाजीस** समजली. कारण, **हंबीरराव** मंत्रीमंडळाच्या राज-कारणास जरी अनुकूल आहे असें वरपांगीं दिसत होतें, तरी त्याचें अंतरंग **संभाजीकडे** होतें. **संभाजी** आधींच रागीट, त्यांत हें पदरच्या मंडळींचें कृष्णका-रस्थान त्याच्या कानीं पडतांच तो वाघासारखा खवळून गेला. पण अंतःकरणांत धुमूं लागलेला तो क्रोधाग्नि एकाएकीं बाहेर पडूं न देतां, प्रथम गोडगोड बोलून त्यानें किल्ल्यावरील लोकांचें मन वश करून घेतलें, मग युक्तीनें प्रतिबंधांतून सुटून तो एकदम **करविरीं** उतरला. तेथील कित्येक लोक बरोबर घेऊन त्यानें थेट

**महाडची** वाट धरिली. **कऱ्हाडापाशीं** येतो तों पूर्व संकेतानुरूप **हंबीरराव** फौजेसह येऊन त्याला भेटला. याप्रमाणें फौजबंद होऊन ते उभयतांही एकाएकीं **रायगडीं** दाखल झाले. त्यांना पहातांच किल्ल्यावरील मंडळी घाबरली. **संभाजीनें** प्रथमदर्शनीं मुख्य मुख्य मुत्सद्दी मंडळींच्या घरीं चौकीपहारे बसवून त्यांस कैद केलें, आणि आपला सावत्रबंधु **राजाराम** याला पकडून वाड्यांतच नजरबंद करून ठेविलें. नंतर आपल्या विरुद्ध कटांत सामिल असलेल्या इतर लोकांस भयंकर शिक्षा देण्याविषयीं हुकूम फर्मावून त्यानें कित्येकांचे निर्दयपणें डोळे काढविले, कित्येकांच्या घशांत शिशाचा रस ओतून त्यांचे प्राण घेतले, कित्येकांस हत्तीच्या पायीं देवविलें, कित्येकांचे कडेलोट करविले व कित्येकांचा भयंकर रीतीनें वध करविला. इतकें करूनही तो **उग्रनारसिंह** शांत झाला नाहीं. आपली सावत्र आई **सोयराबाई** इचा त्याला अद्याप सूड घ्यावयाचा होताच. त्यानें त्या निरपराधी साध्वीचा नानाप्रकारें छळ करून शेवटीं ‘ हे चांडाळिणी, तूं राज्यलोभास्तव **आबासाहेबांस*** विषप्रयोग करून त्यांचा प्राण घेतलास ’ असा तिजवर वृथा आरोप ठेवून **राजारामा**देखत तिला भिंतींत चिणून जिवें मारिलें. अशा प्रकारें आरंभिलेल्या **नरमेधाची** समाप्ति झाल्यावर, **संभाजीनें** मोठ्या थाटामाटानें आपल्यास राज्याभिषेक करून घेतला.

---

* शिवाजी महाराजांस आबासाहेब असें ह्मणत असत.

पहा, नशिबाची सलाबत किती अजब आहे ती! ' ज्याचे आंगीं मोठेपण ॥ तया यातना कठीण ' असें ह्मणतात तें कांहीं खोटें नव्हे. जो **राजाराम** कांहीं तासांपूर्वी पदरच्या **अष्टप्रधानादि** मंडळींच्या भावी सुखाचा कंद होऊन संपूर्ण वैभवाचा उपभोग घेत होता, तो एका निमिषार्धांत पारतंत्र्याच्या स्वाधीन होऊन दैन्य कंठूं लागला. बरें, एवढ्यानें तरी त्याच्या कर्मदशेची पाळी फिटली काय! नाहीं. मातृविरहदुःख, आणि आपल्या डोळ्यांदेखत तिला भोगाव्या लागलेल्या यमयातना यांचें ताट त्याच्यापुढें वाढून तयार होतेंच. मातेला भोगाव्या लागत असलेल्या त्या असह्य यातना पाहून, व काळीज करपून टाकणारा तो तिचा दीन स्वर ऐकून, प्रत्यक्ष पोटीं जन्म घेतलेल्या **राजारामाची** काय अवस्था झाली असेल, याची कल्पना करण्याचें काम आह्मीं वाचकांकडेसच सोंपवितों. कारण, त्या हृदयद्रावक देखाव्याचें हुबेहुब चित्र रेखण्यास हें मतिमंद कलम समर्थ नाहीं.

असो. आठवण होतांच काळीज धडाडून टाकणारें तें मातृविरहदुःख **राजाराम** मरेपर्यंत विसरला नाहीं. वैऱ्यावरही येऊं नये, अशा त्या दुष्ट प्रसंगाचें स्मरण झालें ह्मणजे तो अगदीं वेडा होऊन जाई. असो. "**आलिया भोगासि असावें सादर । देवावरि भार घालूनियां**" या संतवचनाप्रमाणें प्राप्त झालेल्या कालगतीस पाठ देऊन **राजाराम** कैक दिवस पारतंत्र्य दुःख भोगीत होता. पण तशा अवस्थेंतही त्याचा

मनमिळाऊपणा, त्याचा सोशिक स्वभाव, नम्र भाषण व लीनपणाचें वर्तन पाहून वाड्यांतील बहुतेक मंडळी त्याजवर प्रेम करी. मग तर, **संभाजी संगमेश्वरीं** राहूं लागल्यापासून **राजारामाची** कैदही कमी होत गेली. **संभाजीची** स्त्री **येसूबाई** व पुत्र **शिवाजी** ( पुढें **शाहू** या नांवानें उदयास आलेला ) हीं उभयतां **रायगडींच** होतीं. त्या मायलेंकरांशीं **राजाराम** पूर्वींपासून सापत्नभाव मनांत न आणितां प्रेमानें वागत असल्यामुळें तींही त्याजवर ममता करीत असत. ह्या वेळीं **शिवाजीचें** वय केवळ सहा वर्षांचें होतें. त्या आपल्या **पुतण्याचें** गोजिरवाणें मुख पाहून व त्याचे बोबडे बोल ऐकून **राजारामानें** नेहमीं त्याचें कौतुक करावें, आणि आनंद मानावा. **शिवाजीनेंही** आपल्यावर जीवप्राण करणाऱ्या **चुलत्याला** विसंबून क्षणभर देखील दूर राहूं नये. असें तें त्या **चुलत्यापुतण्यांचें** विलक्षण प्रेम पाहून वाड्यांतील एकंदर मंडळीस व मुख्यत्वेंकरून **येसूबाईस** फार संतोष वाटे.

तिकडे **संगमेश्वरीं संभाजीस कलुषानें** अगदीं घेरून सोडल्यामुळें तो केवळ वेडा पीर बनून गेला होता. त्याला स्त्रीपुत्राची देखील आठवण होऊं नये, अशी त्याची बेफाम स्थिति होऊन गेली. सुरा ही त्याची आराध्य देवता, व तो तिचा निःसीम भक्त, इतकी अवस्था झाल्यावर मग त्याला कोठची स्त्री, कोठचा पुत्र आणि कोठचें काय! खुद्द राजाची अशी दशा झाल्यावर मग राज्याची अनास्था तर पुसावयासच

नको. जिकडे तिकडे अनीतीचा बाजार भरून दुराचारानें आपलें भयंकर स्वरूप प्रकट केलें. मुलुखाची शिस्त बिघडत जाऊन सर्वच बलबलपुरी माजली. कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं, असें होऊन राज्याचीं बंधनें शिथिल पडत चाललीं. मराठी राज्यावर दुर्दैव ओढवणार, त्याप्रमाणें सर्व गोष्टी जुळून आल्या. **औरंगजेब** मराठी राज्याचीं पाळेंमुळें खणून टाकण्याची संधी पहातच होता. 'हिरवें खाणारास भाजलेलें मिळाल्यावर' मग काय पुसावयाचें! **संभाजी** व त्याचा मुख्य प्रधान **कलुषा** हे उभयतांही निश्चितपणें रंगेलाल होऊन **संगमेश्वरीं** मजा मारिताहेत असें ऐकतांच बादशहानें **तकरीबखानास** फौजेसहवर्तमान तिकडे पाठविलें. तो मोगल सरदार मोठा धूर्त व मतलबी असल्यामुळें **संभाजी** व **कलुषा** हे उभयतां मदिरा सेवनानें गुंग होऊन पडले आहेत अशी संधि साधून त्यानें राजवाड्यास एकदम वेढा दिला, व मोठ्या दक्षतेनें आपली कामगिरी बजाविली. राजा व प्रधान या उभयतांस कैद करून त्यानें **तुळापुरीं** बादशहाची छावणी होती तेथें पाठविलें.

ती दुःखकारक बातमी **रायगडीं** पोंचतांच तेथील एकंदर मंडळींच्या तोंडचें पाणी पळालें. कोणास कांहीं सुचेना, आतां हें संकट टळतें कसें, व महाराजांची मुक्तता होते कशी, या गोष्टीकडे सर्वांचे डोळे लागले. सर्वांनीं मिळून विचार केला; पण कोणतीच मसलत साध्य होईलसें वाटेना. **येसूबाईचा** जीव तर काळजीनें अगदीं

झुरणीस लागला. तिला अन्नपाणी देखील गोड लागेना. पति कितीही अनीतिमान् किंवा दुर्व्यसनी असला, तरी पतिव्रतेला विरहदुःख झाल्याविना कधींच रहावयाचें नाहीं. **येसूबाईची** ती अवस्था, व आपल्या शूर पित्यापागें मराठी राज्याची ही उडालेली दैना पाहून **राजारामाचा** जीव तडफडे. रात्रंदिवस त्याला चैन पडेना. पण करतो काय? कालचक्राच्या फेऱ्यांत सांपडून "**वाहील्या उद्वेग दुःखची केवळ। भोगणें तें फळ संचीताचें**" अशी त्याची अवस्था झाली होती. कांहीं केलें तरी मनाची हुरहुर कमी होईना. तेव्हां क्षणभर कोठें तरी एकीकडे जाऊन मनाचें औदासीन्य घालवावें, अशा हेतूनें एके दिवशीं संध्याकाळीं **राजाराम** आपला विश्वासु सेवक **भक्ताजी** यासहवर्तमान किल्ल्याच्या तटावर जाऊन तेथें खालच्या प्रदेशाची रमणीय शोभा पहात उभा राहिला होता.

इकडे वाड्यामध्यें मागील चौकीं **येसूबाई** चिंताकुल होऊन नेहमीं प्रमाणें आपल्या दासींबरोबर बोलत बसली होती. "**बाईसाहेब**, आपणच जर धीर सोडून रात्रंदिवस अशा काळजी करीत बसलांत तर मग आमच्या सारख्यांनीं आपल्याला काय सांगायचं! '**मनीं वसे तें स्वप्नीं दिसे**' असें ह्मणतात तें कांहीं खोटें नाहीं. स्वप्नें हीं सदोदित पडतच असतात; त्यांतून दुःस्वप्नांचा दाखला तर नेहमीं चांगलाच येतो. संकटें येत नाहींत तीं कोणावर? आणखी, राजे ह्मटले ह्मणजे त्यांच्यावर तर असे हजारों प्रसंग यावयाचेच. आपले **थोरले**

**महाराज** नाहींत का कित्येकदां **शत्रूंच्या** तावडींत सांपडले होते ? पण आई **भवानीच्या** कृपेनें त्यांना सर्वदां यशच आलें. ती आपली पाठराखी आहेच. ती **महाराजांस** सुखी ठेवून आलेल्या संकटांतून निःसंशय पार पाडील. **बाईसाहेब**, तिजवर भार टाका, ह्मणजे तिच्या आशीर्वादानें सर्व इडापिडा खचीत टळतील. मनुष्याची काळजी कुठवर पुरणार ? " अशा रीतीनें सर्व दासी **येसूबाईची** समजूत करून धीर देत आहेत, इतक्यांत मागें सांगितलेला घोडेस्वार वाड्यांतल्या पुढील चौकीं येऊन दाखल झाला. त्याच्या मागोमाग **राजाराम** व **भक्ताजी** हेही राजवाड्यांत आले. स्वारानें **प्रल्हादपंतास**[1] लवून मुजरा केला, व एक मोहोरबंद लाखोटा त्यांच्या हातीं दिला. तो फोडून वाचून पहातात तों **महाराजांच्या** घाताची दुष्टवार्ता ! त्याच्यानें तें पत्र पुढें वाचवेना देखील. त्यांचे डोळे पाण्यानें भरून आले. कंठ सद्गदित होऊन '**रामचंद्रपंत**[2] घात झाला हो घात झाला !! ' इतके शब्द मात्र कसे बसे त्यांच्या तोंडून बाहेर पडले. तें दुःखकारक वर्तमान ऐकतांच कचेरींतील सर्व मंडळींचे हातपाय गार झाले. ती गुजरीची वेळ. चोहोंकडे एकदम हाहाःकार

---

१ हे **निराजी रावजी न्यायाधीश** यांचे पुत्र. हेच पुढें प्रसिद्धीस येऊन **प्रतिनिधी**पद पावले. हेच **औंद** येथील **पंतप्रतिनिधींच्या** घराण्याचे पूर्वज होत.

२ यांचें आडनांव **बहुतकर** किंवा **बावडेकर** असें होतें. हेच हल्लींच्या **बावडे** येथील संस्थानिकांचे पूर्वज.

उसळला. महाराजांच्या वधाची ती हृदयभेदक वार्ता लागलीच किल्ल्याभर पसरली. जो तो वाड्याकडे धांव घेत सुटला. मंडळींच्या दुःखास पारावार नाहींसा होऊन लहान थोर सर्वांच्या तोंडांतून आज मराठ्यांची गादी बुडाली, भोंसलेकुलाची पुण्याई नष्ट झाली, असे दुःखोद्गार निघूं लागले. राजारामालाही भ्रातृदुःखानें विव्हल करून सोडिलें. संभाजीनें जरी त्याचा छळ केला होता, तथापि शत्रूंच्या हातून त्याचा असा भयंकर शेवट झाला हें ऐकून राजारामाचें कोमल अंतःकरण कळवळून त्यालाही दुःखाचें भरतें आलें.

आंत येसूबाईच्या आक्रोशानें तर दिवाणखाना कोसळून पडतो कीं काय, अशी अवस्था झाली. तिनें पोटच्या गोळ्यास (शिवाजीस) उराशीं धरून धाय मोकलली. " आई जगदंबे, तुला ह्या दासीचा छळच करावयाचा होता तर तो अन्य रीतीनें तरी करावयाचा होतास. हाय हाय!! त्या निर्दय कसाबांनीं जेव्हां जिवाचे हाल मांडिले असतील तेव्हां काय अवस्था झाली असेल बरें! देवाधिदेवा, वीरश्रेष्ठांच्या पोटीं ज्यांनीं जन्म घेतला, त्यांना राजकुलास लांछन आणणारें असें दुर्मरण प्राप्त व्हावें काय! अंबिके, तूं ह्या दासीचे हेतु पूर्ण करून तिला चुडेदान देशील अशा आशेनें तिनें इतके दिवस काढिले; पण, हिची तुला देखील करुणा आली नाहीं ना? ह्या हतभागिनीच्या कपाळींच सौख्य नाहीं, तें लाभेनें कसचें! या जन्मीं मी कोणाचा घातपात केला नाहीं किंवा कोणास दुख-

विलें नाहीं; पण मागच्या जन्मीचीं फळें असतील तरं तीं चुकविणार कोण! (शिवाजीस कुरवाळून) बाळा, तूं आतां अनाथ कां रे झालास! तुझा सांभाळ आतां कोण बरें करील? ह्या दुर्दैवी मातेच्या पोटीं येऊन तूं कसलेंच सुख पाहिलें नाहींस. यापेक्षां एखाद्या गरीबाच्या पोटीं येतास तर तुझे जास्त लडिवाळ पुरले असते. जळो हा जन्म, आणि जळो हें सौख्य. ह्या राज्याच्या पायींच ना तिकडे अशा यमयातना भोगाव्या लागल्या! हे कुलस्वामिणी, त्यांच्याऐवजीं मला नेलें असतेंस, तर आज मराठी राज्याचा तरी शेवट होताना. हायहाय!! तें उत्साहभरित हास्यवदन ह्या चांडाळिणीच्या आतां पुनः दृष्टीस तरी पडेल काय! त्यांच्यावांचून मला हें सर्व जग शून्याकार झालें. आतां जीव ठेवून तरी काय उपयोग!" असें ह्मणून तिनें धाडकन् जमिनीवर घालून घेतलें. जवळच्या दासींनीं "बाईसाहेब, बाईसाहेब, हें काय," असा एकच आकांत केला. कोणी कान फुंकिताहेत, कोणी हातपाय चोळताहेत तों ती गडबड ऐकून प्रल्हादपंत, राजाराम, रामचंद्रपंत वगैरे मंडळी बाहेरून धांवली. पाहतात तों, हें दुसरेंच संकट; पण अमळशानें येसूबाई सावध होऊन तिनें डोळे उघडिले.

**प्रल्हादपंतः**—आईसाहेब, आज सर्वपरीनें आपल्यावर व ह्या पदरच्या मंडळींवर आकाश कोसळलें आहे खरें; पण काय करणार? प्रारब्धापुढें कोणाची धांव आहे? दैवगतीनें देवादिकांस देखील सोडिलें नाहीं,

तेथें मनुष्यांचा काय पाड! आज एकापेक्षां एक असे शेंकडों शूर पुरुष पदरीं असतां प्रभुकार्यास एकाचाही उपयोग होऊं नये, असाच ईशसंकेत; तो चुकविणार कोण? शिवशिव!! **हिंदुपद्पादशाही**चा असा उपमर्द **मोंगलां**च्या हातून होईल, असें कोणाच्या ध्यानीं मनीं तरी कधीं आलें असेल काय! पण प्रभुसत्तेचा महिमाच असा कांहीं अजब आहे कीं, कोणत्या वेळीं कोणावर कसा प्रसंग येईल याचा नेम लागावयाचा नाहीं. होणार भवितव्याप्रमाणें सर्व गोष्टी घडून यावयाच्याच. त्या कधींही व कोणाच्या हातूनही चुकावयाच्या नाहींत. मग धीर सोडून काय उपयोग? मागचा विचार पाहिला पाहिजे. आपण जर अशा निराश होऊन जिवाची आस्था सोडिलीत, तर आह्मीं कोणाकडे पाहून शत्रूंचा सूड उगविण्याची ईर्षा धरावी? आतां किती जरी दुःख केलें तरी झालेली गोष्ट व गेलेला जीव कांहीं परत येत नाहीं. तेव्हां आतां मन दगडासारखें करून व **धाकटे महाराज** आणि **राजाराम महाराज** यांजकडे पाहून सर्वांनीं दुःख गिळिलें पाहिजे. प्रभूची कृपा असल्यास हे दिवस ह्मणजे असेच राहतील असें नाहीं.

अशा रीतीनें **मल्हादपंत, रामचंद्रपंत** वगैरे मंडळी **येसूबाई**चें सांत्वन करिताहेत तों मध्यरात्र उलटून जाऊन प्रभातकालचा समय आला.

---



# भाग ३ रा.

———o:o———

**आपत्स्वेव हि महतां शक्तिरभि व्यज्यते न संपत्सु ॥**

शार्ङ्गधर

ज्या पुरुषानें कांहीं कालपर्यंत आपल्या **भवानी** खड्गाचें पाणी संपूर्ण **महाराष्ट्रांत** खळाळून **हिंदुपद-पादशाहीची** इमारत उभारण्यासाठीं अश्रांत श्रम घेतले, त्याच्यापश्चात् पुरतीं दहा वर्षेंसुद्धां लोटलीं नाहींत तोंच तिला मोठालीं भगदाडें पडून तिचा जीर्णोद्धार करण्याची वेळ यावी ना !! पण यांत नवल तरी कशाचें ? कारण, इमारत निरेबंदी खरी; परंतु त्या इमारतीचा धनी व्यसनी व खुशामती लोकांच्या नादीं भरून नाचरंग उडविण्यांत गुंग होऊन गेल्यामुळें ती संधी साधून दरवडेखोरांनीं भरकाळोख्या रात्रीं बाहेरून तिच्या मजबूत भिंतीचा एक एक चिरा काढण्यास सुरवात केली, आणि दरवडेखोरांच्या पाहारांचे खाण्खाण् असे शब्द कानीं पडत असतां, किंवा इमानी नोकर, चोरांनीं लुटिलें लुटिलें असा कंठशोष करीत असतांही जर नाचरंगाच्या बहारींत घरधन्यानें तिकडे लक्ष्य दिलें नाहीं किंवा त्यांस धुडकावून लाविलें, तर कांहीं वेळानें भिंतीस भगदाडें पाडून चोर आंत शिरले, त्यांनीं सर्व भांडारखाना लुटिला, किंवा

घरधन्यास मुसक्या बांधून त्यास दूर नेऊन कंठस्नान घातलें, तर ती इमारत अथवा तिचे चिरे बसविणारे कारागीर दोषास पात्र होतात काय? नाहीं. ' **पिता-रत्नाकरोयस्य लक्ष्मीर्यस्य सहोदरी ॥ शंखो भिक्षाटनं कुर्यान्नादत्तमुपतिष्ठति ॥** ' असें ह्मटलें आहे. **रत्नाकरा**सारखा ज्याचा पिता, प्रत्यक्ष **लक्ष्मी**सारखी ज्याची भगिनी, व आपल्या अमृतकरांनीं संपूर्ण जगतास संतुष्ट करणारा **चंद्र** ज्याचा भ्राता, त्यानें जंगमाच्या पाठीवर पडून भों भों करीत दारोदार फिरावें, हें त्या शंखाचें प्राक्तन! तद्वत् **भोंसले** कुलामध्यें प्रौढप्रतापि वीराच्या पोटीं ज्याचा जन्म, **सईबाई**सारख्या कुलशील पतिव्रतेला ज्यानें नवमास शीण दिला, व नरकोटीमध्यें अग्रेसर असे **समर्थ रामदासस्वामी** ज्याचे कुलगुरु, त्या **संभाजी**चें और्ध्वदेहिककर्म यवनांच्या हातून व्हावें, अशी कर्मदशाच बलवत्तर तेथें इलाज नाहीं.

असो. तो दुष्ट प्रसंग तर गुदरून गेला. **प्रल्हादपंतांनीं राजारामाकडून संभाजीचें** दशांत कर्म करविलें. पुढें कांहीं दिवस लोटतात तोंच, **औरंगजेब रायगडास** वेढा देण्याकरितां आपलें सैन्य पाठविण्याच्या विचारांत आहे, अशी बातमी येऊन पोंचली. तेव्हां पूर्वीचें दुःख मागें पडून या नवीन येणाऱ्या बिकट प्रसंगाकडे सर्वांचें लक्ष्य वेधलें. आतां पुढें कोणती मसलत करावी, याचा विचार करण्याकरितां **प्रल्हादपंत, रामचंद्रपंत बावडेकर, जनार्दनपंत हणमंते,**

खंडो बल्लाळ चिटणीस, महादजी नाईक पानसंबळकर, मोहिते, घोरपडे, निंबाळकर, जाधव, मोरे, दाभाडे, जगताप, घाटगे वगैरे किल्ल्यावरील प्रमुख प्रमुख मंडळी एके ठिकाणीं जमली अशावेळीं संताजी त्वेषानें पुढें सरसावून ह्मणाला' मित्रहो, आज आपण एका दुःखांतून होरपळून निघतों आहों, व त्या निर्दय शत्रूंनीं महाराजांचा क्रूरपणें वध करून ह्या हिंदुप्रजेच्या अंतःकरणास दिलेले डाग अद्याप वाळून देखील आले नाहीत, तोंच त्यांनीं आमच्या अवशिष्ट राहिलेल्या सत्तेचा बीमोड करण्याकरितां कंबर बांधिली, असें ऐकिल्यापासून माझ्या जिवाचा कसा संताप होऊन गेला आहे. प्रस्तुत विपत्कालानें घेरून टाकिल्यामुळें आह्मीं कमकुवत झालों, असें समजून मोंगल गर्वानें बेफाम झाले काय? सरदारहो, शत्रु खूप समजून असूंद्यात कीं, कांहीं झालें तरी मराठ्यांच्यांशीं गांठ आहे. हा प्राण जरी कुडींतून निघून गेला, तरी भोंसलेकुलाच्या अन्नानें वाढलेलीं हीं हाडें शत्रूंच्या रक्ताला खेपल्ल्यावांचून कदापि रहावयाचीं नाहींत. आज अशी जरी आमची स्थिति झाली आहे, तरी जावत्कालपर्यंत आपण एकादिलानें व एकनिष्ठपणें प्रभुकार्यासाठीं देह झिजविण्यास तयार आहों, तोंपर्यंत प्रत्यक्ष काळास देखील दरडावून मागें लावूं; तेथें शत्रूंची कथा काय? आपण पुराणांतरीं ऐकतों कीं, दुर्योधनानें पांडवांचा अनेक प्रकारें छळ केला, मदांधपणें द्रौपदीची भरसभेंत विटंबना केली, व कपटानें

त्यांचें राज्य हरण करून त्यांस वनवासास धाडिलें. पण, इतकें झालें ह्मणून त्यांचें यश मलीन झालें कीं काय? नाहीं. वेळ फिरतांच श्रीकृष्णकृपेनें त्यांनीं दुष्टांचा नाश करून शेवटीं आपलें यश त्र्यैलोक्यांत गाजविलेंच गाजविलें.

"फार कशाला, आपल्या शिवछत्रपतीकडेच कां पहाना. त्यांच्या प्रतापरवीचा उदय होण्यापूर्वीं या आपल्या देशाची काय अवस्था झाली होती! परधर्मी व क्रूर म्लेंच्छांनीं आपल्या सर्वसत्तेची व वित्ताची राखरांगोळी करून आह्मांस घांसभर अन्नासाठीं व बोटभर चिंधीसाठीं आपल्या तोंडाकडे पहावयास लाविलें होतें. पण ईशसत्तेनें हिंदुत्वाचा खरा अभिमानी, स्वदेशबांधवांसाठीं निरपेक्षबुद्धीनें देह झिजविणारा शिवाजीमहाराजांसारखा पाठिंबा मिळतांच आह्मी तशाही स्थितींतून पार पडलों. अहाहा! धन्य त्या प्रभूची!! ज्यानें स्वपराक्रमेंकरून हां हां ह्मणतां पांचपादशाही* सफाई बुडवून हिंदुपदपादशाहीची स्थापना केली, त्याची थोरवी किती ह्मणून वर्णावी! त्या पुण्यप्रताप पुरुषाच्या कर्तबगारीनेंच बहुत कालपर्यंत परवशतेनें गांजून गेलेल्या आह्मां महाराष्ट्रियांस स्वातंत्र्यसुखाचा लाभ झाला. नाहींतर, कोठें तो सार्वभौम दिल्लीपति औरंगजेब, व कोठें आपला देशमुखपुत्र शिवाजी! कोठें ती ऐश्वर्यसंपन्न बादशहाच्या पदरीं

* अद्दीलशाही, निजामशाही, कुतुबशाही, अमादशाही, बरीदशाही.

मुखानें वाढलेली **मोंगलसेना**, व कोठें आपले अठरा विस्वे दारिद्र्यानें पीडिलेले बावळे **मावळे**! पण नाहीं; एक हिंमतीच्या जोरावर, तसल्या बावळ्या पण स्वराजनिष्ठ आणि धन्याच्या जिवासाठीं जीव देणाऱ्या **तान्हाजी मुर्याजीसारख्या** हिंमतदार गड्यांचे साहाय्यानें **शिवाजी महाराजांनीं** कांहींवेळपर्यंत संपूर्ण **महाराष्ट्रांत** अकांडतांडव करून स्वयशाचा झेंडा उभारिला. द्वापारांत **श्रीरामचंद्रानें सीताशुद्धि** करून दैत्यवंशी **रावणास** मुक्ति दिली तीतर केवळ वानरांच्या बलावर! हिंमत ही एक अजब चीज ह्या लोकीं ईश्वरानें निर्माण केली आहे. तिच्या जोरावर बुद्धि आणि वाचा यांहीं युक्त हा साडेतीन हात देहाचा सांगाडा काय करूं शकणार नाहीं? **जाधव, दाभाडे, चव्हाण,** यांसारखे वीर आज शत्रूंच्या नरडीचा घोट घेण्यास कंबर कसून उभे असतां चिंता ती कशाची?"

शत्रूंनीं जाणूनबुजून **भोंसल्याच्या** कुळाचा केलेला उपमर्द, व त्यांनीं अमानुष रीतीनें केलेला **संभाजीचा** वध यांच्यायोगानें आधींच सर्वांचीं अंतःकरणें क्षुब्ध होऊन गेलीं होतीं. त्यांत हें **घोरपड्याचें** वीरश्रीयुक्त भाषण ऐकून व शत्रूंच्या नाशार्थ त्या वीराच्या आंगीं चढलेलें स्फुरण पाहून **मोहिते, जाधव, चव्हाण, दाभाडे, पवार** इत्यादि मोठे सरदार खदिरांगारासारिखे लाल होऊन गेले. पण अशा वेळीं उतावीळपणा करून क्रोधाच्या स्वाधीन होणें योग्य नव्हे, असें जाणून सर्वांस दोन समजुतीच्या गोष्टी सांगण्याकरितां **रामचंद्रपंत** ह्मणाले;

"गडे हो, शांत व्हा, शांत व्हा. तुमच्या ठिकाणीं चमकणारी ही वीरश्री खरोखरच प्रशंसनीय आहे. प्रसंग आला असतां, पंचप्राण कुडींत आहेत तोंपर्यंत स्वराज्याकरितां व स्वदेशबांधवांकरितां शत्रूंच्या समशेरीशीं खिळणारे निधड गडी अद्याप मराठेशाईंत जिवंत आहेत, असें तुह्मीं जगास दाखवाल यांत बिलकूल संशय नाहीं. पण प्रस्तुत, प्रसंग कोणाशीं आहे व आज आपली स्थिति कशा प्रकारची झाली आहे, याचा थोडासा विचार करून मोठ्या सावधगिरीनेंच पुढें पाऊल टाकिलें पाहिजे. शत्रूंच्या त्या अमानुष कृत्यांची आठवण झाली ह्मणजे आंगाचा तिळपापड होऊन फार दिवसांपासून तान्हेलेले हे मराठ्यांचे भाले त्या मानवी राक्षसांच्या काळजांत शिरून सुखेनैव रक्तप्राशनानें कधीं शांत होतील, असें वाटतें खरें. पण, "धीर सो गंभीर." वेळ येईपर्यंत दमानें धीर धरून पुढला आपला हेतु कसा साध्य होईल याकडे दृष्टी पोहोंचविणें विशेष शहाणपणाचें होय. नाहींपेक्षां "**इदंच नास्ति न परं हि लभ्यते**" असें होऊन जगांत हंसें मात्र होईल.

"तुह्मी शहाणे, पोक्तविचारी व अनुभवी आहांतच. मी कोणतीही गोष्ट सांगावी, असें नाहीं. **तुरंग शस्त्र आणि स्वार । पहिला पहावा विचार । निवटूं जातां थोर थोर । शत्रु पळती ॥** राज्याला मुख्य बळकटी ह्मटली ह्मणजे काय ती फौजेची. पण आज त्या संबंधानें विचार केला असतां आपली स्थिति

किती शोचनीय झाली आहे ती पहा. सैन्यांतील पूर्वींचे इम्रतदार व घराणदार लोक **कलुषाच्या** राजव्यवस्थेस व जुलमास कंटाळून देशोधडीस लागल्यामुळें प्रस्तुत स्वार व शिबंदी ह्यामध्यें कांहींच जीव उरला नाहीं. दुसरी गोष्ट पैशाची. पण तिकडूनही आपला ओढता पाय. 'संन्याशाच्या लग्नाची शेंडीपासून तयारी' अशी आपली आज सर्व तऱ्हेनें पंचाईत उडून गेली आहे. ह्यासाठीं जें करणें तें विचारानेंच केलें पाहिजे. अशा प्रसंगीं **प्रल्हादपंतां**सारख्या जाणत्या व कार्यकुशल पुरुषाचा सल्ला घेऊन कोणतीही मसलत करावी असें मला वाटतें. शिवाय, आतां आपल्यास वडिलांच्या जागीं मातोश्री **येसूबाईसाहेब** आहेत. त्या शहाण्या व समंजस असल्यामुळें त्यांचाही या कामीं सल्ला घ्यावा. **औरंगजेबा**सारखा शत्रु ह्मणजे सामान्य नव्हे. तेव्हां ' उतावळा नवरा गुढघ्यास बाशिंग ' असें उपयोगाचें नाहीं." हें **रामचंद्रपंता**चें शहाणपणाचें भाषण व पोक्तविचार ऐकून सर्व मंडळी कांहीं वेळ पर्यंत तटस्थ बसली. त्यांच्या मनांतील तो पूर्वींचा भ्रम नाहींसा होऊन त्यांनीं लागलीच **रामचंद्रपंता**च्या बोलण्यास मान दिला व **प्रल्हादपंतां**च्या विचारें दुसरे दिवशीं **येसूबाई**ची भेट घेण्याकरितां एकंदर मंडळी राजवाड्यांत जमली.

**प्रल्हादपंतः**–(**औरंगजेबा**कडील बातमी कळवून) **आईसाहेब**, मनुष्यावर एकदां संकटें येऊं लागलीं ह्मणजे तीं चोहोंकडून एकदम येतात, अशी जी ह्मण

आहे ती कांहीं खोटी नव्हे. आज आपली सर्व तऱ्हेनें घसरलेली बाजू सांवरून तिला बळकटी आणावी, व शत्रूंस कृतकर्माचें प्रायश्चित्त देण्यासाठीं तयार व्हावें, अशाविषयीं पदरची मंडळी विचार करीत आहेत तों हें दुसरेंच संकट पुढें दत्त ह्मणून उभें. तरी पण, दुःखांत सुख एवढेंच मानावयाचें कीं, असा पडता काळ आला असतांही पदरच्या मंडळींचा उत्साह किमपि कमी न होतां, उलट स्वराज्याचा अभिमान पूर्णपणें मनांत बाळगून गेलेलें यश परत मिळविण्यासाठीं पाहिजे तीं संकटें सोसण्यास ते आज एका पायावर उभे आहेत. विपत्काल प्राप्त झाला तरी, मनुष्याच्या आंगीं उत्साह, हिंमत व अभिमान हे गुण कायम असेपर्यंत तो आपल्या पूर्वजांचें यश जगावर चिरस्थायी करण्यासाठीं सतत यत्न करीत राहील, यांत संशय नाहीं. ज्यांच्या अंतःकरणांत आपल्या धुरंधर पुर्वजांचा लौकिक व त्यास अनुसरून आपलें कर्तव्य ह्या गोष्टी एकवार खोंचल्या गेल्या, त्यांना निरुपायास्तव कांहीं काल पावेतों स्वस्थ बसावें लागलें तथापि ते केव्हांना केव्हां तरी आपल्या वाडवडिलांचे पांग फेडल्यावांचून खचीत रहावयाचे नाहींत.

**औरंगजेबानें** आज **रायगडास** वेढा दिला ह्मणजे हें स्थळ एकदम त्याचे हातीं लागतें असें जरी नाहीं, तरी पण आपण आधींपासून होतां होईल तों सावधगिरीनें व शहाणपणानें वागावें, हें चांगलें. कारण समर्थाशीं टक्कर देण्यास उभे रहाण्यापूर्वीं आपल्या ब-

लावलाचा सदोदित विचार करावा, अशी राजनीति आहे. तेव्हां, **मोंगलां**सारख्या प्रबल शत्रूंशीं आजच उघडपणें सामना करून यशाची आशा धरण्यापेक्षां ईश्वरावर भार टाकून ह्यावेळीं सौम्य उपायांनींच आपली बूज राखण्याचा यत्न करावा, असें माझ्या बुद्धीस वाटतें. प्रस्तुत प्रसंगीं कांहीं मंडळींनीं येथून बाहेर पडून आपल्या हातीं असलेल्या बाहेरील ठाण्यांचा बंदोबस्त करीत **पन्हाळगडीं** जावें, ह्मणजे आपले दोन्ही हेतु साध्य होतील. एक तर, आह्मी **रायगडा**हून निघून बाहेर प्रांतीं गेलों असें शत्रूंस समजलें ह्मणजे, त्यांची ओढ तिकडे पडून **रायगडा**कडील त्यांचें लक्ष कमी होईल. दुसरें, आह्मी आपल्या ठाण्यांची व्यवस्था ठेवून शत्रूंशीं झुजण्याकरितां कंबर बांधीत आहों असें लोकांस समजलें ह्मणजे, मधील कारकिर्दीस कंटाळून भीतीनें चोहोंकडे चार गेलेलीं कर्तीं माणसें, **हिंदुपदपादशाही**चें संरक्षण करण्यासाठीं आह्मांस येऊन मिळतील. अशा रीतीनें आपण एक एक पाऊल पुढें टाकीत गेलों असतां, शत्रूंशीं आज नाहीं उद्यां केव्हां तरी टक्कर मारण्याचें सामर्थ्य आपल्या आंगीं खचीत येईल. तर, या सर्व [illegible]ष्टींचा विचार होऊन पुढील व्यवस्था काय करावय[illegible]ाची आज्ञा व्हावी. नाहींपेक्षां एकदां शत्रूंचा प[illegible] पथवर येऊन पोंचला, ह्मणजे मग सर्व मसलती जागच्या जागीं राहून सर्वांस आपल्या प्राणांचा बळी देण्याचा प्रसंग येईल. आपल्यास कोणतीही गोष्ट मीं सांगावी, असें नाहीं. राज्याचे अधिकारी

**शिवाजी** अद्याप लहान आहेत; तेव्हां आतां आपल्या व **राजाराम महाराजांच्या** विचारेंच काय तो हुकूम व्हावयाचा. आम्ही केवळ हुकुमाचे बंदे. तर जसा हुकूम होईल त्याप्रमाणें गादीची सेवा करण्यास हे एकंदर सेवक आज सिद्ध आहेत.

**येसूबाईः**—पंत, राज्यकारभाराच्या गोष्टी आम्हां बायकांपर्यंत आणण्याची आज प्रालब्धदशेनें वेळ आणिली ना! असो. ईश्वर ठेवील तसें राहिलें पाहिजे. गादीचा मान राखून तुम्हीं सर्व मंडळी येथवर आलांत हें योग्यच. परंतु, आज राज्याचें रक्षण कसें होईल व कोणती युक्ति योजिली असतां, हें येऊं पाहत असलेलें अरिष्ट टळून त्या मदांध यवनांस त्यांच्या अघोर कर्माबद्दल शासन करण्याचें सामर्थ्य आपल्या आंगीं येईल, ह्या गोष्टी बायकांस काय समजणार? ह्या मराठी राज्याचें सुकाणूं मागें कांहीं दिवसपर्यंत आपल्या **न्यायमूर्ति वडिलांच्या** हातीं होतें तें आज परमेश्वर इच्छेनें तुमच्या हातीं आलें आहे. तर त्याचा कराामतीनें उपयोग करून आजवर पूर्वजांनीं मिळविलेल्या लौकिकाची बूज राखणें तुम्हांकडे आहे. आतां सर्व भिस्त काय ती तुम्हांसारख्या व **रामचंद्रपंतांसारख्या** पुरुषांच्या शहाणपणावर. प्रसंग पडल्यास **मामाजीं**च्या वेळीं **विजापूरकरासारख्या** बलाढ्य शत्रूंवर आपली तलवार चालवून, थोरवी संपादिलेले **निंबाळकर, मोरे, जाधव, दाभाडे, पवार, मोहिते, घोरपडे** इत्यादि शूर सरदार आहेतच त्यांच्यासारख्या हिंमत-

दार, राजनिष्ठ आणि निश्चयी सरदारांच्या पराक्रमावरच हें एवढें राज्य उदयास आलें. तेव्हां पुढें ही त्याचा अभिमान धरून आपलें व आपल्या वडिलांचें ब्रीद जाऊं न देण्यासाठीं ते मनःपूर्वक झटतील, यांत संशय नाहीं. आपण यत्न करीत असावें. मग प्रयत्नाअंतीं परमेश्वर कोणती तड लावील ती लावील. पंत, जास्त काय सांगायचँ ? राजारामभाऊजींच्या व आपल्या सर्वांच्या विचारें जी व्यवस्था करणें ती करा, आणि शिवाजीच्या नांवें राज्यकारभार चालवून हरएक उपायानें गादीचें यश राखा, ह्मणजे सर्व त्यांत आलें.

याप्रमाणें भाषणें होऊन येसूबाईच्या गुणांची व शहाणपणाची तारीफ करीत सर्व मंडळी आपापल्या ठिकाणीं परतली.





# भाग ४ था.

———०:०———

। स एव धन्यो विपदि स्वरूपं न विमुंचति ।

शेवटीं येसूबाई, प्रल्हादपंत, रामचंद्रपंत व इतर मुत्सद्दी मंडळी या सर्वांच्या विचारें एकंदर मसलत ठरली. प्रल्हादपंतांनीं किल्ल्यावर उणेंपुरें सामान, दारूगोळा, व अन्नसामुग्री यांचा संग्रह केला. शत्रूंनीं बाहेरून वेढा दिला तरी आंतील मंडळींस चार सहा महिने कशाचीही तूट न पडतां किल्ला लढवितां येईल अशी तरतूद केली. सर्व तयारी झाल्यावर आपण बाहेर पडून जाण्यापूर्वीं मंडळींच्या गांठी घेऊन त्यांना मागील व्यवस्थेविषयीं दोन शब्द सांगावे अशा हेतूनें प्रल्हादपंतांनीं सर्वांस वाड्यांत बोलाविलें.

प्रल्हादपंतः—सरदारहो! आजपर्यंत आपण एकत्र राहून परस्परांच्या सुखदुःखाचे विभागी झालों होतों, पण आतां पुढें तसें करणें योग्य नाहीं. कारण शत्रुंनीं जर एकदां अशा ठिकाणीं आपणा सर्वांस गांठिलें, तर मग फजीतीस पारावार नाहींसा होईल. तेव्हां ते रायगडाकडे वळण्यापूर्वींच राजाराम महाराजां-

[illegible] वर्तमान पन्हाळ [illegible] न शत्रूंस तिकडून शह

[illegible] हे. आस्वलानें गांठण्या-

[illegible] गाचा कांहीं इलाज

चालत नाहीं, अशी ह्मण आहे. त्याप्रमाणें आपण शत्रूंस दुसरीकडे हूल दाखविली असतां, त्यांची **रायगडावरील** मसलत लांबणीवर पडेल. तोंपर्यंत बाहेरप्रांतीं आमची शिस्त बसून एकवार काम अवसानांत आलें ह्मणजे मग पाहतां येईल. आतां इतकेंही होऊन शत्रूंनीं त्यापूर्वींच एथवर पल्ला झेंपला, तर वर्ष सहा महिने किल्ला लढवून शत्रूंस घोळविण्यास तुह्मांसारिखे हिम्मतदार व खऱ्या छातीचे निधडगडी मागें आहेतच. **मोहिते, निंबाळकर, मोरे, जगताप, शितोळे** इत्यादि सरदारांच्या जिवावरच **आईसाहेब** व **धाकटे सरकार** यांस मागें ठेवून आह्मी बाहेरप्रांतीं निघालों आहों. आतां मागील सर्व भरिभार काय तो तुह्मांवर. **भोंसल्यांच्या** कुलाचा लौकीक मनांत वागवून स्वराज्याकरितां व पूर्वजांच्या यशाकरितां तनमनधनेंकरून झटत गेलांत, ह्मणजे त्यांतच आपलें सर्वांचें कल्याण आहे. शेवटीं एवढेंच सांगावयाचें कीं, मधील काराकिर्दीविषयीं वैषम्यभाव मनांत न आणितां, पूर्ण उपकारावर दृष्टि देऊन तुह्मीं होऊन जो प्रमुखपणा माझ्या माथीं मारिला आहे त्यास यश द्या. ह्मणजे झालें. ”

याप्रमाणें सर्वांस आपला संकेत कळवून दुसरे दिवशीं **मल्हारपंत, रामचंद्रपंत, खंडो बल्लाळ, धनाजी, संताजी, दाभ[illegible]** वगैरे मंडळी घरच्या माणसांचा निरोप घेऊन वाऊ[illegible] [illegible]ंस पोंचविण्याकरितां आलेल्या हजारों [illegible]च गर्दी उसळल्यामुळें राजवाडा फुलून गेला. **कुलस्वामिनीस** नमस्कार

करून **आईसाहेबांचा** निरोप घेण्याकरितां, **राजाराम** व **मल्हादपंत** दिवाणखान्यांत गेले.

**राजाराम:**—( येसूबाईच्या पायांवर मस्तक ठेवून ) **वयनी,** आज आपल्यास येथें ठेवून आह्मांस बाहेर पडण्याचा प्रसंग आला, पण इलाज नाहीं. **रायगडा**सारखी जवळसार दुसरी मजबूत जागा नसल्यामुळें आजच येथून सर्वांनीं निघून जाणें धोक्याचें आहे. तेव्हां आह्मी **पन्हाळगडीं** पोंचून तेथील सर्व शिस्त बसेपर्यंत आपण येथेंच रहावें. एकदां बाहेरप्रांतीं बंदोबस्त होऊन आमचा पायबंद लागला ह्मणजे पुनः सर्वांच्या गांठी पडतील. तोंपर्यंत मागें पदरच्या मंडळींस संभाळून ( **शिवाजीस** उचलून घेऊन ) ह्या राजबिंड्याच्या जिवास जपा. सर्व संकटें दूर करून माझ्या हातानें ह्या माझ्या लाडक्याला राज्याभिषेक करण्याचा सुदीन ईश्वरानें लवकर दाखवावा, एवढेंच त्याजपाशीं मागणें आहे.

( **शिवाजीचे** मुके घेऊन ) 'बाळा उतर आतां.' असें ह्मणून **शिवाजीस** खालीं ठेवितात [illegible] त्यानें **चुलत्या**च्या गळ्यास घट्ट मिठी [illegible] आणि '**काकासाहेब** मला सोडून कुठे जातां' असें बोबड्या शब्दांनीं विचारिलें. तें ऐकून **राजारामाचें** अंतःकरण गहिंवरून आलें. पण निरुपायास्तव मोठ्या कष्टानें 'बाळा तुला देखील ने[illegible] ह्मणून त्यांनीं त्याची समजूत केली व [illegible] निरोप घेतला.

**येसू०—भाऊजी,** बाह[illegible] र प्रकृतीस जपून

रहा बरें. **प्रल्हादपंत,** तुह्मीच आतां सर्वतोपरी **भाऊ-जींचा** सांभाळ करणार. ते हुशार आहेत खरे; पण अद्याप त्यांना बाहेरील जगाची पुरेशी ओळख झालेली नाहीं. त्यांतून त्यांचा अंमळ भिडस्त स्वभाव, ह्मणून विशेष सांगायचं. बाहेर प्रांतीं मोठ्या बंदोबस्तानें वागून नेहमीं इकडे समाचार कळेल अशी तजवीज ठेवा. कारण शत्रु केव्हां कसा प्रसंग आणितील, याचा नेम लागणार नाहीं. आह्मी उगीच काळजी वाहवयाची. सर्व संकटें निवारण करून या गादीचें यश राखणार ती **कुलस्वा-मिनी** समर्थ आहे.

**प्रल्हाद०—आईसाहेब,** आह्मीं कोठेंही असलों तरी, तेथील बातमी नेहमीं **रायगडास** व **रायगडची** आह्मांस कळण्याजोगी सर्व व्यवस्था केली आहे. शत्रूंकडील गुप्त बातमी कळण्यासाठीं जागजागीं स्वार ठेवून हर-एक गोष्टीसंबंधानें जेवढी ह्मणून हुशारी घेववेल तेवढी घेण्यांत आली आहे. आतां कर्ता करविता **तो.** त्याची कृपादृष्टि असल्यास ह्या पदरच्या मंडळींनीं मोठ्या ईर्षेनें स्वराज्यासाठीं जी कंबर बांधिली आहे, त्यांत तो यश दिल्यावांचून खचीत रहाणार नाहीं.

याप्रमाणें सर्वांचा निरोप घेऊन मंडळी **रायगडाहून** निघाली ती वाटेंत एक मुक्काम करून दुसरे दिवशीं **प्रतापगडीं** दाखल झाली. तेथें दोन चार दिवस राहून **प्रल्हादपंतांनीं** किल्ल्यावरील एकंदर व्यवस्था केली. निघतांना **श्रीभवानीचें** दर्शन घेऊन सर्वांनीं तिची प्रार्थना केली कीं, "हे **कुलस्वामिनी,** आज तुझ्या

ह्या दासांवर तर असा प्रसंग येऊन गुदरला आहे. हें राज्य तुझें देणें; तेव्हां आतां शत्रुनिर्दालन करून या **मराठीराज्याची** लज्जा राखणें केवळ तुजकडे आहे. एक **हिंदुपदाचा** खरा अभिमान काय तो तुलाच. आमच्या संकटांचा परिहार करून पूर्वजांची कीर्ति चिरस्थायी करण्यास तुजवांचून दुसरें कोणीही समर्थ नाहीं. आह्मीं पंगू जीवांनीं तुजवर भार टाकून प्रयत्न करीत असावें एवढेंच; त्यांत यश येणें ही तुझी सत्ता. तुझ्या ठिकाणीं पूर्णभाव ठेवून आह्मी **राजाराम महाराजांस**हवर्तमान बाहेर पडलों आहों; तर आतां सर्वांचा सांभाळ करून **भोंसलेकुळाचें** लोपलेलें यश दिगंतरीं गाजविण्याचें सामर्थ्य ह्या दासांस दे." अशा रीतीनें **शिवछत्रपतींनीं** आपल्या हस्तें **प्रतापगडीं** स्थापन केलेल्या **कुलस्वामिनीचा** प्रसाद घेऊन सर्व मंडळी **प्रतापगडाहून साताऱ्यास** आली. तेथें कांहीं दिवस राहून **प्रल्हादपंतांनीं** किल्ल्याची डागडुजी करविली. दारुगोळा, धान्य वगैरेची किल्ल्यावर बेगमी करून स्वार व शिबंदी यांची शिस्त लाविल्यावर **समर्थांच्या** समाधीचें दर्शन घेण्याकरितां तेथून ती मंडळी **परळीस** गेली. तेथें त्या सत्पुरुषाच्या समाधिदर्शनानें सर्वांचीं अंतःकरणें प्रेमोत्साहभरित होऊन त्यांच्या नेत्रावाटें आनंदाश्रु वाहूं लागले. ज्यांच्या केवळ समाधिदर्शनानें सर्वांच्या हृदयांत आनंदोर्मि उचंबळल्या व मनाला सुखदुःखांचा विसर पडला, त्या **परमहंसांचें** ज्यांस प्रत्यक्ष दर्शन झालें, ते किती धन्य झाले असतील बरें !! असो.

**परळीस** एक दिवस राहून पुढें ते थेट **पन्हाळ्या**-कडे वळले. किल्ल्यावर पोंचतांच **प्रल्हादपंतांनीं** **मराठ्यांचें** भगवें निशाण उभारिलें, आणि त्याच्या संरक्षणार्थ, आपल्यास **पन्हाळीं** येऊन मिळण्याकरितां **राजाराम महाराजांच्या** सहीचीं पत्रें देऊन संपूर्ण **महाराष्ट्रांत** चोहोंकडे स्वार रवाना केले. ह्यावेळीं **महाराष्ट्रदेशांतील** एकंदर हिंदुप्रजेची स्थिति कोणत्या प्रकारची झाली होती, हें येथें सांगितलें पाहिजे.

सन सोळाशें शायशीसत्याऐंशीच्या दरम्यान **औरंगजेबानें गोंवळकोंडें** व **विजापूर** हीं दक्षिणेंतील बलाढ्य मुसलमानी राज्यें समूळ बुडवून टाकिलीं, हें वाचकांस माहीत असेलच. तीं राज्यें मुसलमानांचीं असतांही त्यांचें आंतून मराठ्यांशीं ऐक्य आहे, अशी **बादशहाची** पक्की समजूत झाल्यामुळें तीं राज्यें **दक्षिणेंत** नांदत आहेत तोंपर्यंत तीं **मराठ्यांच्या** वाढत चाललेल्या सत्तेचा अंकुर मोडणार नाहीं, असें **औरंगजेबाच्या** मनानें घेतलें होतें. परंतु खरोखर पाहिलें असतां, तो त्याचा समज चुकीचा होता. वरील मुसलमानी राज्यें **दक्षिणेंत** कायम होतीं तोंपर्यंत **दक्षिणेचा** जो बंदोबस्त होता, तो तीं धुळीस मिळतांच नाहींसा होऊन **मराठ्यांस** सर्व प्रदेश मोकळा सांपडला. शिवाय, या राजांच्या पदरीं जी मोठी फौज होती, त्यांतील पठाण व परदेशी लोकांस कदाचित् **मोंगलांच्या** पदरीं चाकरी मिळाली असेल; परंतु इतर एतद्देशीय लष्करी लोकांस **बादशहाचा** आश्रय मिळाला नाहीं. त्यावेळीं

**संभाजी** दुर्व्यसनाधीन होऊन **कलुषासारख्या** अक्कलशून्य पुरुषाच्या हातीं मराठी राज्याचीं सूत्रें खेळत असल्यामुळें त्याच्या जुलमास कंटाळून मराठ्यांच्याच पदरची सेना देशोधडीस लागली होती. मग ह्या नवीन लोकांस त्यांच्या पदरीं कोठचा थारा मिळणार? तेव्हां त्यांपैकीं कित्येक लोक आपापल्या टोळ्या करून स्वतंत्र रीतीनें आसपासच्या प्रदेशांत लुटालूट करीत फिरत होते. कित्येक घरंदाज पुरुष आपल्यास पुनः **भोंसले** कुलाच्या भगव्या झेंड्याची छाया कधीं प्राप्त होईल, अशी वाट पहात गुण्यागोविंदानें दिवस कंठीत होते. याप्रमाणें स्थिति असतां, **संभाजी**च्या कारकिर्दीचा शेवट होऊन एकंदर राज्यसूत्रें **प्रल्हादपंतां**सारख्या शहाण्या पुरुषाच्या हातीं आलीं; व त्यांनीं मोठ्या धूर्ततेनें होईल तितकी व्यवस्था करून स्वराज्य रक्षणार्थ **राजारामा**च्या नांवें बावटा उभारिला. पुढें ती आनंदाची बातमी **महाराष्ट्रांत** पसरतांच हजारों लोक आपापल्या टोळ्यांसह **पन्हाळगडीं** जमूं लागले. अशा रीतीनें मराठ्यांची छोटेखानी फौज हळूहळू रंगारूपास येत जाऊन तिची व्यवस्था **धनाजी संताजी** सारख्या वाकबगार व युद्धकलाविशारद पुरुषांच्या हातीं आल्यामुळें तिच्या आंगीं हळूहळू **मोंगलां**सारख्या बलाढ्य शत्रूंशींहि टक्कर मारण्याची कुवत येत चालली.

इकडे ही बातमी **औरंगजेबास** समजतांच त्याचें पित्त खवळून गेलें. **संभाजी**चा सावत्रबंधु **राजाराम**

थास आपला धनी मानून **प्रल्हाद निराजी, रामचंद्र निळकंठ, जाधव, घोरपडे** वगैरे मंडळी पुनः फौजबंद होण्याच्या बेतांत आहे असें पाहून **बादशहानें** लागलीच **रणमस्तखान, शास्ताखान, तकरीबखान, झुलफिकारखान** वगैरे धुरंधर सरदारांस आपल्या तंबूंत बोलावून सांगितलें.

**औरंगजेबः**–ये अरकानें हुकूमत हमे मऱ्हेटोंकी गोषमालीकेलिये आज आपना तख्तगा देहिली शहर छोडकरके छेसात सालका आरसा गुजरा. लैकिन् आबतक कोइ अमरकी दस्तयाबी नहुयी. ये मिस्किन मऱ्हेटे आपजैसे गुर्दानें जंगियोंको हिलाक करना निहायत अजूबाहै. इनकू नेस्तनाबूद करनेकेलिये आजलग मशीरानें हुकूमत किस तऱ्हेकी कोशिश और जानबाजी करते आए, इसका तसूवर कीजे तो, बडी हैरतका मुकाम है. हाकिमानें **बिजापूर** और **गोंवळकोंडा** आपनेही कलमागो भाई थे, मगर मऱ्हेटोंकी बीखकनीकेवास्ते इनकी कुच पासखातीर नहीं रखी. आपही लोगोंकी मोदबिरी और मश्वरेसे **संभाजी** आपना आसीर हुवा, और उसकी तकब्बुरी व जबांदराजीसे कतल करा दिया. मगर तांईके बावजूद इन मऱ्हेटोंकी सरजनिस होते हुवे आपनेको बेखतर व बेवकर, इस किल्हेसे दुसरे किल्हेतक तकापोई कर रहेहैं. कल **अबदुल्लाखां** अमीरकी जानीबसे यों अखबार आईहैके **संभाजीका** बेमादर भाई **राजाराम** मुकाम **पऱ्हाळगड**पर ठेरेहुये कै अवबाशीयोंको जमे कररहाहैं. तबतो उ-

नमे तगाफुल करनी बिलकुल लाजीम नहीहै. मऱ्हेटोंको यौं जानीयेके ये गोया सपोले हैं. नीमजान छोडेतो वे किस वख्त गर्जदगीपर औद करेंगे मालुम नहीं. इसीलिये इनकी बीखकंदनीही करनी चाहीये. आज आपजैसे मुद्बेराने मुमालीकेशाही और लाखों अफवाजे बादशाही रहते हुवे, एक अदनासे शरीर मऱ्हेटोंने ऐसी गुस्ताखी करनी आपसे जवामर्दोंकी बलंदहिंमत और दबदबे **बादशाहीको** जिल्लतहै. तो, अब ऐसे नाकिस मऱ्हेटोंकी जदोकुश्त करनेकी ततबीर बगैर हरगीज राहत नही लिया चाहीये.

[ **सरदारहो,** आपण **दक्षिणेचें** राज्य काबिज करण्याकरितां **दिल्ली** सोडून इकडे आल्यास आज सहा सात वर्षे होत आलीं; पण हा वेळ पर्यंत आपला कोणताच हेतु सिद्धीस गेला नाहीं. यःकश्चित् मराठे ते काय, आणि त्यांनीं तुह्मांसारख्या वीरांस दमवावें ह्मणजे काय ! त्यांना रसातळीं गाडून टाकण्यासाठीं आह्मीं आजवर काय काय केलें आणि काय काय नाहीं,ह्याचा अंमळ विचार केला ह्मणजे जीव थक्क होऊन जातो. **विजापूरकर** व **गोंवळकोंडेकर** आपले जातभाई खरे; पण मराठ्यांचा आधार मोडावा ह्मणून त्या आपल्या जातभाईस देखील धुळीस मिळविण्यास आपण मागें पुढें पाहिलें नाहीं. तुमच्या दीर्घोद्योगानें व मसलतीनें **संभाजी** आपल्या हातीं सांपडला, व त्याच्या उद्दामपणाच्या वर्तनाबद्दल आपण त्याला देहान्त शासन ही दिलें. पण इतकें होऊनही त्या लुटारू **मराठ्यांचें** पारिपत्य

न होतां, ते अद्याप सैतानासारखे ह्या किल्ल्यावरून त्या किल्ल्यावर व त्या किल्ल्यावरून ह्या किल्ल्यावर फिरत आहेत. काल **अबदुल्लाखाना**कडून तर असें वर्तमान आलें आहे कीं, **संभाजी**चा सावत्रबंधु **राजाराम** कांहीं मंडळीसहवर्तमान **पन्हाळगडीं** उतरून फौज जमवीत आहे. तेव्हां आतां शत्रूंची उपेक्षा करणें अगदीं कामाचें नाहीं. **मराठे** ह्मणजे केवळ सर्पाची जात. किंचित् जीव असतां जर कां ते एकदां मोकळे सुटले, तर उभा दावा साधून केव्हां कसा प्रसंग आणितील याचा नेम नाहीं. याकरितां त्यांचा बींमोडच झाला पाहिजे. आज तुह्मांसारखे एकापेक्षां एक धुरंधर वीर माझ्या पदरीं असतां कमकुवत **मराठ्यांनीं** असा लपंडाव मांडावा ही तुमच्या ब्रीदास मोठी लांछनाची गोष्ट होय. आतां त्या कपटी **मराठ्यांचें** निर्मूलन केल्याशिवाय विश्रांति घ्यावयाची नाहीं. असा मनाचा पक्का निश्चय करून उदईक शत्रूंवर जाण्याची तयारी करा. ]

याप्रमाणें **औरंगजेबानें** आपल्या सरदारांचे आंगीं ईर्षा येण्यासाठीं खोंचदार भाषण करून **झुलफिकारखानास** वीसहजार सैन्यानिशीं **रायगडीं** जाण्याविषयीं हुकूम दिला. **शास्ताखान** व **रणमस्तखान** हे उभयतां मोंगल सरदार आपआपल्या हाताखालचीं सैन्यें घेऊन **पन्हाळ्याकडे** निघाले.

इतकें होत आहे तों, इकडे **पन्हाळ्यावर** आठ हजार मराठ्यांची जमात जमली. **भोंसले**कुलाचा गेलेला लौकिक परत मिळविण्यासाठीं एक मारावयाचें किंवा

मरावयाचें असा हिय्या धरून स्वामिकार्यासाठीं आपआपले देह अर्पावयास सर्व मंडळी सिद्ध झाली. ही त्या लोकांची हिंमत व स्वराज्यरक्षणाचे कामीं त्यांच्या आंगीं उत्पन्न झालेला अभिमान पाहून **प्रल्हादपंतास** व इतर मंडळीस फारच आनंद झाला. गतवैभव व गतलौकिक परत मिळविण्यासाठीं यत्न करण्यास त्यांच्या आंगीं दुप्पट ईर्षा उत्पन्न होऊन त्यांनीं शत्रूंचा हरएक बेत हाणून पाडण्याचा निश्चय केला. **संताजी, बहिरजी** आणि **चव्हाण** या त्रिवर्गांच्या हाताखालीं निम्में सैन्य देऊन **प्रल्हादपंतांनीं** त्यांस **तुळापुराकडे** पाठविलें. **बादशहाचें** सैन्य **रायगडावर** येण्यासाठीं छावणींतून निघण्यापूर्वींच आपल्या फौजेनें तेथपर्यंत मजल मारून आसपासच्या प्रांतांत लुटालूट करीत सुटावें, व एके ठिकाणीं मुक्काम न करितां मोठ्या सावधगिरीनें आज येथें तर उद्या तेथें अशी लांडगेतोड मांडावी, म्हणजे शत्रु **रायगडाचा** नाद सोडून देतील, अशी त्यांची मसलत. परंतु त्या त्यांच्या शहाणपणाच्या मसलतीचा कांहींच उपयोग झाला नाहीं.

**संताजी** आपल्या सैन्यानिशीं **तुळापुराजवळजवळ** जातो तों त्याला अशी बातमी लागली कीं, **बादशहाच्या** हुकुमानें **झुलफिकारखान** बरोबर वीस हजार सैन्य घेऊन **रायगडावर** जाण्याकरितां एक दोन मुक्काम निघून गेला आहे. तेव्हां आतां आपण इकडे न राहतां, आलों तसेच मागल्या पावलीं **पन्हाळ्याकडे** परतावें व **झुलफिकारखान रायगडाकडे** निघून गे-

ह्याचें वर्तमान मल्हारपंतांस कळवून एकदम पुढील तजविजीस लागावें, असें संताजीस वाटलें. पण येथवर येऊन तसेच रिकाम्या हातानें परत जाणें बरोबर नाहीं असें मनांत येऊन त्यानें शत्रूंस आपण आल्याची खूण देण्याचा निश्चय केला. बादशहाच्या छावणीपासून सुमारें दहा कोसांच्या छप्यानें झाडींत एक दोन दिवस मुक्काम करून त्यानें गुप्त रीतीनें शत्रूंकडील एकंदर माहिती घेतली व तिसरे दिवशीं आपला बेत सिद्धीस नेण्याविषयीं त्या उभयतां घोरपडे बंधूंचा विचार ठरला. आठशें पायदळ फौज बरोबर घेऊन त्यांनीं विठोजी चव्हाण यास पुढें पाठविलें. त्याप्रमाणें तो सरदार आपले लोक बरोबर घेऊन मध्यरात्रीच्या सुमारास उत्तरेकडील बाजूनें शत्रूंच्या गोटांत शिरल्यामुळें त्यांची एकच धांदल उसळून गेली. कित्येक मोंगल सरदार व शिपाई जागे होतात व अंधारांत आपलीं शस्त्रें हुडकितात, तों मराठ्यांनीं हजारों लोक जागच्या जागीं चीत केले. अशा रीतीनें चव्हाणानें मोंगल बेसावध असतां एकाएकीं त्यांजवर हल्ला करून आपली कामगिरी बजाविली, व शत्रु पुरते जागे होऊन चालून येतात तों पूर्वसंकेतानुरूप माघार घेतली.

शत्रु मागें परतलेले पाहून, त्यांच्या ह्या आकस्मिक घाल्यानें त्वेषास चढलेले हजारों मोंगल दांतओंठ खात, कोणी घोड्यावरून व कोणी पायींच त्यांचा पाठलाग करीत सुटले. मराठे पुढें पळताहेत व मोंगल मागें लागले आहेत अशा स्थितींत ते उभयतांही तेथून

दोन कोसांवर एक नाला होता तेथवर येऊन पोंचले. ते वद्य पक्षांतील दिवस असल्यामुळें चंद्र नुकताच क्षितिजावर येत चालला होता. अशा वेळीं शत्रु **मराठ्यांचा** पाठलाग करीत नाल्यांत उतरतांच एकीकडून **संताजी** व दुसरीकडून **बहिरजी** असे दोघे बंधु दोन दोन हजार स्वारांच्या टोळींनिशीं **हरहर** शब्द करीत एकदम **मोंगलांवर** तुटून पडले. मग काय विचारतां! आधींच ते चवताळलेले **मोंगल;** त्यांत त्यांजवर हा असा अवचित प्रसंग येऊन गुदरल्यामुळें जिवाची आस्था सोडून ते **मराठ्यांशीं** लढूं लागले. तास दीडतास एकसारखी कत्तल चालली होती. शत्रूंनीं लढण्याची जरी शर्त केली, तरी **संताजी** व **बहिरजी**सारख्या रणधीर वीरांच्या कचाट्यांत सांपडल्यामुळें त्यांची फारच दुर्दशा उडून गेली. रक्त व मांस यांचा चिखल उसळून नालाभर पहावें तिकडे जायबंदी झालेल्या घोड्यांच्या व प्रेतांच्या राशी दिसूं लागल्या. बहुतेक **मोंगल** 'या **अल्ला,** या **खुदा,** कैसा बुरा वख्त लाया' असा करुणारव काढीत पडल्या जागींच प्राणास मुकले. बाकीचे जिवाच्या आस्थेनें ज्याला जिकडे मार्ग सांपडला तिकडे पळत सुटले. याप्रमाणें हातीं घेतलेलें काम फत्ते होतांच **संताजी** जयघोष करीत शत्रूंचे जिवंत राहिलेले कित्येक घोडे व युद्धोपयोगी सामान बरोबर घेऊन **पन्हाळगडीं** दाखल झाले.

त्या उभयतां **घोरपड्यांचें** व **विठोजीचें** हें धाडसपणाचें कृत्य पाहून सर्वांस मोठेंच आश्चर्य वाटलें.

**मल्हादपंतांनीं** त्रिवर्गाच्या शौर्याबद्दल फार तारीफ करून त्यांच्या पाठी थोपटल्या, व त्यांस वस्त्रेंभूषणें दिलीं. इतकें होत आहे तों तिकडे **झुलफिकारखान रायगडास** पोंचून त्यानें किल्ल्यास वेढा दिला, अशी बातमी येऊन पोंचली; पण वीस हजार सैन्यावर चालून जाऊन **झुलफिकारखाना**सारख्या बलाढ्य सरदारास मागें परतविण्याजोगी फौज आपल्यापाशीं नसल्यामुळें **कोंकणांत** उतरून तिकडून सैन्याची भरती करण्याविषयीं यत्न करावा, असा विचार मनांत आणून **मल्हादपंत, रामचंद्रपंत, धनाजी, संताजी, खंडो बल्लाळ** इतकी मंडळी **राजारामा**सहवर्तमान **पन्हाळ्याहून विशाळगडीं** जावयास निघाली. मागें हुशारीनें वागून शत्रूंस कोणत्याही तऱ्हेचें वर्तमान लागूं न देतां किल्ल्याचें संरक्षण करण्यासाठीं पांच हजार फौज व **कागलकर, चव्हाण, बहिरजी,** वगैरे शूर सरदार यांस किल्ल्यावर ठेविलें.





# भाग ५ वा.

---o:o---

॥ दुष्टः परै रुपकृतस्तदनिष्टकारी ।
विश्वासलेश इहनैव बुधैर्विधेयः ॥

मोंगल सरदार झुलफिकारखान तुळापुराहून निघाला तो रायगडीं दाखल होऊन त्यानें किल्ल्यास मोर्चेबंदी केली असें मागें सांगितलेंच आहे. पण किल्ल्यावर वर्षसहामहिने पुरण्याजोगी अन्नसामुग्री असल्यामुळें व आंतील लोक मोठ्या बंदोबस्तानें वागत असल्यामुळें शत्रूंचा कोणत्याही रीतीनें लाग चालेना. बरेच दिवस झाले; पण किल्ला अवघड जागीं असल्यामुळें मोंगलांच्या तोफा कोणीकडूनही लागू होईनात. तेव्हां झुलफिकारखान अगदीं कंटाळून जाऊन शेवटीं त्यानें किल्ल्यास शिडी लावण्याचा निश्चय केला. प्रथम शत्रूंशीं लढण्याचें मिष करून तोफांचा भडिमार सुरू केला, व हाताखालच्या सरदारांस समोरून किल्ल्यावर हल्ला करावयास सांगून आपण स्वतः दुसऱ्या बाजूनें तटास शिडी लाविली. त्या शिडीवरून कांहीं लोक वर चढले व कांहीं चढताहेत तों कित्येक मराठ्यांचें लक्ष्य तिकडे गेलें. त्यासरशी हजारों मराठेगडी एकदम तिरासारखे मोंगलांच्या आंगावर धांवले. त्यांनीं मोठ्या त्वेषानें वर चढलेल्या एकंदर लोकांची कत्तल उडविली व

शिड्या कापून टाकिल्या. अशा रीतीनें आपण केलेली मसलत **मराठ्यांनीं** हाणून पाडिली असें पाहून तो कडवा **मोंगल सरदार** फारच खिन्न झाला. किल्ला अवघड ठिकाणीं असल्यामुळें त्याचा कांहींच इलाज चालेना. तेव्हां शेवटीं त्यानें असा विचार केला कीं, **संभाजी**च्या वधामुळें क्रोधास चढलेले **मराठे** जिवाकडे न पाहतां लढण्यास सिद्ध झाले आहेत, तर अशा वेळीं त्यांच्यांशीं युद्ध करण्यापेक्षां दुसरी एखादी युक्ति लढवून पहावी. साम, दाम, दंड आणि भेद हे जे शत्रु जिंकण्याचे चार उपाय आहेत त्यांपैकीं शेवटचा उपाय साध्य झाल्यास फारच उत्तम, असें मनांत आणून त्यानें शोध करविला. शोधाअंतीं त्याला असें समजून आलें कीं, **शिवाजी**च्या वेळचा कोणी **सूर्याजी पिसाळ** नांवाचा शूर शिपाई किल्ल्यावर असून त्याला तेथील एकंदर चोर वाटा माहीत आहेत. तेव्हां तो वश झाला असतां आपला कार्यभाग खचीत शेवटास जाइल, असें **झुलफिकारखाना**स वाटलें. पण ही मांजराच्या गळ्यांत घांट बांधली जावी कशी? **सूर्याजी** ह्मणजे साधारण शिपाई नव्हे. तो पूर्वींपासून **शिवाजी**सारख्या स्वातंत्र्यप्रिय धन्याच्या हाताखालीं वागलेला सवरलेला विश्वासु गडी. तेव्हां अशा मनुष्यास वश करून घेणें व त्याच्याद्वारें आपला मनोरथ सिद्धीस नेण्याचा प्रयत्न करणें ह्मणजे खरोखरच सुळावरची पोळी. आधीं किल्ल्यावर गुप्तपणें चढून जाऊन **सूर्याजी**ची एकांतीं गांठ घेणें हीच गोष्ट दुःसाध्य; त्यांतून द्रव्याच्या आशेनें

एखादा धाडसी मनुष्य जिवाची आशा सोडून किल्ल्यावर जाण्यास सिद्ध झालाच, तरी **सूर्याजी** बधतो ह्मणण्याचा काय नेम? एखादी गोष्ट त्याजपाशीं काढिली किंवा मधाचें बोट लाविलें आणि कदाचित् त्याची अप्रतिम स्वामिभक्ति, स्वराज्यरक्षणाची खरी कळकळ व स्वदेशसेवेचा त्याच्या अंतःकरणांत वाढीस लागलेला अंकुर यांनीं त्याला आशेच्या स्वाधीन होऊं दिलें नाहीं, तर मग "**भीक नको पण कुत्रा आवर**" अशी आपली अवस्था होऊन ते कपटी **मराठे** आपलीं बोटें आपल्या डोळ्यांत घालावयास कधींही चुकणार नाहींत. असे विचारतरंग त्या **मोंगल सरदाराच्या** मनांत घोळत आहेत तों त्याला समजलें कीं, **वांईची देशमुखी** आपल्यास मिळावी, असा **सूर्याजी**चा बहुत दिवसांपासूनचा हेतु आहे. तेव्हां तो त्याचा हेतु पुरविण्याविषयींचें आपण त्याला वचन दिल्यास तो वश होऊन आपलें काम फत्ते होईल, असें मनांत आणून **झुलफिकारखान** त्या उद्योगास लागला व त्याला त्यांत यश ही आलें. **रायगडची किल्लेदारी** व **वांईची देशमुखी** यांविषयींचें अभिवचन मिळतांच **सूर्याजी** आशारूप मायावी राक्षसीच्या स्वाधीन होऊन स्वामिघात करण्यास प्रवृत्त झाला.

लोभाच्या जबरदस्त तडाक्याचा ज्यांच्या चित्तवृत्तीवर मुळींच परिणाम झाला नाहीं, किंवा अभिमान, विश्वास, स्वदेशप्रीति, खरेपणा, बंधुवात्सल्य, परोपकारबुद्धि, कर्तव्यजागृति इत्यादि भूषणावह गुण ज्यांच्या-

ठायीं दूषणास पात्र झाले नाहींत, अशीं मानवकोटींतील अनुपम रत्नें जगाच्या इतिहासांत फारच थोडीं सांपडतात. त्यांतून ह्या आपल्या भरतभूमींत तर आलीकडे वरील गुणांचें बीं मुळींच रुजेनासें झालें आहे, असें ह्मटलें तरी चालेल. कारण अतिलोभ, मत्सर, विश्वासघात, फंदफितूर, घरभेदीपणा, परोत्कर्षासहिष्णुता व कृतघ्नपणा यांच्या घातुक मुळ्यांनीं ही जमीन इतकी नादान करून टाकिली आहे कीं, तींत हल्लीं कोणत्याच स्तुत्य व अमोलिक गुणांचें पीक येत नाहींसें होऊन आपण आज असे अन्नान्नदशेस पोंचलों इतकेंच नव्हे, तर स्वराज्य आणि स्वातंत्र्यसुख यांची ओळख देखील आह्मांस नाहींशी झाली. आमच्या देशांतील गजांतलक्ष्मी, आह्मांमधील देदीप्यमान वीर, सार्वभौम नृप व राजकार्यधुरंधर आणि आटोकाट बुद्धीचे कर्ते पुरुष यों फंदफितूरानेंच धुळीस मिळवून आह्मांस असे परवशतेचे दासानुदास बनवून टाकिलें. तस्मात् नमस्कार असो त्या बयेला ! !

कैक वर्षें स्वामिसेवेच्या ठायीं तनमनधन अर्पण करून संपादिलेल्या लौकिकावर व कर्तव्यकर्मावर शेवटीं तिलांजलि सोडण्यास देशमुखीच्या लोभानें सूर्याजीस प्रवृत्त केलें. शिवशिव! ज्या भरतभूमीच्या पोटीं आजपर्यंत अनेक पुण्यपुरुष जन्मास आले तिच्याच उदरीं सूर्याजीसारखे अधमाधम, कुलांगार, व स्वदेशबांधवांच्या स्वातंत्र्यसौख्याचे उभे वैरी असे कुपुत्र निपजावेत काय? पण निपजले व निपजतात तेथें

इलाज नाहीं. आपल्या अमृतकरांनीं संपूर्ण जगास सं- तुष्ट करणारा **विधु** व आंगच्या उग्रदर्पानें त्रिभुवन दग्ध करणारें **काळकूट** हीं दोन्हीं विरोधीगुणांचीं रत्नें एकाच सागराच्या पोटीं निर्माण झालीं; मग पृथ्वीच्या पोटीं तशा प्रकारचीं रत्नें कां बरें निपजूं नयेत ?

'**कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ**' असें ह्मणतात तें कांहीं खोटें नव्हे. **सूर्याजीच्या** निमकहरामपणामुळें किल्लयावरील चोरवाटा शत्रूंस समजल्या, व त्यासरसे हजारों म्लेंच्छ **दीनदीन** करीत किल्ल्यावर चढले. श- त्रू वर आलेले पाहतांच '**दगारे दगा**' असें ह्मणून सर्व **मराठे** चवताळून एकदम पिसाळलेल्या वाघासारखे शत्रूंवर धांवले. **मोहिते, निंबाळकर, जगताप** इ- त्यादि वीर सिंहगर्जना करीत, व विद्युल्लतेसारखे चम- कत शत्रूंच्या सैन्यांत शिरले. धरा, मारा, हाणा या शब्दांनीं सर्व किल्ला दणाणून गेला. परस्परांचें आंगा- स आंग भिडून तरवारीचे सपासप वार होऊं लागले. प्रथम मराठ्यांनीं बरीच कर्तबगारी बजाविली; पण पा- ण्याच्या लोंढासारखें शत्रुसैन्य जेव्हां तटावर पसरलें तेव्हां **मराठ्यांची** दाणादाण उडाली. हजारों वीर गतप्राण होऊन किल्ल्याच्या तटावर पडले. कित्येकांनीं जिवाकडे न पाहतां तटावरून खालीं उड्या घेतल्या, व कित्येक तशा धांदलींत युक्तीनें किल्ल्यावरून उत- रून पार पडले. त्यांतच पुढें बिकट प्रसंगीं धन्याच्या उपयोगी पडलेला **उदाजी** हा होता. याप्रमाणें **मरा- ठ्यांची** दुर्दशा उडून **झुलफिकारखानाचें** कृष्णकार-

स्थान शेवटास गेलें व सन १६९० त **मोंगलांचा** विजयध्वज **रायगडावर** फडकूं लागला. **राजाराम, धनाजी, संताजी, प्रल्हादपंत** वगैरे मंडळी पन्हाळ्याकडे निघून गेली हें **झुलफिकारखानास** पूर्वींच समजलें असल्यामुळें किल्ला हातीं येतांच त्या सरदारानें **येसूबाईस** सांगून पाठविलें कीं, तुह्मी आमचे स्वाधीन झाल्यास तुमच्या जिवाला किंवा अब्रूला किमपि धक्का लागणार नाहीं; नाहींपेक्षां रीतीप्रमाणें व्यवस्था करणें भाग पडेल.

पहा, कालदशेचा महिमा किती अतर्क्य आहे तो! ज्यानें थोड्याच कालापूर्वीं आपल्या क्षात्रतेजानें व अपूर्व करामतीनें स्वसामर्थ्याचा, ऐश्वर्याचा, व धर्माचा तोरा मिरविणाऱ्या **मोंगलांचा** गर्व परिहार करून **भोंसले** कुल धन्य केलें, ज्यानें परधर्मियांच्या असह्य जाचामुळें टेंकीस आलेल्या स्वदेशबांधवांसाठीं अश्रांत श्रम करून त्यांस स्वराज्य व स्वातंत्र्यसुख यांची जोड दिली, ज्यानें धैर्य, शौर्य, स्वदेशाभिमान, हिंमत, बंधुप्रीति व ऐक्य या गुणांचें बाळकडूं पाजून **महाराष्ट्रियांस** शूर, लढवय्ये व युद्धविद्याविशारद करून सोडिलें, ज्यानें **अफझुलखान, मोहबतखान, शाहिस्तेखान** अशा एकापेक्षां एक उग्र व महासामर्थ्यवान् सरदारांस ‘ **तोबा तोबा** ’ असें ह्मणवायास लावून त्यांची खात्रीच करून सोडिली, व ज्या **महाभाग्यशाली** पुरुषानें आपल्या अद्भुत कृतीनें व पुऱ्या अकलेनें **सार्वभौम दिल्लीपतीसही** क्षणभर चकित करून टाकिलें,

त्या सकलगुणैश्वर्यमंडित **शिवछत्रपतीची येसूबाई** ही प्रत्यक्ष स्नुषा; आणि त्या वीरस्नुषेस **झुलफिकारखाना**-सारख्या सरदारानें दरडावून आपल्या स्वाधीन होण्याविषयीं निर्धास्तपणें निरोप पाठवावा, ह्मणजे काळदशेचा हेरा नव्हे तर काय? '**कालस्य कुटिला गतिः**' असें ह्मणतात, तें अगदीं अक्षरशः खरें आहे.

**येसूबाई** ह्मणजे साधारण **स्त्री** नव्हे. ती आटोकाट शहाणी, धीराची, व व्यवहारचतुर बायको खरी; पण करते काय? वैऱ्यावर देखील येऊं नये, असा बुरा वख्त तिजवर गुदरला. आधींच ती पतिनिधनदुःखानें होरपळून गेलेली, तशांत कुलकलंक **सूर्याजीच्या** नीच व दुःखद कृतीनें परवशतेचें दुःख भोगणें तिच्या कपाळीं आलें; तेव्हां तिचें काळीज करपून जाऊन ती दीन गाय आपल्या पाडसाच्या संरक्षणाकरितां शत्रूच्या निर्भयपणाच्या वचनास मान्य झाली यांत नवल नाहीं. पुरुषासारखे पुरुष देखील अशा प्रसंगीं घाबरून शत्रूच्या कचाट्यांत सांपडले असते; मग **येसूबाई** तर सांगून सवरून अबला. तेव्हां तिनें असा विचार केला कीं, आतां दुराग्रह धरून किंवा अविचारानें वागून कोणताच पल्ला पोंचणार नाहीं. ईश्वराच्या इच्छेस असेंच आलें, तेथें काय करणार? जशी ती **कुलस्वामिनी** ठेवील, तसें राहिलें पाहिजे. अशा दुःखद स्थितींतून्ही पार पाडून सुदिन दाखवावयाचे असल्यास ती **भवानी** समर्थ आहे! **मोंगल** ह्मणजे महादुष्ट व निर्दय कसाब. त्यांना विवेक, नीति किंवा सभ्यपणा यांचा गंधही अ-

सावयाचा नाहीं. असें असतां, उदारबुद्धीस व खऱ्या थोरपणास शोभणारा जो हा त्या **मोंगलसरदारानें** निरोप पाठविला आहे, त्याचें कारण तीच आपली **पाठराखी** नसेल कशावरून? ती कृपा करणार झाल्यास काय हवें तें होईल. असा विचार करून **यसूबाई**नें प्रथम त्या सरदाराचें अभय आश्वासन आणविलें; आणि मग **शिवाजीस** त्याच्या स्वाधीन करून सांगितलें कीं, हें मूल माझें नव्हे; आपलें आहे. ह्याचा सांभाळ आपण पाहिजे त्या रीतीनें करावा. हें त्या स्त्रीचें थोरपणाचें भाषण ऐकून **झुलफिकारखानास** अतिशय आनंद झाला. त्यानें आपल्या वचनाप्रमाणें कोणासही उपद्रव न देतां किल्ल्यावरील हत्ती, घोडे, जडजवाहीर, खजिना व उंची वस्त्रें वगैरे धनदौलत आपल्या ताब्यांत घेतली, व हें आनंदाचें वर्तमान **बादशहास** कळविलें. त्याजकडून निरोप येतांच **यसूबाई** व धाकटा **शिवाजी** यांस पूर्वीच्या इतमामाप्रमाणें आपल्याबरोबर वागवून **झुलपिकारखानानें** त्या **मायलेंकरांस** **बादशहाच्या** छावणींत आणिलें.

**संभाजीची** स्त्री **यसूबाई** व पुत्र **शिवाजी** या उभयतांस **झुलपिकारखानानें** आपल्या छावणींत आणिलें आहे, हें वर्तमान **बादशहाची** मुलगी **रोषणार**इला समजतांच ती मोठ्या उत्सुकतेनें त्यांच्या भेटीस आली. **शिवाजीस** पाहतांच त्या राजकन्येनें पूर्वी ज्या **संभाजीमहाराजांस** आपल्या प्राणापेक्षांही प्रिय मानिलें होतें त्या मनोहर रूपाची तिला आठवण होऊन

तिच्या अंतःकरणांत प्रेमाचा पान्हा फुटला. तिनें त्या राजबिंड्यास लागलीच आपल्या मांडीवर बसवून घेऊन त्याचे मटामट मुके घेतले, आणि त्याच्या त्या सुकुमार व गुलजार मुखश्रीकडे पाहून ह्मणाली, "बेटा ही तुझी आई तुला प्रेमल अंतःकरणानें कुरवाळून तुझे बोबडे शब्द ऐकण्याची इच्छा करीत आहे, तर हिच्याशीं बोल एकदां पाहूं. तुझ्या ह्या गोडगोड भाषणाचें कौतुक करण्यास **महाराज** राहिले नाहींत, हें मनांत आलें ह्मणजे काळीज चरचरतें; पण झाल्या गोष्टीस उपाय नाहीं. आतां तरी आमच्या हातून तुह्मां मायलेकरांस सुख होवो, व ह्या बाळाचे सर्व प्रकारचे लाड **रोषणार**च्या हातून पुरोत ह्मणजे झालें. **येसूबाई,** तुह्मीं इतःपर कोणतीहि काळजी न करितां निश्चितपणें रहा. हें शत्रूचें घर नव्हे; आपलें माहेरघर आहे, असें समजा. माझ्या बापाच्या हातून तुमच्या जिवलगाचा घात झाला आहे. तेव्हां तो तुमचा योग्य मानमरातब राखून संरक्षण करील इतकेंच नव्हे, तर **शिवाजी** मोठा झाला ह्मणजे त्याला त्याची जाहगिरी देऊन राज्यपदावर बसवील."

याप्रमाणें उभयतांचें सांत्वनकरून दुसरे दिवशीं **रोषणार शिवाजीस** घेऊन **बादशहा**च्या भेटीस गेली. तिनें आपल्या पित्यास आग्रहपूर्वक विनंति करून सांगितलें कीं, "**महाराज**" **शिवाजी** हा आपला असें समजून त्याचा योग्य रीतीनें सांभाळ होईल, अशी व्यवस्था झाली पाहिजे. कारण ह्या मायलेकरांच्या प्रियकर **पोशि-**

घाचा घात आपल्या हातून झाला असूनही, तें कांहीं एक मनांत न आणितां, त्यांनीं आपलीं जीवितें आमच्या हातीं दिलीं आहेत. तेव्हां, अशांचा सांभाळ पोटच्या पोरापेक्षांही जास्त रीतीनें झाला असतां **सार्वभौम बादशाही**पदाचा लौकिक जगामध्यें वाढून आपण संपादिलेल्या ह्या अवाढव्य राज्यास व आपल्यास दुवा मिळेल. शरण आलेल्यांचें रक्षण करणें हीच खरी राजनीति व हाच खरा थोरपणा होय. तर **येसूबाई** व धाकटा **शिवाजी** या उभयतांस चांगल्या रीतीनें वागवून आपल्यापाशीं ठेवून घ्यावें, म्हणजे ही भूतदया व हें शत्रूच्याठायीं वागत असलेलें आपलें प्रेम संपूर्ण **दक्षिणें**तील **मराठ्यां**च्या मनांत भरून ते आपल्याशीं मित्रभावानें वागूं लागतील; आणि असें झालें म्हणजे आपले मनोरथही निर्विघ्नपणें शेवटास जाऊन **दक्षिणेंत** राहिल्याचें सार्थक होईल." हें **शहाजादी**चें भाषण ऐकून **बादशहास** आनंद झाला, व त्यानें लागलीच तिच्या तंबूजवळच त्या मायलेंकरासाठीं एक निराळा तंबू मारवून त्यांत त्या उभयतांस ठेविलें. त्यांच्या खर्चाबद्दल वगैरे निराळी नेमणूक करून देऊन त्यांची एकंदर व्यवस्था ठेवण्याचें काम **बादशहानें रोषणार** हिजकडेसच सोंपविलें. **येसूबाई**चा सुस्वभाव व तिचा मर्यादशीलपणा, **शिवाजी**चें नम्र भाषण व त्याचे मोहक गुण, आणि त्या उभयतांच्याठायीं आपल्या लाडक्या कन्येची जडलेली प्रीति पाहून **औरंगजेबास** देखील मोठें चोज वाटे. **रोषणार** नेहमीं **येसूबाई**च्या तंबूंत जाऊन त्या मायलें-

करांच्या खाण्यापिण्याची वगैरे सर्व व्यवस्था जातीनें करी व **शिवाजीस** उंची नवेनवे पोषाख व अमोलिक अलंकार घालून त्याचे लाड पुरवी. त्याची ती लीनता व तो त्याचा गरीब स्वभाव पाहून **बादशहा** देखील मोठ्या कौतुकानें त्याला **साहू** ( साव ) या नांवानें हाक मारी. या रीतीनें '**मुखीं साखर आणि उरीं सुरी**' अशा अवस्थेंत तीं मायलेंकरें काळ क्रमीत असतां **संभाजीच्या** वेळचा खरा विश्वासु व जुना मराठा नोकर **भक्ताजी** हा मात्र **बादशहाच्या** परवानगीनें त्यांच्या तैनातीस होता. त्यावांचून दुसऱ्या कोणासही त्यांच्या तंबूंत जाण्यायेण्याची परवानगी नव्हती.

याप्रमाणें **रायगडचें** वर्तमान असतां, तिकडे **दाउदखान** व **रणमस्तखान** हे उभयतां सरदार पन्हाळ्यास पोंचले, व त्यांनीं **पन्हाळा** आणि **पावनगड** या दोन्ही किल्ल्यांस मोर्चेबंदी करून आंतील शत्रूंवर तोफांचा भडिमार चालविला. **कागलकर** व **बंकी** या मराठ्या सरदारांनीं कांहीं वेळपर्यंत दम धरिला होता; परंतु शेवटीं **मोंगलांच्या** आगीपुढें त्यांचें कांहीं चालेनासें होऊन त्यांना ते दोन्ही किल्ले **मोंगलसरदारांच्या** स्वाधीन करावे लागले. **मिरजेचा** किल्ला व त्या खालील सर्व मुलूख **सरजेखानानें** काबीज केला. **सिंहगड प्रतापगड** व **पुरंदर** हे जबरदस्त किल्लेही **बादशहाच्या** हातीं लागले. अशा रीतीनें **महाराष्ट्रांतील** बहुतेक सत्ता लयास जाऊन सर्वत्र **मोंगलांचें** प्राबल्य वाढलें. जिकडे तिकडे **औरंगजेबबादशहाचें** यश

गाजूं लागून **मराठ्यांचा** प्रतापभानु अस्तास गेल्यामुळें **महाराष्ट्र**कमलिनी विरहदुःखानें म्लान होऊन गेली. **औरंगजेबास** तर, **खुदानें** आपले सर्व मनोरथ पूर्ण केले असें वाटून त्याच्या अंतःकरण समुद्रावर आनंदाच्या लहरी उचंबळूं लागल्या. **मोंगलसत्ता** व ऐश्वर्य हीं भरभराटीच्या अत्युच्च शिखरास पोंचून **बादशहा**च्या पदरचे मोठमोठे सरदार व सेना ह्या सर्वांस **दक्षिणें**त कांहीं कालपर्यंत निश्चिंतपणें मजा मारीत रहाण्यास सवड सांपडली.

---

## भाग ६ वा.

———0:0———

॥ रिपौ शौर्यं धैर्यं विपदि विनयः संपदि मता-
मिदं वर्त्म भ्रातर्भरत निरतो यास्यसि सुखम् ॥

सुभाषित.

**रायगड**, **पन्हाळा**, **सिंहगड** वगैरे किल्ले शत्रूंच्या हातीं लागले ही दुःखकारक वार्ता **विशाळगडीं** पोंचली. संपूर्ण **महाराष्ट्र**देश शत्रूंनीं व्यापिला. नवीन जमलेल्या सैन्याची व सरदारांची वाताहात उडून **येसूबाई** व **धाकटे महाराज** शत्रूंच्या हातीं सांपडले. तेव्हां आतां पुढें काय तजवीज करावी व या दुर्धर प्रसंगांतून आपण कसें पार होतों, या काळजीनें **प्रल्हादपंत**, **रामचंद्रपंत**, **राजाराम**, **धनाजी**, **संताजी** वगैरे मंडळी अगदीं दिलगीर होऊन गेली. आज नाहीं उद्यां शत्रूशीं दोन हात करण्याची कुवत

आपल्या अंगीं येईल व आपण आपल्या पूर्वजांचा लौकिक गाजविण्यास समर्थ होऊं अशी जी त्यांची आशा तिचा नुकता फुटत चाललेला अंकुर शत्रूंच्या प्रखर तापानें जळून गेल्यामुळें आतां आपलें डोकें खचीत वर होत नाहीं, असें सर्वांस वाटूं लागलें.

**राजारा०**:–पंत, शत्रूंनीं कपटानें डाव साधून आज खरोखरच **मराठेशाई** बुडविली. आतां ह्या **भोंसले** कुलाचा शेवट काय होणार, हें कांहीं समजत नाहीं. राज्यवैभवामध्यें बहुतेक जन्म घालविलेल्या **वयनी**वर व त्या सुकुमार **राजबिड्या**वर दुर्दैवानें असा प्रसंग आणावा व तो आह्मी या कानांनीं ऐकावा, असाच ईशसंकेत होता काय? ज्या मायलेकरांस आजपर्यंत परक्यांचा उंबरठा देखील माहीत नव्हता, त्यांजवर परवशतेसारखीं दुःसह दुःखें भोगण्याची वेळ येण्यास कांहीं अंशीं आह्मीच कारण झालों. **वयनींना** आपण काय सांगून बाहेर पडलों आणि काय झालें! **सूर्याजी**, तुझ्या आजपर्यंतच्या कीर्तिरूप बिंबाला ग्रासून टाकणारी **देशमुखी**बद्दलची ती अनावर आशा आतां तरी तृप्त झालीना? अशा अधमपणाचें कृत्य करण्यास प्रवृत्त न होतां तूं कृतज्ञताबुद्धीनें कर्तव्यास जागून आपल्या जन्माचें सार्थक केलें असतेंस तर पुढेंमागें ईशकृपेनें तुला अशा शंभर **देशमुख्या** मिळाल्या असत्या व तूं आपल्या दिव्य तेजानें संपूर्ण जगास दिपविलें असतेंस. पण तसें कसें होतें! दैव प्रतिकुल झालें ह्मणजे सर्व गोष्टी विपरीत व्हावयाच्याच. त्यानें-

च जर या **भोंसले** कुलाचा हात सोडिला, तर आह्मी आणखी कांहीं केलें ह्मणून काय होणार! तेव्हां आतां शेवटचा उपाय ह्मटला ह्मणजे एक सोक्ष किंवा मोक्ष. क्षात्रकुलांत जन्म घेतल्याप्रमाणें शत्रूंचीं गर्दनें समरभूमीस अर्पण करून पूर्वजांचा कीर्तिध्वज दिगंतरीं फडकवावयाचा; नाहींपेक्षां रणामध्यें छातीवर वार घेत असतां हे पृथ्वीस भारभूत झालेले देह धारातीर्थीं अर्पण करावयाचे. शत्रूंच्या हातून अपमान करून घेऊन आयुष्याचे दिवस कंठण्यापेक्षां मरण बरें. क्षत्रियांस लढाईंत पडून मरण्यासारखें दुसरें पुण्य नाहीं. तर या वेळेस यशापयशाची भीति न बाळगतां धैर्यानें एकदम शत्रूंवर चालून जाण्याची तयारी करावी, असें माझ्या बुद्धीस वाटतें. **धनाजी संताजी**सारखे कट्टे वीर शत्रूंस एकाएकीं ह्मणजे हार जातील, असें नाहीं. मग भेकडपणा जगास दाखवून दुष्कीर्ति पदरीं कां घ्यावी? ईशकृपेनें आपण विजयी झालों तर आपली कीर्ति मागें अमर राहील; नाहींपेक्षां स्वदेश रक्षणासाठीं हे देह भूमीवर पतन पावले असतां मोक्ष मिळेल.

**रामचंद्रपंतः**—**महाराज**, पूर्वजांच्या पराक्रमाची व त्यांनीं थोडक्या काळांत जें एवढें यश संपादिलें त्याची आठवण झाली ह्मणजे आपण जन्मून केवळ खावयास काळ आणि भूमीस भार मात्र झालों, असें मनांत येऊन जिव नकोसा होतो इतकेंच नव्हें, तर असल्या कंगाल व लाजिरवाण्या स्थितींत जिवंत राहण्यापेक्षां मृत्यु बरा, असें वाटतें हें खरें. पण कोणत्याही वेळीं अविचाराच्या

स्वाधीन होऊन उतावीळपणा करणें किंवा नशीबावर हवाला ठेवून साहस करण्यास उद्युक्त होणें योग्य नव्हे. '**मर्दे तकवा सोडूं नये। ह्मणजे प्राप्त होतो जय। कार्य प्रसंग समय। ओळखावा**' ही थोरांची उक्ति सदोदित लक्षांत ठेविली पाहिजे. तुफानानें खवळून गेल्यामुळें लाटांवर लाटा उसळत असलेल्या भव्य व अफाट सागरांत मोठा पोहणारा असला तरी काय करणार? तद्वत् बिनतोड प्रसंग प्राप्त झाला ह्मणजे मोठे शूर योद्धे असले तरी त्यांचें तेज लोपून जातें. साहस कर्म करून फल प्राप्ति कधींही होत नाहीं. मग मागचा पुढचा विचार न करितां चौऱ्यांशी लक्ष योनी फिरून एकवार प्राप्त झालेल्या नरदेहाची उगीच समरकुंडीं आहुति देण्यांत पुरुषार्थ तो कोणता व त्याच्या योगानें जन्मास आल्याचें फळ तें काय होणार? तसें मरणें कोणत्याही रीतीनें श्रेयस्कर नव्हे. तर ते तुह्मांसारख्या राजकुलोत्पन्न पुरुषाच्या किंवा **संताजी, धनाजी**सारख्या स्वामिभक्तिपरायण व शौर्यशाली मर्दांच्या वांट्यास न येवो, एवढीच ईश्वरापाशीं प्रार्थना आहे. **प्रल्हादपंतां**सारखे शहाणे, अनुभवी, युक्तिमान् व कसलाही प्रसंग आला असतां न डगमगणारे पुरुष सुदैवानें आज आपल्यास लाभले आहेत; तेव्हां धैर्य धरून त्यांच्याच धोरणानें आपण सर्व वागत गेलों, तर ते आह्मांस असल्याही अरिष्टांतून पार नेऊन पूर्वजांचे दिव्य यश जगांत गाजविण्याचा मार्ग खचीत दाखवितील, असें मला वाटतें.

**धनाजीः**–**रामचंद्रपंत**, ज्या **मराठ्यां**च्या कुलांनीं आजपर्यंत अनेक प्रसंगीं अद्वितिय शौर्य गाजवून **औरंगजेबा**सारख्या बादशहास तोंडांत बोट घालावयास लाविलें, त्यांचेच वंशज आह्मी जिवंत असतां **आईसाहेब** व **धाकटे महाराज** यांस परधर्मी शत्रूंच्या घरीं पाणी पिण्याची वेळ यावी, या सारखी लांछनाची दुसरी कोणतीच गोष्ट नाहीं. ऐश्वर्यामुळें धुंद होऊन गेलेल्या **मोंगलांनीं** आह्मांस निर्माल्यवत् मानून संपूर्ण **महाराष्ट्रि**यांच्या धवल यशास जो हा कालिमा लाविला तो धुऊन टाकण्याचें कामीं काहींही होवो, कोणतींही संकटें भोगावीं लागोत, किंवा प्रत्यक्ष प्राणावरही येऊन बेतो, पण हा **धनाजी** शत्रूंचा सूड घेतल्यावांचून कदापि रहावयाचा नाहीं. त्या नीचांच्या कपटी वर्तनानें संतप्त होऊन गेलेल्या या **महाराष्ट्रभू**मीस त्यांच्या रक्तपातानें निवविण्याचा समय येईल तो सुदिन. **सूर्याजीच्या** निमकहरामपणामुळें आज आह्मांस जगावर तोंड दाखविण्यास देखील जागा उरली नाहीं ही गोष्ट मनांत आली ह्मणजे काळीज फाटतें व क्रोधाग्नीनें अंगाचा भडाका उसळून **महाराजां**प्रमाणेंच आमचाही जीव वैतागतो; पण आपल्यासारख्या दूरदर्शी पुरुषांचे विचार ऐकिले ह्मणजे पुनः वाटतें कीं, साहसानें मृत्युमुखांत उडी टाकून काय होणार ! ईश्वरानें जो हा नरदेह दिला आहे त्याचा कोणत्यातरी महत्कार्याचे ठायीं उपयोग व्हावा, नाहीं तर सर्व व्यर्थ. पुढील पिढीच्या अंतःकरणांत आपल्याविषयीं पूज्यबु-

द्धि उत्पन्न होण्यासारखी कर्तबगारी करून त्यांच्या मानास आपण पात्र झालों नाहीं, तर काय उपयोग? जन्मास आलेल्या प्राण्यामागें मृत्यु हा आहेच.

**मल्हाद**:—शाबास, **धनाजी**, शाबास. **महाराजां**च्या मनांत आपल्या कर्तव्यकर्माविषयींची दिसणारी जागृति आणि **रामचंद्रपंतांचें** व तुमचें हें दिलदारीचें भाषण ऐकून कोणाच्या अंतःकरणांत हर्षाच्या गुळगुल्या होणार नाहींत? पदरच्या मंडळींचा हा हिय्या व एकदिलपणा पाहून मी खचीत सांगतों कीं, आपण एक नाहीं एक दिवशीं तरी पूर्वजांचें यश संपूर्ण **भरतखंडांत** गाजविण्यास समर्थ झाल्यावांचून रहाणार नाहीं. मागें **शिवछत्रपतीं**च्या वेळीं ह्या मराठी राज्यावर जे अनेक बिकट प्रसंग व असाधारण अरिष्टें गुदरून गेलीं, त्यांच्या पासंगास देखील आजचा प्रसंग लागणार नाहीं. ‘ **धीर सो गंभीर** ’ संकट समयीं धीर न सोडणें हेंच शूरांचें काम. संकटें आल्यावांचून मनुष्याच्या खऱ्या गुणांची परीक्षा होत नाहीं. ‘ **चिंतासे चतुराई घटे। दुःखसे घटे शरीर** ’ असें ह्मटलें आहे, तें खोटें नव्हे. दिल फाटूं न देतां धिमेपणानें प्रभुकार्यासाठीं तुह्मांसारख्या वीरांनीं कंबर बांधिली तर हेही दिवस निघून जातील. शत्रूंनीं कपट लढवून **रायगड** घेतला, किंवा आपलें सर्व राज्य हरण केलें तरी आमचा एक **धैर्यनग** खंबीर असला ह्मणजे त्यावर असले शंभर **रायगड** नवीन बांधितां येतील. ‘ **शीर सलामत तो पगडी पचास** ’ शत्रु जातात कोठें?

त्यांची व आपली जन्माची गांठ आहे. पण आजच मात्र उतावीळपणा करून उपयोगाचें नाहीं. कारण शत्रूंचा आज बोलबाला आहे. त्यांच्या जय्यत तयारी पुढें आपल्या अल्पबळाचें काय चालणार? **पाहोन समजोन कार्य करणें । तेणें कदापि नये उणें । कार्य कर्त्याच्या गुणें । कार्य भाग होतो ॥** हें चित्तांत वागवून शत्रु घांटमाथा चढण्यापूर्वीच आपण येथून बाहेर पडून दूर कोठें तरी जाण्याची तजवीज करावी, हें आज माझ्या बुद्धीस योग्य दिसतें. पुढील विचार मागाहून करितां येईल.

याप्रमाणें भाषणें झाल्यावर दुसरे दिवशीं, **राजाराम महाराजांस** घेऊन कांहीं मंडळींनीं तेथून बाहेर पडून **कर्नाटक**चा पल्ला झेंपावा, असें सर्वांच्या विचारें ठरलें. कारण, तिकडे अद्याप **मोंगलांचें** प्राबल्य वाढलें नसून **चंदीचा** बळकट किल्ला व त्या खालचा बहुतेक मुलूख **मराठ्यांच्या** ताब्यांत असल्यामुळें तिकडे जाऊन जमल्यास हर प्रयत्नेंकरून पुनः मसलत बळावण्याचा यत्न करावा, असा **प्रल्हादपंतांचा** विचार होता. परंतु संपूर्ण **महाराष्ट्रांत** व **कर्नाटकच्या** सरहद्दीवर शत्रूंचें सैन्य समुद्रासारखें पसरलें असून बहुतेक मार्ग रोंखले गेल्यामुळें **महाराजांचे** कबिले व सर्व सरंजाम घेऊन बाहेर पडणें धोक्याचें होतें. तेव्हां फक्त **राजाराम, प्रल्हादपंत, खंडो बल्लाळ, धनाजी, संताजी, खंडेराव दाभाडे** इतकी खाशी मंडळी व दहा पांच नोकर एवढ्यांनींच बाहेर पडावें, व **रामचंद्रपंत** वगैरे बा-

कीच्या मंडळींनीं **विशाळगडींच** राहून कांहीं दिवसपर्यंत कबिल्यांचें संरक्षण करावें, असा बेत ठरला. त्याप्रमाणें पुढें सुचनेदाखल **चंदी** येथील किल्लेदार **माहाडीक** व कारकून **हणमंते** यांस जासुदाबरोबर पत्रें रवाना झालीं. इतकी व्यवस्था लागल्यावर दूर **कर्नाटकीं** जाण्यापूर्वीं एकदां आपल्या समर्थ **गुरुमहाराजांचें** दर्शन घ्यावें असें मनांत येऊन **प्रल्हादपंत विशाळगडाहून** गुप्तपणें **ब्रह्मनाळास** आले.

**सांगली** पासून सुमारें दोन कोसांवर **ब्रह्मनाळ** ह्मणून एक छोटासा गांव आहे. तेथें **आनंदमूर्तिस्वामी** या नांवाचे कोणी साधु रहात असत. ते मुळचे गृहस्थाश्रमी वैदिक ब्राह्मण असून कांहीं कारणानें त्यांस उपरति झाल्यामुळें ते साधु बनले होते. पुढें त्यांची योग्यता वाढतां वाढतां इतकी वाढली कीं, ते **साधुपंचायतनापैकीं** * एक साधु होऊन बसले, व त्यांची कीर्ति सर्वत्र पसरली. हेच परमहंस **भगवद्भक्त प्रल्हादपंतांचे** कुलगुरु होत. **शिवछत्रपतींचे** गुरु जसे समर्थ **रामदास** तसे **प्रल्हादाचे आनंदमूर्ति**. प्रजापीडक **म्लेंच्छांच्या** जाचांतून स्वदेश बाधवांस मुक्त करण्या करितां जसा **शिवाजीस** समर्थांचा उपदेश, तद्वत्च **संभाजीच्या** मागें **औरंगजेबानें** बहुतेक **मराठेशाई** लयास नेली असतां **प्रल्हादपंतांनीं** राजकारण लढवून पुन्हा राज्याची जी उभारणी केली आणि **धनाजी, संता-**

---

* रामदास स्वामी, जयराम स्वामी, रंगनाथ स्वामी, आनंदमूर्ति, व केशवमूर्ति हे त्यावेळचें साधुपंचायतन होय.

जीसारख्या हिंमतवान् व प्रतापी **मराठे** गड्यांस हातीं धरून **हिंदुपदपादशाहीचें** पुनरुज्जीवन केलें, त्याला **आनंदमूर्ति** स्वामींचाच उपदेश कारणीभूत झाला. '**नाभ्यर्थितोऽपि जलदः सलिलं ददाति ॥ संतः स्वयं परहितेषु कृताभियोगाः**' असें ह्मटलें आहे, तें कांहीं खोटें नव्हे. अशा प्रकारच्या विभूति केवळ जगदुद्धारार्थच केव्हां केव्हां निर्माण होतात. असो. या सत्पुरुषाची समाधि अद्याप **ब्रह्मनाळास** असून तेथील खर्चाबद्दल बरेंच मोठें उत्पन्न सरकारांतून चालत आहे. ह्या गुरुमाउलीच्या ठायीं **प्रल्हादपंतांची** निस्सीम भक्ति असल्यामुळें **कर्नाटकीं** जाण्याचें ठरतांच ते त्यांचें दर्शन घेण्याकरितां **ब्रह्मनाळीं** आले.

**स्वामींचें** दर्शन होतांच त्यांचे चरणारविंदीं मस्तक ठेवून **प्रल्हादपंतांनीं** विनंति केली, "हे दीनदयाळ गुरुमूर्ते, आज या **प्रल्हादावर** कसा प्रसंग गुदरला आहे, हें आपण जाणतच आहां. वडिलांच्या मागें **हिंदुपदाची** या दासाच्या हातून कांहीं सेवा घडावी, अशी फार इच्छा होती; पण आज शत्रूंनीं चोहोंकडून अगदीं घेरून टाकिल्यामुळें आतां सर्वच गोष्टी लयास जाण्याचा प्रसंग आला आहे. परधर्मी **म्लेंच्छांच्या** जाचानें दीन होऊन गेलेल्या **हिंदुप्रजेची** व **मराठी** राज्याची पुढें काय अवस्था होणार, हें कांहीं सांगवत नाहीं. **रायगड** तर शत्रूंच्या हातीं लागला. **येसूबाईसाहेब** व धाकटे **शिवाजी** या उभयतां मायलेकरांस शत्रूंनीं कैद करून आपल्या छावणींत नेलें. आतां राहिले **रा**-

**जाराम महाराज.** त्यांजवर शत्रु केव्हां कसा घाला घालतील, याचा नेम नाहीं. दुर्दैवानें त्यांस अद्याप गांठिलें नाहीं तोंपर्यंत कांहीं आशा आहे; तिचा शेवट झाला कीं संपलें. मग '**निर्वीरमुर्वीतलं**' होऊन जिकडे तिकडे यवनमय होणार. हिंदुधर्माचीं पाळेंमुळें खणून टाकून एकच बिसमिल्ला करावा व सर्व दुनिया अविंधीमय बनवावी, यासाठीं **औरंगजेबा**सारखा दुरभिमानी **बादशहा** आपल्या धुरंधर सेनेसह **दक्षिणें**त उतरून आज कैक दिवस यत्न करीत आहे. ईश्वरी सत्तेनें आज त्याचे बहुतेक मनोरथ सिद्धीस जाण्याचा समय दिसत असल्यामुळें ह्यावेळीं कोणतीही मसलत करून आमचा पल्ला येणार नाहीं. तेव्हां **राजाराम महाराजांस** घेऊन कांहीं मंडळींनीं दूर **कर्नाटकांत चंदी**कडे जावें, असें या दासानें मनांत आणिलें आहे. **कर्नाटकांत** अद्याप शत्रूंचा पाय पुरतासा शिरकलेला नसल्यामुळें तिकडे जाऊन पुनः एकवार नशीबाची परीक्षा पहावी. **गुरुकृपेनें यश** आल्यास हा **प्रल्हाद** खरोखरच जगावर धन्यता पावेल. स्वतांच्या अपूर्व क्षात्रतेजानें संपूर्ण **महाराष्ट्र** दणाणून स्वदेशाचें व मायधर्माचें रक्षण करणाऱ्या **शिवछत्रपती**मागें आह्मी आपल्या कर्तव्यास, आपल्या **हिंदुत्वास** व आपल्या जन्मभूमीस विसरलों नाहीं, असें त्या कट्टया **दुष्मानांच्या** तोंडून वदवावें, एवढाच हेतु आहे. पण या **भोंसले**-कुलाची व त्याबरोबर इतर **महाराष्ट्रीय** जनांची लाज राखण्यास या **गुरुपदा**वांचून दुसरा कोणीही समर्थ

नाहीं. तेव्हां, **स्वामींच्या** चरणारविंदीं मस्तक ठेवावें व मनांतील हेतु कळवून कल्याणदायक आशीर्वाद ग्रहण करावा, ह्मणून हा **प्रल्हाद** येथवर आला आहे. तर ह्या दीन सेवकाच्या शिरीं वरदहस्त ठेवून त्यास अभय द्यावें. गुरुसामर्थ्यानें विजयी होऊन पुनश्च समर्थचरणांची व जन्मदात्या भूमीची सेवा करण्यास हा परत आला तर ठीकच आहे. नाहींपेक्षां इहलोकीं हीच अखेरची सेवा."

हें **प्रल्हादपंतांचें** करुणापर भाषण ऐकून **स्वामी महाराजांचें** अंतःकरण उचंबळलें. **प्रल्हादपंत** शहाणा व कार्यकुशल पुरुष खरा; पण अनिष्ट काल प्राप्त झाल्यामुळें त्याच्या आंगीं औदासीन्य प्राप्त झालें आहे असें **स्वामी महाराजांस** वाटून त्यांनीं त्याच्या अंतःकरणांत कर्तव्याविषयींची जागृति उत्पन्न करण्यासाठीं सुरस बोध केला. तो ध्यानांत ठेवण्यासारखा असल्यामुळें वाचकांकरितां सारांश रूपानें येथें दिला आहे. त्याच्या योगानेंच **प्रल्हादपंतांच्या** ठायीं प्रोत्साहन येऊन **महाराष्ट्र**भूमींत अवशिष्ट राहिलेला स्वराज्यसत्तेचा अंकुर त्यांच्या हस्तें पुनः वाढीस लागला; व पुढें त्याचा विस्तृत वृक्ष बनून त्याच्या गार छायेखालीं कांहीं कालपर्यंत **हिंदुप्रजेस** स्वातंत्र्य सुखाचा अनुभव घेतां आला.

**स्वामी०:–प्रल्हादपंत,** आज **मराठी** राज्यास जरी अशी दैन्यावस्था प्राप्त झाली आहे, तरी अंतःकरणांतील उमेद खचूं दिली नाहीं ह्मणजे ती आज नाहीं

उद्यां खचीत दूर होईल. महान् महान् प्रतापशाली, पुण्यश्लोक नृपश्रेष्ठांस देखील कालदशेनें सोडिलें नाहीं, तेथें इतरांचा काय पाड? अनिष्टकाल प्राप्त झाला असतां उदास न होतां घट्ट मन करून छाती देणें याचें नांव शौर्य व याचेंच नांव लौकिक. '**विपदि धैर्यमथाभ्युदये क्षमा**' असें ह्मटलें आहे, व साधारण जन आणि थोर यांमधील फरक काय तो हाच. साधारण लोक संपत्तीचें किंचित् वारें लागलें कीं, ताठ्यानें फुगून जाऊन त्यांस सर्व जग ठेंगणें दिसूं लागतें. पण सज्जनांचें त्याच्या उलट आहे. ते संपत्कालीं लीन होऊन जनांस सुख देतात, आणि विपत्कालीं पर्वतप्राय दुःखें कोसळलीं तरी न डगमगतां स्वतां धैर्यानें वागून दुसऱ्यांसही संकटांतून पार नेतात. हें कालदेशचें रहाटगाडगें सदोदित फिरत असावयाचेंच. आपण नेहमीं पहातों कीं, रहाट गाडग्यावरील उदकुंभ भरून वर येऊं लागले ह्मणजे ते डुलत डुलत मोठ्या भरानें उच्च स्थितीचा मार्ग क्रमीत असतात. पुढें त्या उन्नतावस्थेची परमावधि झाली कीं, लागलेच ते पालथे होऊन अधोमुख होत्सात खालीं जाऊं लागतात. ती अवनत दशा कांहींवेळ भोगून सरते तोंच पुन्हां त्यांची व उदकाची गांठ पडते. मग ते रिक्त कुंभ पूर्ववत् आनंदानें भरूं लागून 'बुडबुड' अशा आपल्या शब्दानें वर डुचंबळत जाणाऱ्या सजातीय बंधूंस 'तुह्मी बुडणार, तुह्मी बुडणार' असें सांगत आपण जलभरित होऊन तोंडें वर करितात. हीच स्थिति कालचक्राच्या फेऱ्यांत संप-

डलेल्या राज्यरूप कुंभांची आहे. आपत्कालाच्या चिकाटींत सांपडला नाहीं, असा प्राणी विरळा. मात्र अवनत दशा प्राप्त झाली असतां तींतून आपण कधींही पार पडणार नाहीं असें समजणें, किंवा निराश होऊन स्वधर्म, नीति, व कुलाचार हीं विसरून भलत्याच मार्गाचें अवलंबन करणें, हें अगदीं चुकीचें आहे. धिमेपणानें यत्न करीत गेलें असतां काय साध्य होणार नाहीं? '**लभेत सिकतासु तैलमपि यत्नतः पीडयन्**'* असें ह्मटलें आहे. निश्चय मात्र ढळूं देतां कामा नये. बीं कुजल्यावांचून जसा अंकुर फुटत नाहीं, तद्वत् कष्ट सोशिल्यावांचून किंवा विपत्कालीं धैर्याची कांस बळकट धरून यत्न केल्यावांचून सुखप्राप्ति, धनप्राप्ति अथवा राज्यप्राप्ति कधींही व्हावयाची नाहीं. सुखाची उत्पत्ति दुःखापासून व दुःखाची सुखापासून आहे. तेव्हां दुःख भोगिल्याशिवाय सुखाचे दिवस दृष्टीस पडावयाचे नाहींत. दुःख हें धैर्य, अभिमान, दृढनिश्चय, सदाचरण, कर्तव्यजागृति वगैरे मनुष्याच्या ठिकाणच्या गुणांची पारख करण्याची कसोटी होय. घणाच्या घावांनींही न फुटणारा तोच खरा हिरा. भट्टींत तापवावें तसें अधिक उज्वलित होणारें सुवर्णच बावन्नकशी ठरतें. तद्वत् क्लेशरूप घणाच्या घावांनीं भग्न न होणारें किंवा संकटाग्नीच्या भट्टींत पडलें असतां जास्त उज्वल होऊन निघणारें तेंच खरें धैर्य व तेच खरे सद्गुण होत. **देह दुःखें कदारीं नये। उदंडचि करावे उपाय। मग सर्व**

* प्रयत्नें वाळूचे कण रगडितां तेलहि गळे।

**सुखास काय । उणें असे ॥ १ ॥ उपाधीस कंटाळला । विचाराचा आळस आला । ह्मणजे जाणावा चेवला । बुद्धीपासूनी ॥ २ ॥ खबरदारी आणि वेगीं । तेणें सामर्थ्य चढे आंगीं । नानाप्रसंगें कार्य भागीं । अंतरचि न पडे ॥ ३ ॥** असा समर्थांचा उपदेश आहे. तर तो ध्यानांत ठेवून वागत गेलांत ह्मणजे, कार्यसिद्धीविषयीं केव्हांही अंतर पडणार नाहीं. आजपर्यंत या **भरतखंडांत** अनेक राजे होऊन गेले व अनेक राज्यें उदयास्तातें पावलीं; त्यांचा पुराणांतरीं इतिहास वाचिला असतां असें दिसून येईल कीं, ज्या स्वसुखनिरभिलाष पुरुषांनीं मागें स्वपराक्रमाच्या जोरावर मोठमोठीं राज्यें स्थापून आपल्या धवल यशानें आर्यवंश धन्य केले, त्यांना ती महत्कार्यें संपादण्यांत थोडीं संकटें किंवा थोडे हाल सोसावे लागले नाहींत. त्यांजवर जे जे भयंकर प्रसंग गुदरले व स्वातंत्र्य सुखाकरितां किंवा सदैव पूज्य अशा आपल्या पूर्वजांचा तेजस्वीपणा कायम राखण्याकरितां त्यांनीं आपल्या जिवाचे जे स्वधास्वाहाकार केले, त्यांचा विचार केला असतां असें खचीत वाटतें कीं, त्यांच्या आंगीं विलक्षण धैर्य व असाधारण स्वाभिमान नसता तर त्यांचा कुलदीपकपणा व त्यांच्या अपूर्व पराक्रमाचा महिमा आजवर त्रैलोक्यांत खचीत दुमदुमत रहातांना. त्यांनीं संपादिलेलें ऐश्वर्य व त्यांनीं स्थापिलेलीं राज्यें. उत्कर्ष आणि अपकर्ष त्या अवस्थाद्वयास भोगून जरी नाहींशीं झालीं, बुजालीं, किंवा आज मितीस

त्यांचा मागमूस देखील राहिला नाहीं, तरी तीं संपादण्याचे कामीं त्यांनीं घेतलेले अश्रांत श्रम व त्यांजवर कोसळलेल्या अरिष्टांतून पार पडण्याकरितां त्यांनीं योजिलेले शहाणपणाचे उपाय गुरुस्थानीं होऊन आपल्यास अद्याप पढवीत आहेत इतकेंच नव्हे, तर ते मदोदित असेच पढवीत रहातील. परवशतेनें गांजून गेल्यामुळें धुळीस मिळालेल्या **महाराष्ट्रियांच्या** ठायीं स्वातंत्र्येच्छा उत्पन्न करून त्यांची शौर्यश्री एकवार जगावर गाजविण्यास तीं पूर्वजांचीं उदाहरणेंच कारणीभूत झालीं व पुढेंही होतील.

आतां, तुह्मी बाहेर पडून जाण्याचा जो विचार केला आहे, तोही प्रस्तुत प्रसंगास योग्यच आहे. कारण,
' **त्यजेदेकं कुलस्यार्थे ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत् ॥**
**ग्रामं जनपदस्यार्थे ह्यात्मार्थे पृथिवीं त्यजेत् ॥** ' *
असें ह्मटलें आहे. शिवाय, **नारदांनीं धर्मराजास** जी नीति कथन केली आहे, तींतही अनिष्ट काल प्राप्त झाला असतां राजानें **संधि, विग्रह, यान, आसन, द्वैधीभाव** व **आश्रय** या सहा गुणांपैकीं कोणत्याही गुणानें अवलंबन करावें, असें सांगितलें आहे. त्यांतील **आसन** ह्मणजे अनुकूल काल प्राप्त होईपर्यंत किल्ला किंवा दुसरें एखादें सुरक्षित स्थळ पाहून तेथें आश्रय करणें हें होय. तेव्हां त्या राजनीतीप्रमाणें **राजारामासहवर्तमान कर्नाटकीं** जाऊन तेथें युक्तिप्रयुक्तीनें शत्रु मोड-

---

* त्यजा कुलार्थ पुरुष ग्रामार्थ कुलहि समस्त सोडावें ॥
ग्रामहि देशार्थ, मही आत्मार्थ, बुधें भलेंचि जोडावें ॥

ण्याचा यत्न केला असतां वायां जाणार नाहीं. '**सत्य श्रमाभ्यां सकलार्थ सिद्धिः**' अशी महानुभावांची उक्ति आहे. एकभाव ठेऊन खऱ्या मार्गानें उद्योग करणाऱ्या मनुष्यास ईश्वर सिद्धि देतोच देतो. **शिवाजी महाराजांच्या** मागें अपकर्ष दशेची पाळी आल्यामुळेंच **संभाजीच्या** आंगचे धैर्यशौर्यादि गुण मातीमोल होऊन संपूर्ण महाराष्ट्रांतील सत्ता, ऐश्वर्य व हिंमत, हीं लयास गेलीं, व तुह्मांवर देशत्याग करण्याचा हा आज असा प्रसंग येऊन गुदरला. आतां असेच आणखी कांहीं दिवस धैर्य न सोडितां एक निश्चयानें स्वराज्या साठीं कष्ट सोशीत गेलांत ह्मणजे, पुनः उत्कर्ष काल खचीत प्राप्त होईल. शेवटीं इतकेंच मांगावयाचें कीं, '**अखंड सावधान असावें । दुश्चित्त कदापि नसावें । तजविजा करीत बैसावें । एकांत स्थलीं ॥ १ ॥ मागील अपराध क्षमावे । कारभारी हातीं धरावे । सुखी करोनी मोडावे । कामाकडे ॥ २ ॥ आधींच पडली धास्ती । ह्मणजे कार्यभाग होय नास्ती । या कारणें समस्तीं । बुद्धि शोधावी ॥ ३ ॥ राजी राखितां जग । मग कार्यभागाची लगबग । ऐसें जाणानी सांग । समाधान करावें ॥ ४ ॥ सकळ लोक एक करावे । गनीम निवटूनि काढावे । येणें करितां कीर्ति धांवे । दिगंतरीं ॥ ५ ॥ बहुत लोक मेळवावे । एका विचारें भरावे । कष्ट करोनी घमरावे । म्लेंछावरी ॥ ६ ॥ आहे तितुकें जतन करावें । पुढें आणीक मेळवावें ।**

**महाराष्ट्र राज्यचि करावें । जिकडे तिकडे ॥ ७ ॥**
**लोकीं हिंमत धरावी । शर्तीची तलवार करावी ।**
**चढती बढती पदवी । पावाल तेणें ॥ ८ ॥**

या समर्थांनीं केलेल्या सुरस व प्रेमळ बोधाकडे लक्ष देऊन तो सदोदित अंतःकरणांत वागवीत जा; ह्मणजे, त्रेतायुगीं **प्रल्हादा**करितां प्रत्यक्ष विष्णूनें जसा **नारसिंह** अवतार धारण करून त्याचे हेतु पुरविले, तद्वत् तो दीन दयाळ **दाशरथिराम** तुमचे मनोरथ पूर्ण करील व स्वराज्याचें यश पूर्ववत् संपूर्ण **महाराष्ट्रांत** फडकूं लागेल.

या प्रमाणें ती रसभरित गुरुवाणी श्रवण करून **प्रल्हादपंतांचा** कंठ सद्गदित झाला व डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले. दुसरे दिवशीं **स्वामींनीं पंतांस** प्रसाद-पुष्पें देऊन निरोप दिला. निरोप होतांच **प्रल्हादपंत विशाळगडीं** परतले. **महाराजांस** व इतर मंडळींस **स्वामींचा** मनोदय व स्वराज्याविषयींचे त्यांचे उद्गार कळवून ते पुढील तरतुदीस लागले. **रामचंद्रपंतांस** '**हुकुमतपन्हा**' असा किताब दिला व मागील सर्व व्यवस्था त्यांजकडे सोंपविली.

**मोरोपंताचा** पुत्र **निळोपंत** यास '**पेशवा**' असें पद देऊन त्याला **रामचंद्रपंतांच्या** धोरणानें वागावयास सांगितलें. **शिदोजी गुजर** व **कान्होजी आंग्रे** यांनीं आरमार संबंधीं बंदोबस्त राखून **कोंकणपट्टीचें** रक्षण करण्यामध्यें **रामचंद्रपंतांस** होतां होईल तितकें साहाय्य करीत जावें, अशी तजवीज केली. **महादजी नाईक**

**पाणसंबळकर** यास शिबंदी वरील मुख्य अधिकार देऊन त्याला **रामचंद्रपंतांच्या** हुकुमतींत वागावयास सांगितलें. या प्रमाणें एकंदर निरवानिरव झाल्यावर **प्रल्हादपंत, राजाराम महाराज, धनाजी, संताजी, दाभाडे, खंडो बल्लाळ** व पांच सात विश्वासू नोकर इतकी मंडळी निघावयास सिद्ध झाली. तो **राजाराम-वनवास** आतां पुढील भागीं वर्णन करूं.

---

# भाग ७ वा.

---

**स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि**
**आराधनाय लोकानां मुंचतो नास्ति मे व्यथा.**

उत्तररामचरित्र.

सर्व सिद्धता झाली. मुहूर्त नेमण्यांत आला. बरोबर जाणारे चाकरनोकर आपआपल्या आप्त इष्टांस भेटून वाटेच्या तयारीस लागले. दुसरे दिवशीं पहांटेस **गर्गाचार्यांच्या** मुहूर्तानें बाहेर पडावयाचें; तेव्हा पूर्वरात्रीं **राजाराम** आपल्या उभयतां प्रियपत्नींचा निरोप घेण्याकरितां महालीं गेले. आपल्यास **विशाळगडीं** ठेवून **महाराजांची** स्वारी उदयीक **कर्नाटकीं** जावयास निघणार, हें त्यांस पूर्वींच समजलें असल्यामुळें त्यांच्या जिवास चैन नाहींसें होऊन दोघीही **महाराजांची** वाट पहातच बसल्या होत्या. इतक्यांत स्वारी आलेली पाहून त्या चट्कन उठून एकीकडे उभ्या राहिल्या.

**राजाराम**:-( दोघींसही प्रेमालिंगन दिल्यावर ताराबाईची हनुवटी धरून ) **लाडके**, सदोदित आपल्या पूर्ण तेजानें दुसऱ्याच्या अंतःकरणास आल्हाद देणारा हा मुखचंद्र आज अभ्राच्छादित कां बरें दिसतो ? प्रकृति बिकृति तरी ठीक आहेना? पुरुषांचें विरामस्थान काय त्या बायका ! देहाला कितीही श्रम झाले असले किंवा मनाला कोणत्याही प्रकारचा ताप झाला असला, तरी एकवार अशा ह्या उल्हासित मुखेंदूचें दर्शन झालें कीं, आमच्या सर्व चिंता नाहींतशा होतात, व अंतःकरण समुद्रावर प्रेमाच्या लहरी उचंबळूं लागून आंगचा शीण झरकन् उतरतो. त्यांतून पूर्वसुकृतसंचयानें तुह्मांसारख्या शहाण्या व कुलशीलसंपन्न स्त्रिया ज्यांना लाभल्या ते पुरुष धन्य होत. त्यांच्या सौख्यास पारावारच नाहीं ह्मटलें तरी चालेल. मग अशा–

**ताराबाई**:-( मध्येंच किंचित् रागावल्यासारखें दाखवून ) पुरे मेलं. दुसऱ्याला हरभऱ्याच्या झाडावर चढवायचं तरी किती ! हा गोडबोलेपणा ठाऊक नसेल तर ना ? बाभळी तिथल्याच बोरी. साखर पेरून मतलब साधण्याची विद्या खरोखरीच पुरुषांपाशीं शिकावी. आजचा सगळा हा मोठेपणा आणि मिठ्ठपणा कां, तें समजलें. शेजारणीनं कोंबडा झांकला, ह्मणून उजाडायचं कां रहातं ? पाहिजे तिकडे कां जाण्याचा विचार होईना. आह्मांला नेण्याचं वचन मिळाल्यावांचून मात्र आह्मी जाऊं देणार नाहीं. कुठं मेलं तें **कर्नाटक** आ-

णि कुणीकडे ती चंदी. तिकडे गेल्यानं ह्मणजे आजच शत्रूंचं पारिपत्य होतं किंवा गेलेली सत्ता हातीं येते, असं कांहीं नाहीं. मग सगळ्यांना सोडून उगीच दूर जाण्यांत अर्थ तो कोणता? मेलं बायकांचं जिणं व्यर्थ ह्मणतात, तें कांहीं खोटं नव्हे. त्यांनीं पुरुषांसाठीं रात्रंदिवस काळजी करावी व आपले जीव पाखड पाखड पाखडावे. कुठं एखादे दिवशीं बाहेरून यायला क्षणभर उशीर झाला, कीं लाव वाटेकडे डोळे आणि घाल आंत-बाहेर सत्रा खेपा. कुठं येवढसं कपाळ का दुखलं, कीं घे कुलस्वामिणीला सांगून आणि कर मंगळवारशुक्र-वारचे उपास. अशा एक कीं दोन काळज्या! पुरुषां-साठीं रात्रंदिवस खालवर पहातां पहातां बायकांचा जीव मेला अर्धा होतो. पण त्यांना त्याचं वाटतं तरी कां कांहीं. ' परदुःख शीतळ ' ह्मणतात, तं खरें; पण कांहीं कां असेना, आह्मी ह्या आपल्याबरोबर येणारच.

**राजा०:**–( किंचित् हंसून ) वाः!! एवढ्याकरि-तांच का हा इतका रुसवा आणि बिचाऱ्या सर्व पुरुष जातीवर विनाकारण गहजब! माझा कोणत्याही गो-ष्टीला ना असेल तर ना? निजलेल्या मनुष्याला कोणीही जागें करील, पण जाग्याला जागें कोण करणार? आ-जचा प्रसंग कसा आहे, हें सर्व माहीत असून सवरून मुद्दाम वेड पांघरणाराची समजूत कशी बरें व्हावी? ती कधींही व कोणाच्यानेंही होणें नाहीं. परंतु तुह्मां-सारख्या समंजस व शहाण्या बायकांना मात्र हें भाषण व हा हट्ट अगदीं शोभत नाहीं. सर्व गोष्टी परमेश्वरानें

सुयंत्र चालविल्यावर हा प्रीतीचा सुखसोहाळा टाकून विदेशीं जाण्यास किंवा विरहताप सोसण्यास कोणी तयार होईल काय? त्यांतून लाडके, ईशकृपेनें तुला आतां कांहीं दिवस गेले आहेत; तेव्हां अशा वेळीं स्त्रियांचे डोहाळे पुरविण्यांत पुरुषांना जें अनुपमेय सुख लाभतें, तें सोडून मन दगडासारखें करण्यास कोण कसा बरें सिद्ध होईल? पण इलाज नाहीं. प्रसंग व वेळ पाहून प्रत्येक मनुष्यानें वागलें पाहिजे. त्यांत आह्मी तर क्षात्रकुलांत जन्म घेतला आहे; तेव्हां केवळ संसारसुखांत गुंतून आपल्या कर्तव्याकडे व पूर्वजांच्या लौकिकाकडे दुर्लक्ष केल्यास ईश्वराच्या घरचे आपण खचीत दोषी ठरूं. आज संपूर्ण महाराष्ट्र शत्रूंनीं व्यापून टाकिल्यामुळें, आतां येथें निश्चितपणें राहणें धोक्याचें आहे; तर अशा वेळीं कर्नाटकीं जाऊन कांहीं मतलब साधल्यास पहावा, असा विचार ठरला आहे. तुह्मांला बरोबर घेऊन जावें, हें खरें; परंतु, पल्ला लांबचा. शिवाय, मार्गांत जिकडे तिकडे शत्रूंचीं ठाणीं असल्यामुळें कोणती वेळ कशी येईल, कोणीकडे जावें लागेल, आणि काय काय हाल भोगावे लागतील, याचा नेम नाहीं. ह्मणून आह्मी तिकडे जाऊन पोंचल्यावर मागाहून सर्व मंडळीस येथून नेण्याचा विचार करितां येईल. तर वेड्यासारखा उगीच हट्ट धरून जिवाला त्रास करून घेण्यापेक्षां सुखासमाधानानें निरोप द्यावा, हें चांगलें.

**राजसबाई**—आहा! किती तरी पण दुसऱ्याच्या जि-

याची ही काळजी? एखाद्याला जणों काय खरंच वाटेल. हाल होवोत कीं कांहींही होवो. मागं राहून काळजीनं डोळ्याच्या पाण्याबरोबर घांस गिळण्यापेक्षां बरोबर येऊन त्रास भोगावा लागलेला पत्करला. आह्मी बरोबर आलों ह्मणून काय होतं? **रामचंद्र** वनवासास निघाले, त्यावेळीं **सीतेला** नाहीं का बरोबर घेऊन गेले?

**राजा॰**—होय, तें खरें. प्रभु **दाशरथिराम सीतेला** समागमें घेऊन वनवासास निघाले, ह्मणूनच **वाल्मिकीं**-ना एवढें **रामायण** लिहावें लागलें. नाहीं तर, **सीतेला** लंकावास, **मारुतीला सीताशुद्धीचे** आयास व **रामाला रावणासारख्या** महा बलिष्ठ दैत्यांशीं घोरतर संग्राम करण्याचे सायास मुळींच होतेना. तेव्हां, मार्गांत आमची-ही त्याप्रमाणेंच पुरी फजीती उडावी व शत्रूंच्या कचा-ट्यांत सांपडून जीव नकोसा व्हावा, अशीच इच्छा अ-सल्यास मग हा हट्ट ठीकच आहे.

**ताराबाई**—ज्यांचीं बोटं त्यांच्याच डोळ्यांत घात-लीं, ह्मणजे मग कोण कशाला बोलणार! पुरुषांपुढं बोलून बायकांचा का कुठं पत्ता लागला आहे? बाय-कांचं भाषण ह्मणजे निर्माल्यवत्, हें **ब्रह्मदेवच** बोलून चुकला आहे. त्यांच्या भाषणाला कधीं कोणी मान दिला आहे का? पण, मेला जीव वेडा ह्मणून बोलल्यावांचून रहावत नाहीं. आह्मांला बरोबर नेल्यापासून मार्गांत जास्त त्रास होत असेल तर, आमचा ह्मणजे दुराग्रहच आहे, असें नाहीं. कारण, आमचं सुख किंवा संतोष सर्व कांहीं इकडच्या सुखावरच ना अवलंबून? मग ज्या-

च्या योगानें वाटेंत दुप्पट आयास होतील, त्या गोष्टींचा हट्ट करून काय उपयोग? पण, आतां एवढं तरी ऐकणं व्हावं कीं, प्रकृतीला जपून मागली आठवण ठेवायची. नाहीं तर, निघेपर्यंत सगळं होय होय; आणि उंबरघांट सुटला कीं, मागच्या गोष्टी मागं राहिल्या. मग इकडची वास ना पूस. आई **कुलस्वामिणी**, आतां बाई सर्व तुझी राखण. वाटेनं सुखरूप नेऊन **चंदीला** पोंचल्याचं वर्तमान आलं कीं, मी तुला सोन्याच्या कळसाची अबदागिरी वाहीन.

याप्रमाणें कांहीं प्रेमाच्या भाषणांत, कांहीं निद्रेंत, व कांहीं पुढील विवंचनेंत बहुतेक रात्र गेली. शुक्रोदय होतांच **राजाराम** मुखमार्जनादि प्रातर्विधि आटोपून सदरेवर येतात तों, **प्रल्हादपंत, रामचंद्रपंत, खंडो बल्लाळ, धनाजी, संताजी, दाभाडे** वगैरे तमाम मंडळी जमून निघण्याची तयारी झाली. प्रस्थान घेऊन हळूहळू किल्ल्याच्या बाहेर सरतात तों, अरुणोदयाचा समय आला. बरोबर पोंचविण्याकरितां आलेल्या मंडळींस निरोप देतांना **प्रल्हादपंत** ह्मणाले "**रामभाऊ**, तुमच्यावर सर्व मागील भार टाकून आह्मीं बाहेर पडलों आहों. तर आतां तुह्मीं, **निळोपंत, महादाजी** वगैरे मंडळी एक विचारानें वागून आह्मांस **कर्नाटकीं** इकडील हरएक बातमी कळविण्याविषयीं व्यवस्था ठेवा. आह्मीं **चंदीस** जाऊन पोंचलों व तेथील एकंदर शिस्त बसत गेली ह्मणजे, पुढचा विचार पाहतां येईल. तोंपर्यंत ईश्वरावर भार टाकून यत्नानें नशीबास पुढें ढक-

ळीत गेलों असतां, तो दीनदयाळ सत्यसंकल्पाचा दाता रघुवीर कृपा केल्यावांचून रहाणार नाहीं." अशा रीतीनें बरोबर गेलेल्या लोकांना दोन बोधाच्या गोष्टी सांगून मागें परतविल्यावर सर्व मंडळी पुढें चालती झाली. मजल दरमजल करीत **घांटमाथा** उतरून ते **देवगडास** पोंचले. तेथून जलमार्गानें **गोकर्णास** उतरून पुढें **सौंध्याच्या** रोखानें **कर्नाटकचा** मार्ग धरावा, असा त्यांचा विचार ठरला. परंतु, शत्रूंच्या मुलखांतून जावयाचें; तेव्हां उघड रीतीनें जाण्यापेक्षां वेश पालटून निघावें, असें **प्रल्हादपंतांस** वाटलें. म्हणून त्यांनीं कोणास जंगमाचे, कोणास बैराग्याचे व कोणास जोग्याचे वेश दिले. आपणही गळ्यांत लिंग अडकवून शेंडी काढिली, आणि भगवीं वस्त्रें धारण करून '**अय्यनवरु**' बनले. याप्रमाणें हा वेषधारी यात्रेकरूंचा मेळा **श्री वेंकटेशाच्या** गिरीवरून **कर्नाटकांत** उतरला.

इकडे, **राजारामास** बरोबर घेऊन **प्रल्हादपंत, धनाजी, संताजी** वगैरे मंडळी **विशाळगडाहून** बाहेर पडून कोणीकडे नाहींशी झाली, ही बातमी **औरंगजेबाच्या** कानीं गेली. तेव्हां त्यानें जिकडे तिकडे आपल्या **फौजदारांस** हुकूम फर्माविले कीं, गुप्त बातमी राखून जेथें या पळून गेलेल्या मंडळींचा सुगावा लागेल, तेथें त्यांस कैद करून हुजूर पाठवावें. अशा रीतीचे चोंहोकडे सक्त हुकूम सुटले असल्यामुळें **मोंगल अधिकारी** शोधांत होतेच. अशा वेळीं, वरील यात्रेकरूंचा मेळा फिरत फिरत **बंगळुरापर्यंत** पोंचून तेथील धर्म-

शाळेंत उतरला. ते दिवशीं, इतर बैरागी लोकही त्या ठिकाणीं बरेच उतरलेले होते त्यांच्यामध्यें गांवांतील कित्येक गांजेकस मंडळी चिलिमी फुंकीत व गप्पा मारीत बसली होती. जेवणाची तयारी होतांच **राजाराम महाराज** पाय धुवावयास उठले असतां, एकजण त्यांच्या पायावर पाणी घालीत होता व दुसरा पाय पुसण्याकरितां हातांत वस्त्राची घडी घेऊन उभा होता, असा प्रकार त्या **कानड्या** लोकांच्या दृष्टीस पडला. तेव्हां ते आपापल्यांत कुजबुजूं लागले कीं, "हे लोक बैरागी यात्रेकरूसारखे दिसतात खरे; परंतु त्यांच्या मध्यें तो दुसऱ्याकडून पायांवर पाणी घालून घेणारा गृहस्थ कोणी थोर श्रीमान् असावा, यांत संशय नाहीं." हें त्यांचे भाषण **खंडो-बल्लाळाच्या** कानीं पडलें. त्याला थोडीशी **द्रवीडी** भाषा समजत असल्यामुळें त्यानें ताडिलें कीं, आपल्याविषयीं या **कानड्यांच्या** मनांत कांहीं संशय उत्पन्न होऊन ते आपल्यासंबंधानें बोलत आहेत. तेव्हां, सायंकाळीं ती गांवांतील मंडळी धर्मशाळेंतून निघून गेल्यावर **खंडो बल्लाळानें मल्हारपंतांस** सुचविलें कीं, "हा वेळ-पर्यंत जे **कानडेलोक** धर्मशाळेंत बसले होते, त्यांच्या मनांत आपलेविषयीं संशय आला आहे, असें त्यांच्या भाषणावरून मला दिसतें. शिवाय, हें ठाणें **मोंगलांचें** आहे. तेव्हां न जाणो कदाचित् ती लोकांच्या तोंडची गुणगुण एखाद्या **मोंगल** अधिकाऱ्याच्या कानापर्यंत गेली व त्याच्या मनांत संदेह उत्पन्न झाला, तर उगीच पंचाईत करीत बसावें लागेल. त्यापक्षीं आपण पूर्वीच

सावधगिरी ठेवून कांहीं तजवीज करावी, हें बरें. तें **चिटणिसाचें** भाषण ऐकून सर्वांस मोठा विचार पडला.

**मल्हार०**:–गडेहो, प्रसंग तर कठीण दिसतो आहे पण, अशा वेळीं आपण जर सर्वच येथून निघून चालते झालों, तर उगीच जास्त संशयास कारण होऊन शत्रु मागोमाग आपला तपास काढीत येतील. बरें, तसें न करितां येथेंच रहावें, तरीही कठीण. कारण, जर कां आपण एकदां **मोंगल** अधिकाऱ्याच्या तावडींत सांपडलों, तर ते आपली दुर्दशा उडवितील. बाकीच्याविषयीं कसेंही असो. पण ज्यांच्या जिवावर आपण स्वदेशाचा व स्वकीयांचा त्याग करून बाहेर पडलों, तेंच जर आमच्या आशेचें **निधान** शत्रूंच्या हातीं लागलें, तर मग सर्वच गोष्टींचा शेवट होईल. तव्हां, **राजाराम महाराजांस** घेऊन कांहीं मंडळींनीं उजाडण्यापूर्वीच येथून निघून पूर्वेच्या मार्गानें चालते व्हावें; ह्मणजे, मागें जरी कदाचित् शत्रूंचें धरणें आलें, तरी चिंता नाहीं. पुढें गेलेल्या मंडळीनें आमची वाट पहात **वेल्होरास** मुक्काम करावा. आह्मी कसेंही करून त्यांस येऊन मिळूं. असें केल्यावांचून आजचें हें संकट टळण्याचा दुसरा मार्ग मला दिसत नाहीं.

ही **मल्हारपंतांची** मसलत सर्वांस पसंत पडली; त्याप्रमाणें **राजाराम, संताजी, धनाजी** व एक नोकर असे चौघे जण चंद्रोदय होतांच, पूर्वेच्या मार्गानें चालते झाले. दुसरे दिवशीं पहातात तों, प्रहर दिवस येण्यापूर्वींच धर्मशाळेसभोंवती **मोंगलांचा** पहारा बस-

ला. कारण, **बंगळूर** येथील **फौजदारास बादशहा**-कडून शोध ठेवण्याबद्दल पूर्वीच लिहून गेलेलें असल्यामुळें, तो टेहळणींत होताच. इतक्यांत, गांवाबाहेरील धर्मशाळेंत कोणी श्रीमान् यात्रेकरू उतरले आहेत, अशी लोकांच्या तोंडची अफवा त्याच्या कानीं जातांच, त्यानें त्या सर्व मंडळींस पकडून कोटांत आणण्याकरितां, आपल्या हाताखालच्या लोकांस ताबडतोब हुकूम दिला.

इकडे **धनाजी, संताजी, राजाराम** व एक नोकर असे चौघे जण धर्मशाळा सोडून निघाले, ते स्वच्छ चांदणें पडलें असल्यामुळें हळूहळू रात्रभर वाट चालतच होते. उजाडेपर्यंत त्यांनीं सुमारें चारपांच कोसांचा पल्ला झंपला. पहांट होतांच, एका झुळझुळ वहात असलेल्या स्वच्छ झऱ्यावर मुखमार्जनादि विधि आटोपून, ते तसेच पुढें चालते झाले. कारण, मागें शत्रूंची भीति असल्यामुळें ऊन होईपर्यंत झंपेल तितका पल्ला झंपावा, व दोनप्रहरच्या सुमारास एखादें वस्तीचें स्थळ पाहून तेथें मुक्काम करावा, असा त्यांचा बेत होता. दोन प्रहर उलटली; तरी गांवशींव वगैरे लागण्याचें कोठें कांहींच चिन्ह दिसेना. मार्ग चुकल्यामुळें ते जसजसे पुढें जाऊं लागले, तसतसा जास्त खडकाळ प्रदेश लागूं लागला. एके बाजूस भयाण दरी व दुसऱ्या बाजूस डोंगरकठार, या वांचून त्यांस कांहींच दिसेना. उन्हाची तिरीप सोसवेनाशी झाली. मध्यरात्रीपासून दहाबारा तास चालत असल्यामुळें, पायांची दुर्दशा उडून सर्वांचा जीव अगदीं डोळ्यांत आला होता.

जवळसार एखादा गांव लागण्याची मुळींच आशा खुं-
टली. ह्यासाठीं, पाण्याची सोय पाहून क्षणभर विश्रांति
घेण्याकरितां ते एका झाडाखालीं टेंकले. थोडेंसें फरा-
ळाचें खाऊन गार पाणी पितांच भुकेच्या योगानें त्यांस
जी ग्लानि आली होती, ती नाहींशी झाली. रात्रीचें
जागरण व चालण्याचे आयास झालेले असल्यामुळें,
त्या गार छायेखालीं जमिनीस पाठ लागतांच, त्यांस
किंचित् झोंप लागली. अंमळशानें जागे होऊन पहातात
तों, उन्हाचा ताप कमी झाला होता. थोडीशी झोंप मि-
ळाल्यामुळें, त्यांच्या आंगीं चांगली हुषारीही आली
होती. तेव्हां आतां, पुढचा पल्ला झेंपून सायंकाळपर्यंत
एखादें वस्तीचें स्थळ गांठिलें पाहिजे, नाहींपेक्षां अशा
ह्या भयाण डोंगरांतच आपणांस सारी रात्र काढावी ला-
गेल, असें मनांत येऊन ते तेथून उठले. पुढें तो डोंगर
वर चढून जातात तों, आकाशांत चोहोंकडून ढगांची
गर्दी होऊं लागली. उष्मा इतका होऊं लागला कीं,
आंगावरील वस्त्रें घामानें भिजून चिंब झालीं.

हळुहळू पावसाची अंधारी पडत जाऊन मेघगर्जना
सुरू झाली. मधून मधून विद्युल्लतेनें आपला प्रभाव सु-
रू केला. पर्जन्य येतो कीं काय असें ह्मणत आहेत
तों, वाऱ्याची सुरुवात झाली. मोठाले वृक्ष वाऱ्याच्या
झपाट्यानें डोलूं लागून ते उपटून पडतात कीं काय,
असें वाटूं लागलें. नाकातोंडांत व डोळ्यांत माती शिरूं
लागून मार्ग दिसेनासा झाला. आकाश नादमय होऊन
तें आतां सर्वच कोसळून पडतें कीं काय, असें वाटूं

लागलें. तेव्हां त्यांच्यानें पुढें पाऊल टाकवेनासें होऊन, ते तेथेंच एका झाडाचा आश्रय करून बसले. इतक्यांत, वारा बंद होऊन एकदम गारांची वृष्टि सुरू झाली. मग काय विचारावयाचें ! तो कुलुपी गोळ्यांचा मार. बोरा येवढाल्या गारा डोक्यावर, पाठीवर व सर्वांगास एकसारख्या सटासट बडवूं लागल्या. तो गारांचा वर्षाव थोडासा कमी होतो तों, पुन्हा वारा तुफान वाहूं लागला. मेघांच्या गडगडाटानें व विजांच्या कडकडाटानें दशदिशा भरून जाऊन आपण आतां या प्रसंगांतून कसे निभावतों, असें त्यांस झालें. इतक्यांत मेघराजानें आपला अम्मल बसविण्यास सुरवात केली. सरीवर सरी झोडूं लागल्यामुळें, हां हां ह्मणतां जिकडे तिकडे जलमय होऊन आपल्या ह्या प्रवासी जनांच्या फजितीस पारावार नाहींसा झाला. **राजाराम महाराजांची** तर गारांच्या सपाट्यानें व पावसाच्या तडाक्यानें प्राणांतिक अवस्था होऊन गेली. ज्या देहाला जन्मापासून वारा, पाऊस, शीत किंवा उष्ण यांचा त्रास माहीत नसल्यामुळें असल्या कष्टतर स्थितीचा मुळींच संपर्क झाला नव्हता, किंवा राजवाडा व इतर विहारस्थळें यांशिवाय बाह्यसृष्टीचें कोणतेंच स्वरूप ज्याच्या दृष्टीस फारसें पडलें नव्हतें, त्यास ह्या **पंचमहाभूतांचें** प्रलयकालचें स्वरूप पाहून '**दे माय धरणी ठाय**' असें होऊन गेलें, यांत मोठेसें नवल नाहीं. कारण, **संताजी, धनाजी**सारख्या ज्या धैर्यवान् पुरुषांनीं जगांतील अनेक बिकट प्रसंग अनुभविले होते, व शेंकडों दुःखें

सोशिली होतीं, ते देखील हें अनिवार संकट पाहून गडबडले; मग बाकीच्यांची कथा काय! असो.

सुमारें एक तास अशी बहार उडाल्यावर पाऊस थांबला. लागलीच आकाश स्वच्छ होऊन सायंकाळचीं कोमल सूर्यकिरणें पृथ्वीच्या उंच भागावर पसरलीं. तो आडोळा पाऊस. घटका दोन घटका एकच गर्दी उसळून क्षणभरानें पुनः जिकडे तिकडे स्वच्छ होऊन गेलें. तेव्हां आमच्या ह्या प्रवाशी मंडळींच्या मनांतील औदासीन्य नाहींसें होऊन, त्यांच्या अंगीं कांहींसा उत्साह आला. त्यांना आपण एका विघ्नांतून खचीत पार पडलों, असें वाटूं लागलें. त्यांनीं अंगावरील चिरगुटें पिळून वाळविलीं, व तेथून जवळच वरच्या बाजूस एक जुनाट देवालय दिसत होतें, तिकडे ते वळले. तें सुंदर स्थल पाहून तेथेंच रात्रीचीरात्र काढण्याचा त्यांनीं निश्चय केला. आतां **प्रल्हादपंत, धनाजी, खंडो बल्लाळ** वगैरे मंडळींची मागें **बंगळूर** मुक्कामीं काय अवस्था झाली, हें समजण्यासाठीं आमचे वाचक अगदीं उत्सुक झाले असतील. तेव्हां **राजाराम महाराजांस** या कालिकेच्या देवालयांतच सोडून, आपण आतां परत **बंगळुराकडे** वळूं.





# भाग ८ वा.

——०:०——

॥ मनस्वी कार्यार्थी न गणयति दुःखंनच सुखम् ॥

मागील भागीं सांगितल्याप्रमाणें दुसरे दिवशीं सकाळीं धर्मशाळेसभोंवती पहारा बसून शिपायांनीं त्या सर्व यात्रेकरूंस पकडून कोटांत **मोंगल** अधिकाऱ्यापुढें नेलें. तेथें गेल्यावर त्या अधिकाऱ्यानें सर्वांस भीति घालून विचारिलें 'तुह्मी कोण, कोठून आलांत व कोठें जातां, हें सर्व खरें खरें असेल तें सांगा; नाहींपेक्षां मला तुह्मांस **बादशहा**कडे पाठवून द्यावें लागेल, व मग तेथें तुमची काय अवस्था होईल, तें सांगवत नाहीं.' याप्रमाणें धमकी देऊन विचारिलें असतांही, 'आह्मी **तुंगा**तीरचे रहाणारे जंगम; इकडे यात्रा करीत करीत **श्रीरामेश्वर**च्या दर्शनास चाललों आहों,' असें ते सांगूं लागले. आणखी तुह्मांबरोबर काल धर्मशाळेंत कांहीं बैरागी लोक होते, ते कोठें आहेत असें अधिकाऱ्यानें विचारतांच 'ते आमच्या मंडळीपैकीं नव्हत; ते पहांटेची दोन तास रात्र असतांच येथून निघून गेले. आह्मी आजचा दिवस येथेंच मुक्काम करून उदईक पुढें जाणार' असें त्यांनीं सांगितलें. हें त्यांचें भाषण ऐकून त्या अम्मलदारानें कित्येक घोडेस्वार तावडतोब पुढें गेलेल्या यात्रेकरूंस धरून आणण्याकरितां **रामेश्वर**च्या र-

त्यानें पाठविले, व त्या पकडलेल्या लोकांस कैद करून ठेवण्याविषयीं हुकूम दिला.

त्या दिवशीं उपासमार होऊन ती सारी रात्र त्यांना प्रतिबंधांत काढावी लागली. दुसरे दिवशीं त्या शोधार्थ गेलेल्या घोडेस्वारांनीं वाटेंत सांपडलेले चार पांच गोंसावी धरून आणिले. तेव्हां त्या सर्वांना पुनः माराची भीति दाखवून त्या **मोंगल** अधिकाऱ्यानें खरें सांगण्याविषयीं जान जान पछाडिली; परंतु व्यर्थ. तेव्हां त्यानें त्या सर्व यात्रेकरू लोकांच्या डोक्यांवर तीन तीन मणांचे धोंडे देववून त्यांस उन्हांत उभें केलें; त्यांना तीन दिवसपर्यंत उपाशी ठेवून चाबकाचा मार दिला, पायांत बिड्या ठोकिल्या, व अनेक तऱ्हेनें त्यांचे हालहाल करून बघितले; तरी कांहीं नाहीं. 'आह्मी बैरागी व जंगम, **रामेश्वरचे** यात्रेकरू आहोंत;' यावांचून त्यांच्या तोंडून कांहींच जास्त निघेना. चौथे दिवशीं त्या अधिकाऱ्यास त्या सर्व यात्रेकरूंची दया येऊन त्यानें त्यांस शिधा देवविला व स्वयंपाक करून जेवण्याची परवानगी दिली; पण ते जेवीनात. 'आह्मी यात्रेकरू, बंदमुक्त झाल्यावांचून अन्नोदक ग्रहण करणार नाहीं. एकवार त्या **रामेश्वरचरणीं** हे प्राण अर्पण केले आहेत, तेव्हां ते जावोत किंवा राहोत. बंदीखान्यांत अन्नोदक ग्रहण करून देह विटाळण्यापेक्षां मरण आल्यास फार बरें.' असा त्यांचा पक्का निर्धार व ती त्यांची कडकडीत वृत्ति पाहून त्या अधिकाऱ्याची खात्री झाली कीं, हे खरोखर यात्रेकरू असावेत; आ-

पण त्यांचा व्यर्थ छळ मात्र केला. इतकें झाल्यावर त्यानें त्यांस सोडून देण्याविषयीं हुकूम दिला व **बादशहास** लिहून कळविलें.

आहाहा ! काय निःसीम स्वामिभक्तिही ! ! धन्य त्या पुरुषांची ! **खंडो बल्लाळ, दाभाडे** वगैरे ज्या मंडळींनीं घरदार सोडून आप्तइष्टजनांचा त्याग केला व एकदां ज्यास धनी ह्मटला त्याच्यासाठीं स्वप्राणाची काडीभरही मुरवत न धरितां अशीं दुःसह संकटें सोशिलीं, त्यांची थोरवी किती ह्मणून वर्णन करावी ! हीं आपल्या ह्या देशाच्या इतिहासास शोभा देणारीं अपूर्व मानव रत्नें स्वप्रकाशेंकरून ह्या पृथ्वीवर '**यावच्चंद्रदिवाकरौ**' झळकत राहतील, यांत संशय नाहीं. त्यांच्या त्या अपूर्व स्वामिभक्तिपरायणतेमुळेंच आजमितीस आपलें **हिंदुत्व** व आपला **वैदिकधर्म** ह्या **भरतखंडावर** काईम राहिला आहे. नाहींपेक्षां कधींच सर्व **बिसमिल्ला** होऊन आमचें नांवही उरतेंना. भर आणीबाणीच्या प्रसंगीं स्वराज्याविषयींची खरी कळकळ व कर्तव्यदक्षता अंतःकरणांत जागृत ठेवून कारागृहवास, उपवास, सुर्याचा प्रखरताप व चवदाव्या रत्नाच्या असह्य वेदना सोसण्यास तयार होणें, ह्याचेंच नांव धैर्य; व हाच खरा अभिमान ! नाहींतर स्वहिताचा सौदा दुनियेंत चाललाच आहे. तोंडानें स्वदेशसेवा, स्वाभिमान किंवा स्वामिभक्ति हे शब्द बोलावयास फार सोपे आहेत; पण प्रसंग आला असतां, तसें वागणें फार कठीण असतें. **मल्हादपंतांसारखे** किंवा **खंडोबल्लाळासारखे** उपवास

काढणें अथवा जिवावर बेतली असतांही न डगमगतां एकनिश्चयानें वागणें, हें तर राहूंद्या एकीकडे; पण एखादे दिवशीं दोन घांस कमी झाले किंवा एकादशी आली कीं, आमची कोण धांदल उडून जाते! मग कोठला धनी, कोठलें स्वराज्य, आणि कोठलें काय? जोंपर्यंत पदराला खार लागला नाहीं, किंवा आपल्यापर्यंत आलें नाहीं, तोंपर्यंत स्वदेशसेवा, जातभाईपणा, दृढनिश्चय, सत्यप्रियता, स्वाभिमान, कर्तव्यजागृति वगैरे गोडगोड मिळ्यामिळ्या शब्दांची बोलण्यांत व लिहिण्यांत रेलचेल उडवितां येते. पण किंचित् कळ सोसण्याचा जर कां प्रसंग आला, कीं त्या साऱ्या शब्दांचें कोशांतल्या कोशांत विसर्जन. असो. **प्रल्हादपंत** किंवा **खंडेराव दाभाडे** यांसारखे पुरुष स्वार्थाकडे दृष्टि देऊन निमकहरामपणा करण्यास तयार झाले असते, तर त्यांस **औरंगजेबानें** मोठाल्या जाहगिरी देऊन पदरीं बाळगिलें असतें; इतकेंच नव्हे, तर त्यांचे शब्द झेलण्यासही तो तयार होता. पण नाहीं. त्या थोर व कुलवान् पुरुषांनीं केवळ पुढील संततीच्या कल्याणार्थ चंदनाप्रमाणें आपले देह झिजवून पुनः स्वराज्याची स्थापना केली व '**देह त्यागितां कीर्ति मागें उरावी**' या साधु वाक्याप्रमाणें इहलोकीं अजरामर कीर्ति स्थापून ते परलोकींही धन्य झाले.

मागील भागीं **राजाराम महाराज, संताजी** व **धनाजी** वगैरे मंडळीस आपण देवीचे देवालयांत आणून सोडिलें आहे, हें वाचकांच्या ध्यानांत असेलच,

तेव्हां, आतां त्यांची पुढें काय अवस्था झाली, तें पाहूं. तो सायंकाळचा समय असल्यामुळें **राजाराम, संताजी** व **धनाजी** असे त्रिवर्ग क्षणभर त्या समोरील विस्तीर्ण व आल्हादकारक सरोवराची शोभा पहाण्याकरितां त्याच्या तीरीं एका शिळेवर जाऊन बसले. नुकताच पाऊस पडला असल्यामुळें, आसमंताद्भागीं दिसणारीं तरुतलें पाण्यानें अगदीं तुडुंब भरून गेलीं होतीं. सरोवरामधील फुललेल्या कमळांच्या पाकळ्या मेघवृष्टीमुळें गळून त्या पाण्याच्या पृष्ठभागावर तरंगत होत्या. भ्रमराचे थव्यांचेथवे वेड्यासारखे इतस्ततः भ्रमण करूं लागले होते. त्या रम्यस्थलीं क्रीडा करून सदोदित सुखानें काल घालविणारे चाष, बक, मयूर इत्यादि नाना जातींचे पक्षी उपांत भागाच्या वृक्षांवर बसून पाऊस उभवीत होते. इतक्यांत तेजःपति रवि अस्तास गेल्यामुळें त्या दुःखानेंच जणो दिशांचीं मुखें काळवटत चाललीं. आकाशांत हळू हळू नक्षत्रगणांचा प्रकाश भरूं लागला. स्वप्रकाशानें चमकणारे काजवे आसमंताद्‌भागच्या वृक्षांखालील अंधःकाराचा नाश करण्याकरितांच जणों इकडून तिकडे उडूं लागले. राळेचा किर्र असा शब्द कानांत भरूं लागला. जिकडे तिकडे अंधार पसरत चाललेला पाहून ते त्रिवर्गही देवालयाकडे येतात तों, नोकरानें जागा वगैरे झाडून बिछायत पसरली होती. पावसानें भिजून गेलेले फराळाचे जिन्नस थोडे बहुत बरोबर होते, ते खाऊन पडतांच सर्वांस गाढ झोंप लागली.

**राजाराम महाराजांचाही** प्रथम कांहीं वेळ डोळा लागला होता; पण मध्यरात्र उलटून गेल्यावर ते जागे होऊन पहातात तों, सर्व विश्व आपल्या ठिकाणीं विराम पावल्यामुळें जिकडे तिकडे सामसूम झालें होतें. झोंपी गेलेल्या मंडळींच्या श्वासोच्छ्वासाखेरीज व मधून मधून वृक्षांवरील घरट्यांतून पक्षांच्या चिवचिवण्याखेरीज कांहीं ऐकूं येत नव्हतें. वारा बंद असल्यामुळें वृक्षांचीं पानें देखील हालत नव्हतीं. दिवसाच्या श्रमामुळें सर्वांग ठणकूं लागून त्यांस झोंप येईना; तेव्हां ते उठून बसले. नुकताच रजनीनाथ पूर्वेस क्षितिजावर येत चालला होता. त्याकडे पाहून ते आपल्याशींच ह्मणतात “ पहा, कांहीं वेळ पर्यंत अंधःकारानें व्याप्त झालेलें हें विश्व जसें चंद्र प्रकाशानें आल्हादित होत चाललें आहे, तद्वत् विपत्कालानें गांजिलेल्या मनुष्याचें अंतःकरणांत भावीसुखाच्या आशेचा उदय होऊं लागला कीं, तो उत्साहभरित होऊन कोणतींही संकटें सोसण्यास तयार होतो. पण दुर्दैवानें प्राप्त झालेल्या विपत्तींतून पार पडण्यासाठीं जिवापाड श्रमसायास करीत असतांही कर्मानें पुरी पाठ पुरविल्यामुळें जर त्याची दिवसेंदिवस पिछेहटच होत गेली, तर तो बिचारा कोठवर ह्मणून धीर धरील! **आबासाहेबांच्या** मागें या **मराठी** राज्यावर एकसारखीं संकटें कोसळत असतांही आह्मीं आजपर्यंत ईश्वरावर भार टाकून धैर्यानें कसेबसे दिवस काढिले. आज नाहीं उद्या कधींतरी आपल्याला सुदिन प्राप्त होतील, अशा आशेनें ऊन ह्मटलें नाहीं, तहान ह्मटली

नाहीं; केवळ पूर्वजांच्या यशरक्षणाकडे दृष्टि देऊन विदेशीं आलों. पण इतकें होऊन देखील जर त्या **भवानीस** आमची दया येत नाहीं, तर आतां व्यर्थ आपल्या जन्माचें असें मातेरें करून घेऊन देशोदेश हिंडल्यानें काय होणार? **मराठ्यांची** गादी चालावी व वडिलांचा कीर्तिध्वज मायदेशांत फडकत राहावा, असा ईशसंकेत असता तर **प्रल्हादपंत** वगैरे मंडळींची व आमची अशी तातातूट होतीना. त्या राजनिष्ठ सेवकांची मागें काय अवस्था झाली असेल कोण जाणे! आतां ते आह्मांस कसचे भेटतात व आमचे मनोरथ कसचे सिद्धीस जातात! झाला, ह्या भोंसले कुलाचा व स्वराज्याचा आज शेवट झाला.

**राज्यतृष्णे**, तूं फार घातकी आहेस असें जें आजवर मी ऐकत होतों, त्याचा आज मला पुरा अनुभव आला. तुझ्या नादीं लागलेल्या अनेक राजकुलोत्पन्न पुरुषांस तूं आपले दास बनवून शेवटीं त्यांच्या जन्माची दुर्दशा उडविलीस, अशा पुराणांतरीं ज्या अनेक कथा आहेत, त्या ऐकूनही आह्मी वेड्यासारखे त्रिभुवन फिरण्यास सिद्ध झालों ना! हें मनुष्याचे चंचल मन त्याला कोणत्या रीतीनें कसें नाचवील, याचा नेम नाहीं. तेव्हां, पुरे आतां ह्या हालअपेष्टा आणि पुरे तें भावी-राज्यसुख. या दगदगीपेक्षां दूर कोठें तरी जाऊन राहिलेला आयुष्याचा काल जन्माचें सार्थक करण्यांत घालवावा, हें बरें. किंवा अशा ह्या रम्य स्थळींच राहून **कालिकेची** आराधना करावी, ह्मणजे ती सर्व दुःखांचा

परिहार करून आपल्या चरणीं ह्या दीन दासास ठाव देईल. आतां, हाच माझा दृढनिश्चय. हे राज्यतृष्णे, इतःपर तुला ह्या निर्विकार पावलेल्या अंतःकरणांत जागा मिळणार नाहीं. हे वेड्या मना, तुझ्या आजपर्यंतच्या जुलमी व दुःखमय राजसत्तेस कंटाळून अवयवरूप प्रजांनीं आतां स्वतंत्र होण्याचा निश्चय केला आहे; तर, तूं आपले सर्व दुःसाध्य हेतु टाकून ह्या कालिकेस शरण जा." अशा रीतीनें महाराज अनेक विचारतरंगांत गुंग होऊन निराशेच्या स्वाधीन झाल्यामुळें एकसारखा दीर्घ व उष्णश्वास टाकीत आंथरुणावर बसले आहेत, इतक्यांत **संताजी** व **धनाजी** जागे झाले.

**संताजीः**—महाराज, आपला निद्राभंग कशानें झाला? जिवास फार त्रास झाला आहे, हें खरें; पण त्याला कांहीं उपाय नाहीं. इतर कांहीं व्यथा होत असल्यास ती दूर करण्याविषयीं हा दास पाहिजे ती सेवा करण्यास तयार आहे. आपण जागे होऊन एकटेच उठून बसल्यामुळें कदाचित् नाना तऱ्हेच्या कल्पनातरंगांनीं आपली चित्तवृत्ति अशी उदास करून टाकिली असेल. परंतु, तसें ह्मणावें तर, ज्या वीरकुलामध्यें आपला जन्म झाला आहे, त्या कुलाला आजपर्यंत कोणत्याही कुकल्पनांची किंवा दुष्ट विचारांची बाधा झाली नाहीं; मग आपल्यासारख्या विचारी व हिंमतवान पुरुषास ती कां व्हावी? तर आपण असे दीर्घश्वास टाकीत बसण्याचें व निरुत्साह होऊन म्लान मुख करण्याचें कारण काय, हें कृपा करून या सेवकाला सां-

गावें. ज्यांच्या जिवावर आह्मीं कंबर बांधिली व भों-सलेकुलाचे यशरक्षणासाठीं देशत्याग करून विदेशीं आलों, त्यांचीच जर अशी अवस्था झाली तर आह्मीं कोणाकडे पाहून जिवास धीर द्यावा? स्वामिसेवेसाठीं आह्मीं हे देह अर्पण केले असतां, आपणच जर असे निराश होऊन सेवकांस दूर पाहिलें, तर त्यांनीं कोणाची आशा धरून शत्रूंशीं झुजण्याची ईर्षा बाळगावी? हे दिवस असेच राहतील, असें नाहीं. उद्यां आपण **चंदीस** गेलों ह्मणजे सर्व संकटें दूर होतील. तर आतां असें निराश न होतां ह्या सेवकांस धीर द्यावा, अशी त्याची सविनय प्रार्थना आहे.

**राजाराम:-संताजी,** माझ्यासाठीं तुह्मी इतके कष्टी होऊं नका; मला कांहीं होत नाहीं. तुह्मांसारखे स्वामिभक्त जवळ असतां काळजी कशाची? पण इतकेंच वाईट वाटतें कीं, **संभाजी महाराजांच्या** मागें तुह्मांसारखे धाराशूर पुरुष आणि **प्रल्हादपंतांसारखे** शहाणे मुत्सद्दी स्वराज्याकरितां तनमनधनेंकरून उद्योग करीत असतां, परमेश्वरानें ह्या मराठी राज्यावर असा प्रसंग आणावयाचा नव्हता. तुह्मांसर्वांचे हे क्लेश पाहून अंतःकरण विरघळतें. स्वतांबद्दल मी मुळींच काळजी करीत नाहीं. दैवीं राज्यसुख लिहिलेलें नसल्यास तें लाभतें कसचें! **आबासाहेबांच्या** मागें ते दिवस तसे गेले व आतां शत्रूंनीं सर्व राज्य हरण करून घेतल्यामुळें, हा अज्ञातवास कपाळीं आला. जें जें येईल, तें तें भोगलेंच पाहिजे. नाहीं ह्मटल्यानें सुटतें अ-

सें नाहीं. केवळ ताप भोगण्याकरितांच ईश्वरानें हा देह निर्माण केला असला, तर सोडविणार कोण? पण, राज्यप्राप्तीसाठीं अशीं दुःखें भोगण्यापेक्षां ईश्वरप्राप्तीसाठीं देह झिजविला, तर जन्माचें सार्थक तरी होईल. मला आतां तें राज्य नको, व ही दगदगही नको. ह्या एकांतस्थळीं कालिकेची चरणसेवा करीत राहिलेला आयुष्याचा काल घालविणें हीच माझी आतां राज्यप्राप्ति, हेंच माझें सुख, व हाच माझा सर्व अभिलाष. कदाचित् सुदैवानें तुमच्या व **प्रल्हादपंतांच्या** गांठी पडून सर्वांच्या प्रयत्नास मागें पुढें यश आलें, तर **धाकट्या महाराजांस** सिंहासनीं बसवा; त्यांच्या हस्तें हिंदुप्रजेचें उत्तम रीतीनें प्रतिपालन होत असल्याचें ह्या कानांनीं ऐकिलें, ह्मणजे माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले असें मी समजेन.

**धनाजीः-महाराज,** हें काय! आपल्या सारख्या राजकुलोत्पन्न पुरुषाच्या तोंडून अशी दीनवाणी निघणें, हें योग्य नव्हे. संकटसमयीं उदासीनपणा धारण करून कार्यसिद्धीविषयीं विन्मुख होणें, हें क्षात्र धर्माला खरोखर लांछन आहे. ज्यांच्या कुलांत आपण जन्म घेतला, त्यांच्या यशाचें संरक्षण करण्यासाठीं देह न झिजवितां भलताच विचार मनांत आणणें ह्मणजे, चौऱ्यांशीलक्ष योनी फिरून प्राप्त झालेला हा मनुष्यजन्म निरर्थक घालविणें होय. या जगामध्यें उत्पन्न होऊन ज्यानें आपलें कर्तव्य बजाविलें नाहीं, तो जन्मूनही व्यर्थ. पुढील कार्यावर दृष्टि देऊन मनुष्यानें तें संपादण्या

विषयीं कंबर बांधिली पाहिजे. '**टाकीचे घाव सोसल्यावांचून देवकळा प्राप्त होत नाहीं.**' तसेंच अनेक संकटें व दुर्धर प्रसंग भोगण्यास मनुष्य हिय्या करून तयार झाल्याशिवाय त्याच्या हातून कोणतेंच महत्कृत्य पार पडत नाहीं, किंवा तो जगाच्या मानास पात्र होत नाहीं. **थोरल्या महाराजां**ना स्वराज्याची स्थापना करण्याकरितां काय काय केलें, हें आपणच जाणत आहां. त्यांच्यामागें सर्व **भरतखंड**भर दुमदुमत असलेल्या त्यांच्या लौकिकाची स्वपराक्रमानें चीज करून '**बापसे बेटा सवाई**' अशी कीर्ति संपादन केली, तरच उभय कुलांचा उद्धार होऊन आपण इहलोकीं राज्याचे व परलोकीं मोक्षाचे धनी व्हाल. नाहींतर, कसली ईश्वरोपासना आणि कसला परमार्थ. **आधीं प्रपंच करावा नेटका। मग घ्यावें परमार्थ विवेका। येथें आळस करूं नका। विवेकी हो॥ प्रपंच सोडून परमार्थ कराल। तेणें तुह्मीं कष्टी व्हाल। प्रपंच परमार्थ चालवाल। तरी तुह्मीं विवेकी॥** असा समर्थांनीं जगास उपदेश केला आहे. तर स्वदेशासाठीं व स्वदेशबांधवांसाठीं धारातीर्थीं देह अर्पण करणें हाच आह्मां क्षत्रियांचा प्रपंच व हाच मोक्ष. **आबासाहेबां**चा खरा भरिभार काय तो तुह्मांवर होता. ' माझ्यामागें माझा **राजाराम**, माझा **दाशरथिराम** मी स्थापिलेल्या ह्या राज्याचें व हिंदुप्रजेचें प्रतिपालन मजपेक्षांही जास्त दक्षतेनें व प्रेमानें करील. ' हे त्यांचे अंतकालचे शब्द आपल्या व आह्मां सेवकांच्या हृद-

यांतून कधींही जावयाचे नाहींत. काळजास पीळ पाडणाऱ्या त्यांच्या त्या भाषणाची आठवण झाली, ह्मणजे सर्व संकटाचा विसर पडून आमचे बाहु स्फुरूं लागतात. असें असून आपण असे निरिच्छ होऊन वैतागलात, तर स्वर्गलोकीं **आईसाहेब व महाराज** यांना सुख कसचें प्राप्त होणार! तर असें न करितां हा वैताग टाकून **औरंगजेबासारख्या** हिंदुप्रजेच्या व हिंदुधर्माच्या हाडवैऱ्यास रसातळीं गाडून आपल्या कुलाचा **भगवा झेंडा** पूर्ववत् **महाराष्ट्रांत** उभारण्याचा हिय्या धरा; ह्मणजे आपण पितृऋणांतून मुक्त व्हाल व आह्मी स्वामिऋणांतून मुक्त होऊं. ह्यापुढें दुसरें मोक्षसाधन तें कोणतें! **भरत आपनी जननी तजी। तजी प्रीता तजे प्ऱ्हाद। बिभीछन आपना भाई तजे। श्रीरामके काज॥ १॥** तद्वत्, आह्मी सर्व टाकून आपल्यासाठीं हे देह विकिले आहेत. तर उठा; ह्या पहा दिशा फांकत चालल्या. आतां जवळच कोठें तरी गांव लागेल; तेथें उतरून दोन दिवस विश्रांति घेतली, ह्मणजे ही मनाची खिन्नता नाहींशी होईल.

हें त्या निःसीम व खऱ्या अंतःकरणाच्या सेवकाचें उल्हासजनक भाषण ऐकून **राजाराम महाराजांच्या** मनांतील ते क्षणिक विचार व निरुच्छाह आणणारें तें औदासीन्य, लागलेंच नाहींसें झालें. ‘**अतिसहवासी वचमना कतक कलुषिता वना निवळवील**’ असें **पंतांनीं** ह्मटलें आहे, तें खरें आहे. **धनाजीसारख्या** फार दिवस सहवासास राहिलेल्या अभिमानी, विश्वासु

व धन्यासाठीं प्राण देणाऱ्या वीरांचें प्रेमल भाषण, **महाराजांची** चित्तवृत्ति क्षणांत कां बरें पालटविणार नाहीं? सूर्योदय होतांच त्या मंडळींनीं तो सरोवर प्रदेश सोडून पुढील मार्ग धरिला. सुमारें दहा घटका दिवसाचे अदमासास ते एका खेडेगांवीं पोंचले. तेथें दोन दिवस मुक्काम करून पुढें ते फिरत फिरत **गुरमकोंडा** येथें जाऊन पोंचले.

---

## भाग ९ वा.

---

**एकस्य दुःखस्य न यावदंतं ।**
**तावद्द्वितीयं समुपस्थितं मे ॥**

मद्रास इलाख्यांत **अर्काट** जिल्ह्यामध्यें खुद्द **अर्काट**च्या दक्षिणेस सुमारें पंधरा कोसांवर **जिंजी** या नांवाचा एक मोठा डोंगरी किल्ला आहे. तो किल्ला तीन टेंकड्या मिळून झालेला असून त्या तिन्ही टेंकड्या सभोंवती सुमारें सात मैल घेराचा एकच मातीचा भक्कम तट असल्यामुळें त्या किल्ल्याचा विस्तार फारच प्रचंड दिसतो. त्या तीन टेंकड्यांपैकीं सर्वांत उंच व प्रसिद्ध अशी जी **राजगिरी** नांवाची टेंकडी तिचा दक्षिणेकडील भाग अगदीं उभ्या सुळक्यासारखा असून त्या ठिकाणींच ह्या किल्याचा मुख्य भाग बांधिलेला आहे. पूर्वीं ह्या किल्ल्यावर जाण्यास त्याच्या नैर्ऋत्य भागीं जी भयंकर ओवळ दिसते, तीशिवाय दुसरा मार्गच नव्ह-

ता. अशा कठीण जागीं हा किल्ला प्रथम कोणीं व केव्हां बांधिला याबद्दल विश्वसनीय माहिती जरी कोठें मिळत नाहीं, तरी तें प्रचंड काम **चोळ** राजांच्या हातचें असावें, असें वाटतें. पण कित्येक ठिकाणीं त्या बद्दलची अशी माहिती मिळते कीं, **तंजावर**चा प्रसिद्ध सरदार जो **विजयरंग** त्याच्या मुलानें सन १४४२ च्या सुमारास हा किल्ला बांधण्यास सुरवात केली व शेवटीं तें काम **विजयनगर** येथील राजांनीं तडीस नेलें. कसेंही असो, तो किल्ला जुनाट आहे एवढें खरें.

हल्लीं त्या किल्ल्याचावर चढून गेलें असतां पूर्वींच्या कालीं बांधिलेलीं मोठालीं धान्याचीं कोठारें, एक दोन जुनाट देवालयें, जिमखाना व **कल्याणमहाल** इत्यादि इमारती नादुरस्तीमुळें जमीनदोस्त होत असलेल्या दृष्टीस पडतात. त्यांत **कल्याणमहाल** ह्या इमारतीचें सुबक काम तर अद्याप नव्या कामास मागें सारण्याजोगें आहे. तींत एक मोठा सुंदर दिवाणखाना असून त्या सभोंवती जनानखान्याच्या पुष्कळ खोल्या आहेत. मध्यभागीं सुमारें ९० हात उंचीचें दहा मजली एक सुंदर गोपुर आहे. ह्या इमारतींत चोहोंकडे नळानें पाणी खेळविलें असून गोपुराच्या शिखरावर उडत असणारा एक कारंजा आहे. ते सर्व पाण्याचे नळ बऱ्याच लांबीवरून आणिलेले असून जागजागीं तटाच्या भिंतीमधून फिरविलेले दिसतात. **रायगिरीवर** एक मोठी तोफ ठेविलेली आहे. ती ज्याधातूंची ओतलेली आहे, त्या धातुमुळींच गंजत नसल्यामुळें ती पहावी तेव्हां नवी ओ-

तल्यासारखी दिसते. ह्याशिवाय तेथें अद्याप दिसणाऱ्या पूर्वीच्या खाणाखुणा ह्मटल्या ह्मणजे, राजवाड्याच्या ठिकाणीं पडलेला औरसचौरस १२ हातांचा एक मोठा संगमरवरी दगड व कैद्यांची भयंकर विहीर ह्या होत.

**जिंजी**चा किल्ला **तालिकोट**च्या लढाईपर्यंत **विजयनगरकरां**च्या ताब्यांत होता. पुढें सन १६३८ त **विजापूरकरां**चा प्रसिद्ध सरदार **बंधुलाखान** ह्यानें तो सर करून तेथें **विजापूरकरांचें** ठाणें बसविलें. **बंधुलाखाना**च्या हाताखालील ज्या सैन्याच्या टोळीनें पराक्रम करून तो किल्ला हस्तगत केला होता, त्या टोळीवर **छत्रपति शिवाजी महाराजांचे** वडील **शहाजी** हे अधिकारी होते. पुढें **शिवाजीनें** आपल्या उदयकाळीं तो **विजापूरकरां**चा कळकट किल्ला आपले हातीं घेऊन तेथें **मराठ्यांचें** ठाणें बसविलें. तेव्हांपासून तें अजिंक्य ठाणें **मराठ्यां**च्या ताब्यांत असल्यामुळें **कोल्हार, बाळापूर, उसकटा, बंगळोर, एलूर,** व **जिंजी** ह्या सहा परगण्यांचें जें लहानसें राज्य **शहाजीनें कर्नाटकांत** संपादिलें होतें, त्याचा राज्यकारभार ह्या किल्ल्यावरच चालत असे. त्या **कर्नाटकां**तील आपल्या राज्याच्या संरक्षणार्थ **शिवाजीनें** ह्या किल्ल्यावर कायमची फौज, निराळा सरंजाम व स्वतंत्र अधिकारी नेमिले होते. त्यांनीं सरकारी हुकुमाप्रमाणें **कर्नाटक**चा बंदोबस्त ठेवून प्रतिवर्षीं एकवार एकंदर हिशेब देण्याकरितां मात्र **रायगडीं** यावें, अशी व्यवस्था केली होती. **शिवाजीच्या** अष्ट-

प्रधानांपैकीं **अमात्याकडे** **कर्नाटकांतील** ह्या छोटे-खानी राज्याचा सर्व अधिकार सोंपविला असल्यामुळें ते बहुतकरून **जिंजी** येथें रहात असत. हें **कर्नाटकांतील मराठ्यांचें** राज्य जरी लहान होतें, तरी त्याची व्यवस्था उत्तम असल्यामुळें व संपूर्ण **कर्नाटकचें** नाक असा जो **जिंजीचा** किल्ला तो त्यांच्या ताब्यांत असल्यामुळें, त्यांचा **कर्नाटकभर** बराच वचक असे. ह्या **कर्नाटकांतील** आपल्या राज्यास **मराठे चंदीचें** राज्य असें ह्मणत. **शिवाजीचा** काल झाल्यावर **संभाजीच्या** बेबन्नगरी अमदानींत त्या सहा परगण्यापैकीं **बंगळूरचा** परगणा **मोंगलांच्या** हातीं लागून तेथें त्यांचें ठाणें बसलें. दुसरा **उसकटा** परगणा **ह्मैसूरकरांनीं** घेतला. बाकीचे चार परगणे व **जिंजीचा** किल्ला मात्र **मराठ्यांच्या** ताब्यांत होता.

यावेळीं या सर्व प्रांताची व्यवस्था **निळो मोरेश्वर अमात्य** व **जनार्दनपंत हणमंते** हे पहात होते. **संभाजीच्या** बेहोषपणामुळें मधील कारकिर्दीत **महाराष्ट्र** देशामध्यें जिकडे तिकडे बाचाबाच उडून पूर्वींची एकंदर राज्यपद्धत जरी बिघडली होती, व **मोंगल** सत्तेचें पाऊल पुढें पडत चाललें होतें, तरी **कर्नाटक** दूर असल्यामुळें, व तेथील राज्यव्यवस्था **निळोपंतासारख्या** शहाण्या पुरुषाच्या हातीं असून **शिवाजीनें** घालून दिलेल्या नियमाबरहुकूम तेथील कारभार चालत असल्यामुळें, **कलुषेशाहींतील** बेबन्नगरीचा संपर्क तिकडे फारसा बाधला नव्हता. शिवाय तो प्रांत सुपीक अस-

त्यानें तेथील प्रजाही सुखी होती. दीड हजार पायदळ व एक हजार घोडेस्वार इतकी फौज त्या किल्ल्यावर असून ती सदोदित तयार असे. याप्रमाणें **चंदीच्या** राज्याची शिस्त व एकंदर व्यवस्था असल्यामुळेंच **प्रल्हादपंत, राजाराम महाराजांस** घेऊन **कर्नाटकीं** यावयाकरितां निघाले होते. वाटेंत **बंगळूर** येथील प्रसंग निभावून **मोंगल** फौजदाराच्या हातून सुटतांच **प्रल्हादपंत, खंडो बल्लाळ, दाभाडे** वगैरे मंडळी **वेल्हारास** आली **महाराज, संताजी** व **धनाजी** यांस आपण पुढें पाठवून दिल्याप्रमाणें ते गांवांत कोठें तरी आपली वाट पहात राहिले असतील, असें समजून त्यांनीं त्यांचा पुष्कळ तपास केला; परंतु कांहीं थांग लागला नाहीं. तेव्हां कदाचित् ते पुढें **जिंजी**कडे गेले असतील असा तर्क करून **प्रल्हादपंत** आपल्या मंडळीसहवर्तमान **जिंजी**कडे वळले. **जिंजीस** येऊन पहातात तों, तेथेंही त्यांचा पत्ता न लागल्यामुळें **प्रल्हादपंतां**च्या जिवास चैन नाहींसें झालें. **महाराज, संताजी** वगैरे मंडळी कोणीकडे गेली व त्यांची काय अवस्था झाली असेल ह्या चिंतेनें त्यांना कांहीं सुचेनासें होऊन '**ईश्वरा,** ह्या दीनांचा अंत तूं कोठवर पहाणार? आजपर्यंत आह्मीं सर्वांनीं ज्या ज्या यातना भोगिल्या व **महाराजांस श्रावणा**प्रमाणें आप्तजनांचा त्याग करवून विदेशीं आणिलें, त्याचा परिणाम असा दुःखप्रद करावयाचेंच मनांत योजिलें आहेस काय?' असे उद्गार त्यांच्या तोंडून निघाले. तरी पुनः मनाला धैर्य

देऊन त्यांनीं त्या मंडळींचा शोध करण्या करितां **खंडो बल्लाळ** व **दाभाडे** यांस परत **वेल्होरा**कडे रवाना केलें.

इकडे **राजाराम, संताजी, धनाजी** वगैरे मंडळी रात्रौ **बंगळुरा**हून निघाली, ती वाट चुकून उत्तरेकडे तीस चाळीस कोसांवर **गुरमकोंडा** नांवाचें जे एक गांव आहे, तेथपर्यंत जाऊन पोंचली, असें पूर्वीं सांगितलेंच आहे. **राजाराम, धनाजी, संताजी** व एक नोकर असे चौघे जण वाट चालून चालून अगदीं थकून गेल्यामुळें, जिवाच्या करारावर एकएक पाऊल टाकीत ते सायंकाळच्या सुमारास त्या गांवाबाहेर जवळच एक देवालय होतें, तेथें जाऊन उतरले. वाटेनें सांपडेल तें खावें व मिळेल तेथें पाणी प्यावें, असें झाल्यामुळें दोनप्रहरपासूनच **राजारामा**चें पोट थोडें थोडें दुखत होतें. पुढें देवालयांत येऊन उतरल्यावर कांहीं फराळाचें खाऊन थंड वेळचें पाणी पोटांत जातांच, जास्त कळ येऊं लागली. मध्यरात्रीच्या सुमारास तर ती कळ सोसवेनाशी झाल्यामुळें कासावीस होऊन **राजाराम** गडबडां लोळूं लागले. ती त्यांची अवस्था पाहतांच **धनाजी** व **संताजी** यांचा जीव घाबरा होऊन गेला. त्यांनीं प्रथम तेल लावून **महाराजां**चें पोट चोळिलें व विस्तव पेटवून किंचित् शेकही देऊन पाहिला; पण कांहीं केल्या तिडीक कमी होईना. तेव्हां आतां अशा प्रसंगीं काय करावें व ह्या रात्रीच्या वेळीं औषधोपचार होऊन **महाराजां**चा जीव कसा वांचतो, ह्या चिंतेनें **धनाजी** व **संताजी**च्या तोंडचें पाणी पळून त्यांना त्रिभुवन आ-

ठवलें. वाचकहो, तशा कठीण प्रसंगीं त्या निस्सीम स्वामिसेवकांची काय अवस्था उडाली असेल, याची अनुभवावांचून कल्पना करणें व्यर्थ होय. ती त्यांची गडबड व **राजारामा**ची प्राणांतिक अवस्था पाहून देवळांत जे इतर लोक निजले होते, त्यांनीं **धनाजी** व **संताजीस** सांगितलें कीं, गावांत पेठेमध्यें कोणी एक **हिंदुस्थान**चा हकीम येऊन उतरला आहे; त्याजपाशीं चांगलीं औषधें असून तो तुह्मांसारख्या गरीबागुरिबांस व यात्रेकरूंस फुकट औषध देत असतो. तर गावांत जाऊन त्याला येथवर घेऊन आल्यावांचून तुमच्या ह्या सोबत्याची घडगत दिसत नाहीं. हें त्यांचें भाषण ऐकून **संताजीनें** त्यांचे आभार मानिले व त्यांपैकीं एकाला हकीमाचें ठिकाण दाखविण्यास आपल्या बरोबर येण्याविषयीं विनंति केली. पुढें ते उभयतांही हकीमास भेटल्यावर **संताजीनें** त्याला सर्व हकीकत कळविली व देवळापर्यंत येऊन जाण्याकरितां त्याचे परोपरीनें आर्जव केले. परंतु रात्रीची वेळ असल्यामुळें तो कांहीं केल्या येण्यास कबूल होईना शेवटीं आपल्या धन्याच्या जिवासाठीं **संताजीनें** त्याचे घट्ट पाय धरिले आणि ' **हकीम साहेब,** या गरीबावर कृपादृष्टि करून तेथवर येण्याची तसदी घेतल्यास अनाथ यात्रेकरूला जीवदान दिल्याचें तुह्मांस श्रेय येईल व तुमचे हे उपकार आह्मीं जन्मोजन्मीं विसरणार नाहीं ' अशी पदर पसरून विनंति केली. अहाहा! किती अनुपम राजनिष्ठा ही!! ज्याला एकदां धनी ह्मटला त्याच्यासाठीं

सर्व अभिमान व सर्व दुःखें विसरून पाहिजे त्याचे पाय धरण्यास देखील मार्गे पुढें न पाहणारे **संताजीसारखे** खरे नेकजात पुरुष आपल्या ह्या हतभाग्य देशांत इतःपर कधीं निपजतील ते निपजोत ! धन्य तो काल व धन्य तीं कुलें !! असो.

**संताजीचें** तें दीनवाणें भाषण ऐकून तो **हकीम** तेथून निघाला. देवालयांत येऊन पाहतो तों, **राजारामाची** तळमळ चाललीच होती. फक्त नळ फुगले आहेत, दुसरें कांहीं नाहीं असें पाहून त्यानें एक गोळी काढून दिली. ती पाण्यांतून उगाळून घालतांच सुमारें तासाभरानें पोटांतील कळ कमी होऊन **राजारामाचा** किंचित् डोळा लागला. **हकीमाच्या** औषधानें गुण येऊन **महाराजांच्या** जिवावरील संकट टळलें, असें पाहून **धनाजी** व **संताजी** यांचा हर्ष त्रैलोक्यांत मावेना. त्यांनीं त्या हकीमाचे मोठे उपकार मानिले, व त्या उपकाराची फेड कांहीं केलें असतांही आपल्या हातून होणें नाहीं, याबद्दल दिलगिरी दर्शविली. पुढें तो हकीम उजाडपर्यंत तेथेंच होता. **संताजी** व **धनाजीच्या** बोलण्यावरून व त्यांच्या एकंदर वागणुकीवरून **हकीमानें** त्यांस साधारणपणें ओळखिलें होतें. पण रात्रीच्या वेळेमुळें व त्यांच्या बदललेल्या वेशामुळें त्याच्यानें भीति टाकून कोणतीच गोष्ट बोलवेना. उजाडल्यावर चांगलें दिसूं लागतांच, त्या **हकीमानें** उभयतांसही पुरें ओळखून त्यांच्या पायांवर आपलें डोकें ठेविलें व 'आपण अपराधी आहों तर एकवार क्षमा

असावी,' अशी त्यांस विनंति केली. पाहतो तों, तो खरा **हकीम** नसून आपल्या पदरचा जुना नोकर **उदाजी कदम** आहे, असें **धनाजी** व **संताजीस** दिसून आलें. 'शत्रूंनीं कपटानें **रायगड** सर केला, त्या वेळीं त्या धांदलींत मी तटावरून खालीं उतरून पार पडलों. **आईसाहेब** आणि **धाकटे महाराज** यांस **झुलफिकारखानानें** कैद करून **बादशहा**-च्या छावणींत नेल्यामुळें आपल्यास आतां कोठें-ही थारा राहिला नाहीं, असें वाटून आपण ही तिक-डेच जावें व कसा तरी आयुष्यचा काळ क्रमा-वा, या हेतूनें हा **हकीमाचा** वेश धारण केला. पूर्वीपा-सूनच ह्या सेवकाला थोडीबहुत वैद्यक्रिया माहीत अस-ल्यानें त्या धंद्यावरच पोट भरून कित्येक दिवस का-ढिले. पुढें **बादशहाच्या** छावणींत असतां एके प्रसंगीं **भक्ताजीची** व माझी गांठ पडली; तेव्हां **आईसाह-बांकडील** बहुतेक हकीकत कळून येऊन आपण एकं-दर मंडळी **राजाराम महाराजांसहवर्तमान कर्नाट-कीं** आल्याचेंही वर्तमान मला समजलें; पण मध्येंच छावणींत अशी अफवा पसरली कीं, **महाराष्ट्रांतून** निघून गेलेल्या मंडळींस **बादशहाच्या** सरदारानें **बं-गळूर** मुक्कामीं कैद करून ठेविलें आहे. तेव्हां ती बा-तमी ऐकून, **आईसाहेबांनीं** आपल्यास **बंगळूरपर्यंत** जाऊन काय खरी हकीकत आहे ती समजून घेऊन येण्याविषयीं **भक्ताजीकडून** सूचना केल्याप्रमाणें, आपण फिरत फिरत येथवर आलों; तों सुदैवेंकरून आज ह्या

सर्वांच्या गांठी पडल्या.' याप्रमाणें **उदाजीच्या** तोंडची ती एकंदर हकीकत ऐकतांच सर्वांस आनंद झाला, व ईश्वरानें योग्य वेळीं आपल्या हातून **महाराजांची** सेवा करविली असें **उदाजीस** वाटून, त्यानें मोठी धन्यता मानिली.

अशा रीतीनें अकस्मात् **कदमाची** भेट होऊन **महाराजांवरील** संकट टळल्यावर **संताजी, धनाजी** वगैरे एकंदर मंडळी आपण कोण व काय याचा बोभाटा होऊं न देतां, तेथेंच एक दोन दिवस राहिली. पुढें त्यांनीं **कदमासहवर्तमान** **वेल्हारचा** मार्ग धरिला. वाटेंत **कोल्हारास श्री रामचंद्रांनीं** लंकेहून परत येतांना स्थापिलेल्या लिंगाचें दर्शन घेण्यासाठीं त्या मंडळींनीं तेथें एक दिवस मुक्काम केला. दुसरे दिवशीं पहांटेस तास दीडतास रात्र असतांनाच त्यांनीं **कोल्हार** सोडिलें. गांवापासून सुमारें मैलावर एक मोठा ओढा होता. त्याच्या दोहों कांठास दाट झाडी असून मध्यें भयंकर ओघळ असल्यामुळें, बहुतकरून त्या ठिकाणीं पहांटेस किंवा तिनिसांजा प्रवाशी लोक लुटले जात. त्यावेळीं गांवांतील चोर नेहमीं ओढ्यांत हजर असावयाचेच. शुक्रोदय होतांच **राजाराम, धनाजी, संताजी** वगैरे मंडळी गांवाबाहेर पडून ओढ्यापर्यंत येतात तों, चोरांस कोणी वाटसरू रस्त्यानें जात असल्याचा सुगावा लागला. मंडळी ओढ्यांत उतरताहेत, इतक्यांत प्रथम हळूच झाडांतून एक दोन चोरटे पुढें आले. ते वाटसरूंशीं कांहीं बोलत उभे आहेत तों, त्यांच्या पैकींच

आणखी दोन चार असामी त्यांना येऊन मिळाले. कांहींवेळ इकडे तिकडे पाहून एकानें खुणेची शीळ घातली; त्यासरशीं दहावीस चोरत्यांचा त्या वेशधारी यात्रेकरूंसभोंवती एकदम गराडा पडला. त्यांच्यापाशीं कांहीं ऊब असावी, असें वाटून चोरांनीं त्यांना प्रथम भीति घातली, व जवळ असेल तें मुकाट्यानें स्वाधीन करावयास सांगितलें. **धनाजीनें** 'आह्मी **रामेश्वरचे** यात्रेकरू, आह्मांपाशीं रमीलोट्याशिवाय कांहीं नाहीं,' असें प्रथम नम्रपणानेंच त्यांस उत्तर दिलें. परंतु तें कांहीं न ऐकतां त्यांपैकीं पांच चार असामींनीं **संताजीस** धरून दूर एका झाडापाशीं नेलें. ते **संताजीला** आतां बांधून घालणार, असें पाहून **धनाजी** तिकडे धांवला, आणि त्या चोरांची विनवणी करूं लागला. परंतु, ते कांहीं केल्या **संताजीस** सोडीनात. आतां ते चोर आपल्यास झाडाशीं बांधणार, असें जेव्हां **संताजीस** पक्कें समजून आलें, तेव्हां तो त्यांच्याशीं दांडगाई करूं लागला. तोंपर्यंत त्यानें आपली कुवत चोरांस समजूं दिली नव्हती. **संताजी** आटपेना असें पाहून त्यांपैकीं चौघां चोरांनीं त्याला गच्च आवळून धरिलें, व पांचवा आपल्या हातांतील तलवार खांकेस मारून त्याला झाडाशीं बांधूं लागला. **धनाजी** जवळ उभा होताच; त्यानें ती संधि साधून मोठ्या चलाखीनें चोराच्या खांकेतील तलवार झटकन् हिसकावून घेतली व झपाट्यासरशीं एकदम दोघांवर वार केले. ती त्यांची अवस्था पहातांच बाकीचे चोर आपल्या मंडळीकडे प-

झाले. **संताजी** मोकळा झाल्यामुळें त्यानें **धनाजीच्या** हातची तलवार घेऊन मोठ्या आवेशानें चोरांच्या टोळीवर चाल केली. चोर हत्यारबंद असल्यामुळें उभयतांची चकमक सुरू झाली; तेव्हां **संताजीस** साहाय्य करण्याकरितां **धनाजी** व **कदम** हे उभयतांही तिकडे धांवले. तो दंगा ऐकून मागें झाडींत असलेले चोर भिर्र भिर्र असे मोठाले दगड फेंकीत बाहेर पडले. त्यांपैकीं एक दगड **राजाराम महाराजांच्या** कपाळावर बसून '**धनाजी, मेलोंरे मेलों**' असें ह्मणत ते कळवळून जागच्याजागीं धाडकन् जमिनीवर पडले. परंतु, त्या दंग्यांत **महाराजांच्या** आरोळीकडे कोणाचेंच लक्ष पोंचलें नाहीं. इतकें होत आहे तों, एकाएकीं दोन घोडेस्वार आपले घोडे भरधांव टाकीत त्या ठिकाणीं येऊन पोंहोचले. दुरून घोड्यांच्या टापा कानीं पडतांच चोरांनीं पळ काढिला, व बघतां बघतां ते झाडींत दिसेनासे झाले. परंतु, **संताजी**, **धनाजी** व **कदम** यांनीं त्यांची पाठ सोडिली नाहीं; ते त्यांच्या मागून झाडींत शिरले. इकडे वर सांगितलेले दोन घोडेस्वार ओढ्यांत उतरतात तों, कोणी एक मनुष्य जमिनीवर पडला आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. त्याच्या डोक्यांतून सारखें रक्त चाललें होते व तो बेशुद्ध झाला होता. अशी त्याची दीनवाणी स्थिति पाहून स्वारांस त्याची दया आली, व त्यांनीं त्याचें रक्त वगैरे पुसून काढून त्याला सावध करण्यासाठीं पुष्कळ उपाय केले. पुढें तो किंचित् सावध झाला, असें पाहून ते त्याला कांहीं हकीकत वि

चारिताहेत तों **धनाजी, संताजी** व **कदम** हे त्रिवर्गही चोरांचा मागमूस नाहींसा करून मागें परतले. इतकें सर्व होतें तों, अरुणोदयाचा समय आल्यामुळें थोडें थोडें दिसूं लागलें. ‘ आज आपल्यास ह्या जवळ असलेल्या दोघां घोडेस्वारांनीं खरोखर जीवदान दिलें ’ असें **महाराजांच्या** तोंडचें भाषण ऐकून **धनाजी** व **संताजी** यांचे कंठ दाटून आले. त्यांनीं त्या स्वारांचे अत्यंत उपकार मानून त्यांस मोठ्या प्रेमानें ‘ तुह्मी कोठील कोण ’ वगैरे प्रश्न विचारिले. त्यावेळीं जरी एकमेकांचे चेहरे एकमेकांस स्पष्टपणें दिसत नव्हते, तरी ओळखीचा शब्द कानीं पडतांच परस्परांनीं परस्परांस ओळखिलें, व भयंकर प्रसंग पार पडून ईशकृपेनें सर्वांच्या गांठी पडल्याबद्दल त्यांनीं विश्वंभराचे अनन्यभावें आभार मानिले.

वाचकहो, हे घोडेस्वार कोण असावेत, हें तुमच्या लक्षांत आलें असेलच. **खंडो बल्लाळ** व **दाभाडे** हे स्वारांचे वेश घेऊन **महाराजांच्या** शोधार्थ निघाले असतां, **कोल्हारा**पाशीं अशा रीतीनें सर्वांच्या गांठी पडल्या. पुढें तेथून ती सर्व मंडळी मोठ्या आनंदानें **वेल्हारा**वरून **जिंजी**कडे वळली. **महाराज** आल्याची वार्ता **प्रल्हादपंतांस** कळविण्याकरितां **दाभाडे** पुढें आले. त्यांच्या तोंडून तें आनंदाचें वर्तमान ऐकतांच **महाडीक, अमात्य, हणमंते** व **प्रल्हादपंत** एकंदर सरंजाम घेऊन सामोरे गेले. सर्वांच्या भेटी होऊन मोठ्या थाटामाटानें **महाराजांची** स्वारी किल्ल्यावर गेली.

**अमात्य** व **हणमंते** यांणीं किल्ल्यावरील धनदौलत, सामानसुमान व फौजफांटा यांची व्यवस्था उत्तम रीतीनें ठेवून आपल्या हाताखालच्या मुलखांत चोहोंकडे आबादानी राखिली होती. तेव्हां त्यांची ती हुषारी लक्षांत आणून पुढें **प्रल्हादपंतांच्या** हातांत तेथील सर्व राज्यकारभार येतांच, त्यांनीं प्रथम त्या उभयतांना मोठ्या योग्यतेस चढविलें. **प्रल्हादपंत** हे मोठे धूर्त, शहाणे, कार्यकुशल व खऱ्या गुणाचे चहाते असल्यामुळें, त्यांच्या हातीं सर्व सत्ता येतांच, त्यांनीं कांहीं जुन्या धोरणावर व कांहीं नवी पद्धत घालून हळूहळू एकंदर शिस्त बसविली. इतक्यांत **राजाराम** वगैरे मंडळी **जिंजीस** पोंचून तेथें **प्रल्हादपंत, धनाजी, संताजी** इत्यादि हिंमतदार गडी एकदिलानें स्वराज्याचें गेलेलें यश परत मिळविण्याच्या खटपटीस लागले आहेत, ही बातमी **महाराष्ट्रांत** पसरतांच **पवार, भोंसले, आठोळे, निंबाळकर, पांढरे, थोरात** वगैरे जे जे शिलेदार व मराठे मानकरी, **संभाजी**च्या कारकीर्दींत देशोधडीस लागून निरुपायास्तव स्वस्थ बसले होते, ते ते आपआपल्या टोळ्या जमा करून एकामागून एक **जिंजीस** जाऊं येऊं लागले. त्या जुन्या नोकरांचा योग्य सन्मान करून त्यांना पदरीं ठेवावें, स्वराज्याच्या उत्कर्षाचे कामीं झटण्याविषयीं त्यांच्या आंगीं ईर्षा उत्पन्न करण्यासाठीं त्यांस वरचेवर बक्षिसें द्यावीं, व आपल्या इतर देशबांधवांचीं मनें वळविण्याकरितां त्यांना **महाराष्ट्रीं** पाठवावें, असा क्रम

चालू असल्यामुळें, दिवसेंदिवस कर्नाटकांत मराठ्यांची बरीच मोठी जमात जमत चालली. या नवीन फौजेस धनाजी संताजीसारख्या रणांगणीं कसलेल्या वीरांचें लष्करी शिक्षण मिळूं लागतांच, त्यांची हिंमत वाढत जाऊन, त्यांच्या आंगीं शत्रूंशीं टक्कर मारण्याची कुवत हळूहळू येत चालली. प्रल्हादपंतांच्या नियमित व दूरदर्शीपणाच्या राज्यव्यवस्थेमुळें व त्यांनीं सर्वांस त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें वागवून प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत स्वराज्याच्या उन्नतीविषयीं उत्साह उत्पन्न करण्याचा जो सारखा यत्न चालविला होता, त्याच्यायोगानें गतवैभव पुनः संपादण्याविषयींची स्फूर्ति आबालवृद्धांच्या आंगीं जागृत होऊन, लवकरच सुदिन उगवण्याची चिन्हें दिसूं लागलीं.





# भाग १० वा.

———0:0———

अन्तःसारैरकुटिलैरच्छिद्रैः सुपरीक्षितैः ।
मंत्रिभिर्धार्यते राज्यं सुस्तंभैरिव मंदिरम् ॥

मागील भागीं सांगितल्याप्रमाणें **जिंजीस मराठ्यां**-चा उत्कर्ष होत जाऊन त्यांचें पाऊल दिवसेंदिवस पुढें पडत चाललें. तेव्हां आतां, **राजारामास** तख्तावर बसवून त्यांच्या नांवें राज्याचा कारभार चालवावा व **शिवछत्रपतींच्या** पद्धतीप्रमाणें **जिंजीच्या** दरबारींही **अष्टप्रधानादिकांच्या** नेमणुकी कराव्या, असें **प्रल्हादपंतांनीं** मनांत आणिलें. त्याला प्रमुख प्रमुख मंडळींचें अनुमोदन मिळतांच त्यांनीं एकंदर तयारी करविली. प्रथम **महाराजांच्या** मनांत आपल्यास राज्याभिषेक करून घ्यावयाचें नव्हतें. परंतु **पंतांच्या** आग्रहास्तव त्यांचा होकार मिळतांच किल्ल्यावर, वाड्यांत व घरोघरीं जिकडे तिकडे समारंभाची गर्दी उसळली. जंगी दरबार भरवून **प्रल्हादपंतांनीं** सुमुहूर्तावर मोठ्या थाटामाटानें स्वहस्तें **राजारामास** तख्तावर बसविलें, व त्याच बैठकीस निरनिराळ्या मंडळींना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें **अष्टप्रधानांचे** अधिकार देवविले. पूर्वीं **महाराष्ट्रांत** असतां **रामचंद्रपंतांस** ' **हुकुमतपन्हा** ' व **निळोपंत पिंगळे** यांस ' **पेशवे** ' असे किताब दिलेच होते. ते त्यांचे अधिकार का-

थम राखून **महादजी नाईक पानसंबळकर** वारल्यामुळे त्यांचें 'सेनापति' हें पद **संताजीस** देऊन, **जरीपटका** व **नौबत** त्याचे स्वाधीन केली. **धनाजीस** '**जयसिंगराव**' असा बहुमानाचा किताब दिला. **जनार्दनपंत हणमंते** यांची हुषारी पाहून '**अमात्या**चे' जागीं त्यांची नेमणूक केली. बाकी **संक्राजी मल्हार** यांस '**सचीव**,' **रामचंद्र त्रिंबक** यांस '**मंत्री**' **महादजी गदाधर** यांस '**सुमंत**,' **निराजी रावजी** यांस '**न्यायाधीश**' व **श्रीकराचार्य** यांस '**पंडितराव**' असे किताब देऊन **महाराजां**करवीं त्या सर्वांस वस्त्रें देवविलीं. इतकें सर्व झालें, पण त्या व्यवस्थेंत **प्रल्हादपंतांनीं** आपल्यास कोणतेंच पद किंवा मानाचा किताब घेतला नाहीं; असें पाहून **राजाराम महाराजांनीं** त्यांस '**पंतप्रतिनिधि**' अशी एक नवीनच पदवी देऊन **अष्टप्रधानांवर** त्यांची नेमणूक केली.

ही राज्याभिषेकोत्सवाची आनंददायक बातमी **विशाळगडीं** पोंचून सर्व **महाराष्ट्रीय**जनांस फार संतोष झाला, व आतां ईशकृपेंकरून आपले दुर्दिन लवकरच संपतील, असें त्यांस वाटूं लागलें. कांहीं दिवस लोटल्यावर **प्रल्हादपंतांनीं** असा विचार मनांत आणिला कीं, आज **जिंजी** मुकामीं आपल्या पदरीं जी मोठी फौज जमली आहे, ती सर्व एके ठिकाणींच कोंडून ठेवण्यापेक्षां, त्यापैकीं निम्मे लोक व **संताजी धनाजी**सारखे युद्धकलाविशारद सरदार, यांस परत **महाराष्ट्रांत** पाठवावें. कारण, तसें केल्यानें ज्या राजनिष्ठ व अभि-

मानी गड्यांनीं आजपर्यंत हालवनवास काढून स्वराज्यासाठीं इतका अट्टहास सोशिला, त्यांस शत्रूंचा खासा सूड उगविण्यास व आंगच्या कर्तबगारीचें चीज करून दाखविण्यास संधि सांपडून, त्यांच्या आंगीं दुप्पट ईर्षा उत्पन्न होईल. दुसरें असें कीं, **रामचंद्रपंतांस** मनुष्यबळ मिळून त्यांच्या ठिकाणीं हातपाय हालविण्याची कुवत येत गेली, ह्मणजे ते मोठी सावधगिरी बाळगून दमादमानें शत्रूंनीं काबीज केलेलीं ठाणीं सोडविण्याचा यत्न करतील. अशा रीतीनें शत्रूंस **महाराष्ट्रीं** शह पोंचून **मोंगल** सरदार तिकडे गुंतून राहिले, ह्मणजे **औरंगजेबास जिंजी**कडे लक्ष पोंचविण्यास फुरसत मिळणार नाहीं. याप्रमाणें **प्रल्हादपंतां**च्या मनाचा संकेत ठरून त्यांनीं तो आपला हेतु **महाराजांस** कळविला, व मुद्दाम मोठा दरबार भरवून त्यांत सर्वांच्या अंतःकरणामध्यें आपले विचार ठसण्यासारखें दिलदार व मर्दुमकीचें भाषण केलें. ते ह्मणालेः—

'**अष्टप्रधानादि मानकरी** व **सरदार**हो, ह्या स्वराज्यावर मध्यंतरीं कांहीं कालपर्यंत जीं जीं अरिष्टें ओढवलीं होतीं, तीं सर्व लयास जाऊन प्रभुकृपेनें आज हे सुदिन आमच्या दृष्टीस पडले व स्वधर्म आणि स्वदेशबांधव यांच्या रक्षणासाठीं कंबर कसण्याची कुवत आपल्या आंगीं आली. तेव्हां, त्या **ईश्वराचे** प्रथम आभार मानून, आतां आपल्या पुढील कर्तव्याविषयीं तुह्मांस दोन शब्द सांगावे अशी **महाराजांची** इच्छा असल्यामुळें, मी त्यांची आज्ञा घेऊन उभा राहिलों आहें.

तुह्मी जाणत आहां कीं, आपल्यास स्वदेशाचा त्याग करून इकडे आल्यास दोन तीन वर्षें होत आलीं. आरंभीं, वनवासांत असतां, मराठीराज्याचा अभिमान बाळगून त्याच्या उत्कर्षासाठीं अव्याहत परिश्रम करणाऱ्या कित्येक देशबांधवांवर जे जे दुर्धर प्रसंग गुदरले, व त्यांनीं स्वप्राणांपेक्षांही प्रिय मानलेल्या या भोंसलेकुलाची बूज राखण्याकरितां जीं जीं दुःखें सोशिलीं, त्यांची आठवण झाली ह्मणजे, कोणाचाही कंठ दाटून आल्यावांचून रहाणार नाहीं. पण ' देव तारी त्याला कोण मारी' अशी एक ह्मण आहे. त्याप्रमाणें ईश्वर रक्षण करणार झाला, ह्मणजे मनुष्यावर कितीही संकटें कोसळलीं, तरी तीं आपोआप नाहींशीं होऊन त्याची उन्नत्ति होण्यास क्षणाचाही अवकाश लागत नाहीं. संताजी, धनाजी, दाभाडे, खंडो बल्लाळ वगैरे स्वामिभक्तिपरायण पुरुषांनीं अनेक संकटें सोसून एक दिलानें आजपर्यंत जी या गादीची सेवा केली, त्यांच्या त्या कर्तबगारीवरच हें कर्नाटकचें राज्य, हें बल, हें वैभव, ही सत्ता, व हे सौख्याचे दिवस सर्वांच्या दृष्टीस पडले; नाहींपेक्षां, आजमितीस आपली काय अवस्था झाली असती, याचा तर्क देखील करणें कठीण आहे. पण आतां, एवढ्यानेंच आपली इतिकर्तव्यता संपली, असें समजून मात्र स्वस्थ बसतां कामानये. सुदैवानें प्राप्त झालेल्या बलावर यापुढें आपणांस अनेक जबाबदारीचीं व महत्वाचीं कामें बजावावयाचीं आहेत, हें सर्वांनीं लक्षांत ठेवून, परधर्मीयांच्या जाचामुळें दीन

होऊन गेलेल्या स्वकीयांच्या दुःखाचा परिहार करण्याकरितां, आंगच्या गुणावर व मनगटाच्या जोरावर कुडींत प्राण असेपर्यंत हे देह झिजविले पाहिजेत. ह्मणजे, आह्मी त्या नांवाजून गेलेल्या वीरवरांचे व यशस्वी पूर्वजांचे खरे बच्चे आहोंत, अशी आपली कीर्ति जगावर पसरेल; आणि ज्या **प्रभूनें** आह्मांवर एवढी खैर केली, त्याच्या कृपेस आपण पात्र होऊं. नाहींपेक्षां, कसचें जिणें? आपल्या मागें स्वातंत्र्यानें नाडले जाऊन **यवनांच्या** प्रखर जाचामुळें अनिवार दुःखें सोशीत असलेल्या **महाराष्ट्रीय** प्रजाजनांस धैर्य देऊन त्यांना वाघाच्या दाढेंतून सोडविण्याची, व मत्त झालेल्या **मोंगल** सैन्यास आपल्या तरवारीचें पाणी पाजून **हिंदूंचें हिंदुत्व** जगावर गाजविण्याची, आतां वेळ आली आहे. तर **सरदारहो**, ह्या प्रसंगीं हरहुन्नर करून शत्रूंस आपल्या धिमेपणाची, शौर्याची, कर्तृत्वाची व मर्दुमकीची पुरी ओळख दिल्यावांचून राहूं नका.

शत्रूंचें लक्ष्य अद्याप **कर्नाटकाकडे** वळलें नाहीं. तोंपर्यंतच, आपण सावध होऊन **मोंगल** सैन्यास इकडे येण्याची फुरसत सांपडणार नाहीं, अशी तजवीज राखिली पाहिजे. आज ईशकृपेनें बऱ्याच गोष्टी आपल्यास अनुकूल झाल्या आहेत. तर आतां, जेणेंकरून **मायदेशाची** सेवा घडेल आणि आपल्यास व आपल्या पुढील पिढीस स्वातंत्र्य सौख्याचा लाभ होईल, ते उपाय योजण्यासाठीं हिय्या धरून आपण कंबर बांधूं; ह्मणजे, सर्वांनीं आजवर जे कष्टतर स्थितींत आणि अज्ञातवा-

सांत दिवस काढिले, त्याचें सार्थक होईल; व **महाराजां**-नीं तुह्मांपैकीं कित्येक शूर सरदार आणि निम्मीशिम्मी फौज परत **महाराष्ट्रीं** पाठवून स्वराज्याचा झेंडा उभारण्याचा यत्न करण्याविषयीं जो विचार मनांत आणिला आहे, तो साध्य झाल्यावांचून खचीत रहाणार नाहीं. तिकडे गेल्यावर, **रामचंद्रपंतांच्या** सल्लयानें वागून हरएक कामगिरी आस्थेनें आणि शहामतीनें बजावीत गेलांत, ह्मणजे '**जन्मा आलीयाचें फळ। कांहीं करावें सफळ**' या **समर्थांच्या** वचनाप्रमाणें जगीं धन्यता पावाल, व हें तुफानांत सांपडलेलें **स्वराज्याचें तारूं** लवकरच पैलतीरीं लागेल.'

हें **प्रल्हादपंतांचें** भाषण ऐकतांच सर्वांच्या आंगीं स्फुरण चढलें. आतां, आपण केव्हां **महाराष्ट्रीं** जाऊं, आणि त्या क्रूर व मदांध झालेल्या शत्रूंस आपल्या तीक्ष्ण भाल्यांचें पाणी पाजून त्यांचा केव्हां सूड उगवूं, असें त्यांस होऊन गेलें. **घोरपडे, जाधव, थोरात, भोंसले, निंबाळकर** वगैरे मंडळींनीं दुसरे दिवशीं लागलीच निघण्याची तयारी केली. **महाराजांची** आज्ञा घेऊन पंधरा हजार सैन्यानिशीं ते सरदार **महाराष्ट्रीं** यावयाकरितां निघाले, ते मजल दरमजल करीत सुमारें महिन्यानें **विशाळगडीं** येऊन पोंचले. पूर्वीं, **महाराष्ट्रांतून राजाराम महाराज कर्नाटकीं** जावयास निघाले, तेव्हां **ताराबाईस** दोन तीन महिने गेले होते, असें मागें सांगितलेलें वाचकांच्या लक्षांत असेलच. पुढें त्यांस नवमास भरून पुत्ररत्न झालें. ती

आनंदाची बातमी **जिंजीस** कळवून **रामचंद्रपंतांनीं** त्या मुलाचें नांव **शिवाजी** असें ठेविलें. तो किंचित् मोठा होऊन तिकडे **कर्नाटकीं जिंजीचा** एकंदर राज्यकारभार सुयंत्र चालूं लागतांच, **महाराजांच्या** आज्ञेवरून **रामचंद्रपंतांनीं ताराबाई, राजसबाई** व **शिवाजी** या त्रिवर्गांस **जिंजीस** रवाना केलें.

इकडे, **मल्हादपंत** वगैरे मंडळी **कर्नाटकीं** जाऊन त्यांनीं **जिंजी** मुक्कामीं **राजाराम महाराजांस** तख्ताधिपति केलें, व स्वराज्याची उभारणी करण्याचा पुनः उद्योग मांडिला, ही बातमी **बादशहाच्या** कांनीं पडतांच, त्याचें पित्त खवळून गेलें. स्वतां सर्व सैन्यासहवर्तमान **कर्नाटकीं** उतरून शत्रूंस कैद करावें, असें त्यानें प्रथम मनांत आणिलें होतें. परंतु, तसें केल्यानें कदाचित् ते कपटी शत्रु परत **महाराष्ट्रांत** उलट खातील व सतत वर्ष दोन वर्षें आयास भोगून बसविलेली सत्ता झुगारून देण्याचा यत्न करितील, असा विचार करून तो बेत त्यानें रहित केला. आपण **भीमेच्या** कांठची **महाराष्ट्रांतील** छावणी न हालवितां, **झुलफिकारखानासारख्या** पराक्रमी सरदाराच्या हाताखालीं मोठें सैन्य देऊन त्याला **जिंजीकडे** पाठविल्यानें शत्रु खचीत आपल्या हातीं लागतील, असें **बादशहास** वाटलें.

**औरंगजेबः**—**झुलफिकारखां** मन्हेटोंके जैसे आदू **दकनमे** कोई नहींरहा, इनकू खाकदरखाक करदिया समजके बेफिकीर हमने यहांपे सालदेडसालका आरसा हुवा, जोबाऐशो अशरत गुजार रहेहैं. **संभाजीकी**

औरत **येसूबाई** और उसका लडका **शिवाजी** हमारे छावनीमें आनेके बायस मऱ्हेटोंको हातपैर हिलानेकी कुच जुरअत नरही, तुह्मारे जैसे हमबी समजाथा. वहांतो, **रामचंद्रपंत** कोंकनमें पनःलिये रहाहै, ऐसे धोकेमे हमने उसकी हेलाकीसे दस्तबरदार हुवे. शिवाय, इसके हमारे मुतालिक आमीलोंको जाबजा दक्कनभरमें बडी फरहतसे रहनेकी मोहलत दी; गोया ये बडी खता हुई. क्यौंके, इसी सबबसे ऐसे बागी अदूको दूर **कर्नाटक**मे निकलजाके **राजाराम**के नामपर गलबा करनेको, और **जिंजी**मे आपनी मुखतारी ठेराके आपने हम कौम मऱ्हेटे भाईबंदोंको इगवा देनेको, उमदा काबू हात चढा. इस **औरंगजेब**की जेरेहुकूमत तुमजैसे शेरहाय झियान रहते हुवे, एक थोडीशी बशियामे ऐसे गुर्गेशगाल दुमकट्टे कानफट्टे दबेहुये, जमानातहे करनेवालेको तुमारा बिलकुल दबदबा और दहशतका पेशअंदेशा न रखते, ए कमीना **दक्कन**मे उतर करके मगरूर बनजाना, ये बडी नादिर और पशीमानीकी बातहै. अब उनकी शिकस्त और दुबालेकेलिये बीस हजार लष्करके सात **कर्नाटक**पर चढाईकी तयारी करो. **जिंजी** फता करके **राजाराम** और उसके मुत्सद्दियां वगैरेको मुकय्यद करें, जबही काम याब हुवे. वइछा आजलग जो मेहनत हुवी, मुफ्तबेकार होजाएगी.

[ **झुलफिकारखान, मराठ्यांसारखे शत्रु महाराष्ट्रांतून नाहींसे झाल्यामुळें ते धुळीस मिळाले असें समजून, आपण वर्ष दीड वर्ष इकडे बिनाफिकीर मजा**

मारीत बसलों. **संभाजीची स्त्री येसूबाई** व **धाकटा शिवाजी** हीं आपल्या छावणींत आल्यामुळें, आतां **मराठ्यांस** कोणत्याही प्रकारें हातपाय हालविण्यास आधार राहिला नाहीं, असें तुह्मांप्रमाणें मलाही वाटलें होतें. **कोंकणप्रांतीं रामचंद्रपंत** जरी अद्याप जीव धरून राहिला आहे, तरी त्याला पाहिजे तेव्हां धुळीस मिळवितां येईल, या भरावर आपण त्याजकडे दुर्लक्ष्य केलें. शिवाय, जागोजाग छावण्या करून आपण आपल्या सरदारांस **दक्षिणे**ची मजेशीर हवा खात राहूं दिलें, ही मोठी चूक झाली. कारण, त्याच्या योगानें त्या कपटी शत्रूंस, दूर **कर्नाटकीं** जाऊन **जिंजी** येथें आपली सत्ता बळावण्यास व **महाराष्ट्रां**तील स्वज्ञातबंधूंस उचल देण्यास चांगली संधि सांपडली. ह्या **औरंगजेबाच्या** पदरीं **महाराष्ट्रां**त तुह्मांसारखे वाघ गुरगुरत असतां, झाडींत लपूनछपून दिवस काढणाऱ्या त्या **लांडग्यांनीं** तुमची यत्किंचित्‌ही भीति न धरितां निर्भयपणें **कर्नाटकीं** उतरून मस्त व्हावें, ही मोठ्या आश्चर्याची व दिलगिरीची गोष्ट होय; तर आतां, त्यांची पाठ पुरविण्याकरितां उदईक **कर्नाटकीं** निघण्याची तयारी करा. **जिंजी** सर करून **राजाराम** व इतर मुत्सद्दी मंडळी यांस कैद करण्याचें काम एकवार सिद्धीस गेलें, ह्मणजे आपण मिळविली. नाहींपेक्षां, आजपर्यंत केलेलें सर्व व्यर्थ होईल. ]

**झुलफि०:**--बादशहासलामत मऱ्हेटेजैसे आजीज आदूकेलिये ऐसी परलेसरकी फिकर करनी, कुच हा-

जत नही. आपकेतहते हुकूमत लाखो फौज और हज्जारों तऱ्हेकी हिकमत ओ दानिशमंदीसे तमामी दुनियाको तहोबाला करनेवाले एकसेएक अमीरदबीर हाशानशीना व परस्तारानेशाही मौजूद रेहेते हुवे, ओ ऐसे कमजोर बेहिम्मत मऱ्हेटोंका कुच खौप व खतरा नही. मानिंद उस बिल्लीके जो चुहेको आपने पंजे हमलेकी एक थपडसे झिंजोडके नीमजान करछोड देतीहै, वैसाही मऱ्हेटोंको नीममुर्दे करके एक लहजेभर तडपमे छोडदिया; नहींतो, आजलग उन मऱ्हेटोंका एक बींजभी दुनियापे बिलकुल बाकीनरहे, ऐसा करदिया जाता. फिलहाल, अगर **बादशहा** सलामतके इरादेमे मऱ्हेटोंका बिलकुल कुश्त खूनसे खाक आमेज करदेना हो, तो एक साअतभर नलगेगा. फक्त **कर्नाटक**ही चेजाय बलके तहतुस्सरामेभी पाहोंचा हुवे, जमीन उमडके वंहासेभी इनको खाकदरखाक करनें **बादशहा** सलामतके अरकानोंसे एक अदनासा सरदार किफायत करसकताहै. फिरतो, जब **झुलफिकारखां** बहादर जाते-हैं, **राजाराम** और उसके तमामी इलाखेवालोंको एकलख्त मुशाकिया तन्वाके हुजूरे आलीमे हाजिर करनेमें कुच शक नहीहै. ऐसे होते हुवे, खुदावंतने किसीनोकी कुच मुजाहेमत नजाने, बेफिकर रहें.

[ **सरकार, मराठ्यांसारख्या** यःकश्चित् **शत्रूबद्दल** इतकी काळजी करण्याचें मुळींच कारण नाहीं. आपल्या पदरीं आज लाखों फौज व स्वपराक्रमानें सर्व दुनिया हालवून टाकणारे एकापेक्षां एक **अमीरउमराव**

स्वामिसेवेंत तत्पर असतां, त्या दुर्बल व अजागळ **मराठ्यांची** इतकी भीति ती कसली? मांजर जसें उंदराचा एकदम प्राण न घेतां त्यास तोंडांतून खालीं सोडून प्राणरक्षणार्थ क्षणभर इकडे तिकडे धांवूं देतें, तद्वत् आपण **मराठ्यांस** अर्धमेले करून क्षणभर खेळूं दिलें; नाहींपेक्षां, आजपर्यंत त्यांचें नांव देखील दुनियेंत रहातेंना. आतां, **खाविंदांच्या** मनांत त्यांचा एकदम नाश व्हावा असें असल्यास, एका क्षणाचाही अवकाश नको. **कर्नाटकींच** काय, पण ते जरी **पाताळीं** गेले असले, तथापि त्यांस तेथून ओढून काढून त्यांचा नाश करण्यास आपल्या पदरचा एखादा यःकश्चित् सरदारदेखील समर्थ होईल. मग, हा **झुलफिकारखान** गेल्यावर **राजाराम** व त्याची मुत्सद्दी मंडळी यांस एका निमिषार्धांत चतुर्भुज करून सरकारच्या चरणापाशीं आणिल्यावांचून खचीत रहाणार नाहीं. तर, त्याबद्दल **खाविंदांनीं** कोणतीही फिकीर मनांत न आणितां स्वस्थ असावें. ]

याप्रमाणें **बादशहाचा** निरोप होतांच वीस हजार सैन्य घेऊन **दाउदखान, किलिजखान** वगैरे पदरच्या सरदारांसहवर्तमान **झुलफिकारखान कर्नाटकीं** जावयास निघाला. मजल दरमजल करीत **जिंजीपर्यंत** येतो, तों **मराठ्यांची** जय्यत तयारी पाहून तो दचकला. **महाराष्ट्रांत बादशहाच्या** छावणीमध्यें ऐषआराम भोगीत असतां, **जिंजी** सर करणें ह्मणजे केवळ परसांतील भाजी अशी जी त्याची समजूत झाली होती, ती सम-

जूत व तो त्याच्या मनांतील पोकळ भ्रम दूर झाला. किल्ल्यावर दहावीस हजार करोल **मराठे** कंबर बांधून उभे आहेत असें जेव्हां त्याच्या दृष्टीस पडलें, तेव्हां **जिजी**सारखा बिकट किल्ला व त्याच्या रक्षणार्थ जिवावर उदार झालेले **मराठे** यांजपुढें आपल्या सैन्याचें कांहीं चालणार नाहीं, असें त्याला वाटलें. तथापि, किल्ल्यास वेढा देऊन त्यानें **बादशहास** तो सर्व प्रकार लिहून कळविला, व मदतीसाठीं आणखी दहापांच हजार सैन्य पाठवून देण्याविषयीं विनंति केली. इकडे **महाराष्ट्रीं, संताजी, धनाजी, निंबाळकर, भोंसले,** वगैरे सरदार सैन्यासहवर्तमान येऊन मिळतांच **रामचंद्रपंतांनीं** असा विचार केला कीं, आतां स्वस्थ बसून उपयोगी नाहीं. कारण, त्याच सुमारास शत्रूंनीं **वांई** व त्याच्या खालचा प्रदेश काबीज करून तिकडील ब्राह्मणांचा अतिशय छळ मांडिला होता. **वांईक्षेत्रां**तील कित्येक ब्राह्मण शत्रूंच्या असह्य जाचामुळें त्रासून जाऊन जिवाच्या आशेनें, बायकांपोरांसहवर्तमान **कोंकण** प्रांतीं गेले होते. तेव्हां, तें **पुण्यक्षेत्र** शत्रूंच्या हातून सोडवून ब्राह्मणांचा छळ करणाऱ्या शत्रूंस गोब्राह्मणप्रतिपालक **शिवछत्रपति भोंसलेंकुलाचा** प्रतापरवि पुनः उदयाचलावर प्राप्त होण्याचा समय आला आहे, असें कळविण्यास हाच समय योग्य असें समजून, त्यांनीं **संताजी व धनाजी** यांस ती कामगिरी सांगितली. त्यासरसे ते दोघे वीर सहा हजार पायदळ व आठ हजार स्वार बरोबर घेऊन हांहां ह्मणतां **वांईस** दाखल झाले.

त्यांनीं शत्रूंच्या गोटावर एकदम हल्ला करून त्यांची फारच धुळधाण उडविली; तेव्हां, ते आपलें सर्व सामान-सुमान टाकून पळाले. **मराठ्यांनीं** शत्रूंची छावणी लुटून जाळून नाहींशी केली, व तेथील ब्रह्मवृंदांस **म्लें**-च्छांच्या तावडींतून मुक्त केलें. **वांईहून** परत येतांना **संताजीनें मिरजेच्या** किल्ल्यास वेढा दिला. तेथील **मोंगल** फौजदार **दाउदखान** यानें एकदोन दिवस किल्ला लढविला; परंतु, पुढें आपला निभाव लागत नाहीं असें जेव्हां त्याला दिसून आलें, तेव्हां त्यानें तो किल्ला **मराठ्यांच्या** स्वाधीन केला. याप्रमाणें झपाट्या-सरशीं **वांई** व **मिरज** हीं दोन्ही ठाणीं मारून **धनाजी** व **संताजी** हे उभयतांही **सोलापुरावरून अहंमदनग**-**राकडे** वळले.

**वांई** व **मिरज** येथील **मोंगल** सरदार आपापलीं सैन्यें घेऊन **पन्हाळगडच्या** आश्रयास आले होते. परंतु, ती बातमी **रामचंद्रपंतांस** समजतांच, त्यांनीं **प**-**रशुरामपंत किनईकर** याच्या हाताखालीं **भोंसले** व **पवार** ह्या मराठे सरदारांस देऊन दहा हजार सैन्यानिशीं **पन्हाळा** सर करण्याकरितां ताबडतोब पाठविलें. शत्रूंस ही **मराठ्यांची** चळवळ समजल्यामुळें त्यांनीं किल्ल्याचा बंदोबस्त करून लढाईची तयारी चालविली होती. इतक्यांत, **परशुरामपंतानें** एकदम किल्ल्यास वेढा देऊन तोफ सुरू केली. कित्येक दिवस-पर्यंत गोळ्यांचा सारखा वर्षाव चालला होता. परंतु, **मोंगल** दाद देईनात. आधींच किल्ला बळकट; त्यांतून

**सरजेखानास** वांई व मिरज येथील सैन्यांची मदत मिळून तो सावध झाल्यामुळें, सोप्या रीतीनें किल्ला हातीं लागेल, असें **परशुरामपंतास** वाटेना. तेव्हां, मराठे कांहीं दिवसपर्यंत स्वस्थ बसून राहिले. किल्ल्यांतील लोकांपाशीं धान्याचा वगैरे चांगला पुरवठा असल्यानें तेही बिनफिकीर होते. पण, पुढें एके दिवशीं रात्रीं कांहीं मसलत करून **परशुरामपंतानें** अकस्मात् उत्तरेच्या बाजूनें किल्ल्यास शिडी लाविली. दोन तीन **मराठे** तटावर चढून जात तोंपर्यंत, शत्रूंस कांहींच बातमी लागूं दिली नाहीं. पुढें एकदम **हरहर** शब्दाचा गजर होऊन जेव्हां बंदुकांची फैर झडली, तेव्हां **मोंगल** जागे होऊन पहातात, तों **मराठ्यांनीं** कित्येक लोक जागच्या जागीं ठार केले. '**दगारे दगा**' असें म्हणून **मोंगल** चवताळून **मराठ्यांवर** चालून येतांच उभय सैन्यांतील लोकांची कत्तल उडण्यास प्रारंभ झाला. कांहींवेळ पर्यंत एकसारखी तोडातोडी चालली होती. **पवार** व **भोंसले** हे सरदार तटावर विद्युल्लतेसारखे चमकत शत्रूंचीं गर्दनें चटाचट उडवीत आहेत, तों **परशुरामपंतानें** मोठ्या शहामतीनें **सरजेखानावर** आपली तरवार चालवून त्याचा बळी पाडिला. ती आपल्या सरदाराची स्थिति पहातांच **मोंगल** सैन्यांत एकच हाहाःकार उसळून गेला. कित्येकांनीं जिवाची आस्था न धरितां कड्यावरून धडाधड खालीं उड्या घेतल्या. बाकीचे लोक **मराठ्यांस** शरण आले. अशा रीतीनें सन १६९२ या वर्षी **परशुरामपंतानें** **पन्हाळा** सर

करून शत्रूंस फारा दिवसांनीं परत मराठ्यांचें खरें क्षात्रतेज दाखविलें. याप्रमाणें पन्हाळा मराठ्यांच्या हातीं येतो, तों तिकडे संक्राजी नारायण व निंबाळकर यांणीं राजगड सर करून तेथून शत्रूंस हांकून लाविलें.

मोंगलांच्या पराक्रमानें सर्व महाराष्ट्रदेश दणाणून जाऊन मराठे देशोधडीस लागल्यास उणीं पुरीं तीन वर्षें होतात न होतात, तों ईशकृपेनें परत धनाजी, संताजी, परशुरामपंत, भोंसले, पवार यांसारख्या अपूर्व करामतीच्या तेजस्वी पुरुषांचे भाले महाराष्ट्रांत शत्रूंच्या काळजाचा ठाव घेण्यास तयार झाले, हें पाहून कोणा स्वदेशभक्तास कौतुक वाटणार नाहीं बरें? ही आपल्या देशबंधूंची सरशी होत चाललेली पहातांच, विजापूर व गोंवळकोंडेकरांच्या पदरचे जे स्वार व शिपाई निराशेनें लष्करी पेशा टाकून स्वस्थ बसले होते, ते मोठ्या ईर्षेनें आपआपल्या सरंजामासह रामचंद्रपंतांस येऊन मिळत चालले. अशा रीतीनें मराठ्यांची दिवसेंदिवस कुवत वाढत जाऊन, त्यांच्या पदरीं पंचवीस तीस हजार फौज जमली. तेव्हां, आतां इतक्या फौजेस स्वस्थ बसूं न देतां, कित्येक सरदारांस शत्रूंनीं काबीज केलेला मुलूख परत मिळविण्याकरितां उत्तरेंत पाठवावें, ह्मणजे आपले पूर्वींचे चौथ व सरदेशमुखी हे हक्क वसूल होऊन लष्करी खर्चाची फारशी पंचाईत पडणार नाहीं, असें मनांत आणून रामचंद्रपंतांनीं थोरात, निंबाळकर, व जगताप यांस

आठ हजार सैन्यासहवर्तमान **गुजराथेकडे** पाठविलें. **पवार, भोंसले** व **आठोळे** या सरदारांस **गोदातीर वऱ्हाड** व **खानदेश** या प्रदेशांत **मराठ्यांचा** अंमल बसवावा असा हुकूम देऊन, त्यांची तिकडे रवानगी केली. ह्या सर्व सरदारांस परमुलुखीं स्वतांच्या खर्चासाठीं '**घांसदाणा**' ह्मणून एक निराळा हक्क घेण्याची **रामचंद्रपंतांनीं** परवानगी दिली होती.

तिकडे, **झुलफिकारखान** किल्ल्यास वेढा देऊन **बादशहाकडील** मदतीची वाट पहात स्वस्थ बसला होता, असें मागें सांगितलेंच आहे. परंतु, **धनाजी, संताजी** वगैरे **मराठे** सरदारांनीं **महाराष्ट्रांत** जिकडे तिकडे धामधूम उसळून टाकिल्यामुळें बहुतेक **मोंगल** सरदार व सेना, कांहीं **सोलापूर** प्रांतीं, कांहीं **गोदातीरीं**, कांहीं **वऱ्हाडाकडे** व कांहीं **विजापूरच्या** आसपास गुंतून राहिलेली होती. तेव्हां, **औरंगजेबास कर्नाटकीं** सैन्य पाठवितां येईना. कांहीं दिवस वाट पाहिल्यावर **झुलफिकारखानानें** मनांत आणिलें कीं, आतां फौज येईपर्यंत **जिंजी** मुक्कामीं माशा मारीत बसण्यापेक्षां, **दक्षिणेकडील** प्रांतावर स्वारी करून लूट मिळवावी; असा विचार करून त्यानें **दाउदखान** व **किलिजखान** हे उभयतां सरदार आणि कांहीं सैन्य **जिंजीस** ठेविलें, व बाकीचे लोक बरोबर घेऊन आपण **त्रिचनापल्लीकडे** निघून गेला. **झुलफिकारखान** जरी **दक्षिणेकडे** निघून गेला होता, तरी तो महापराक्रमी, मसलती व धाडशी सरदार केव्हां परतेल व कोणत्या

वेळीं कसा प्रसंग आणील, ही भीति मल्हादपंतांच्या मनांत होतीच. कारण, किल्ल्याचा उत्तम बंदोबस्त असून दहा बारा हजार सैन्य जरी मल्हादपंतांपाशीं होतें, तरी झुलफिकारखानानें जें काम एकदां हातीं धरिलें, तें तो, आज नाहीं उद्यां केव्हांही व कसेंही सिद्धीस नेण्याविषयीं हरप्रयत्न केल्यावांचून रहावयाचा नाहीं, अशी मल्हादपंतांची पक्की खात्री होती. शिवाय, त्या कडव्या व खऱ्या महंमदी हाडाच्या सरदारानें मागें कित्येक प्रसंगीं जो अद्वितीय शूरपणा गाजविला होता, त्याच्या योगानें तो खरा मर्द व खरा तेजस्वी योद्धा आहे, अशी त्याची चोहोंकडे कीर्ति गाजली होती. तेव्हां, जोंपर्यंत तो नेकजात सरदार कायावाचामनेंकरून प्रेमपुरस्सर आपल्या धन्याचें हित चिंतीत आहे व बादशहाच्या मनांत त्याजविषयीं पूज्यबुद्धि वागत आहे, तोंपर्यंत आपला कार्यभाग शेवटास जाणें कठीण; तर, ती स्वामिसेवकांची दुक्कल ज्या योगें फुटेल व त्यांचा परस्परांच्या ठायीं असणारा अकृत्रिम विश्वास ज्या उपायांनीं लयास जाईल, तें साधण्याविषयीं हरप्रयत्न केला पाहिजे असा विचार करून मल्हादपंत त्या उद्योगास लागले.

बादशहाची लाडकी कन्या रोषणार इची भक्ति व प्रेम येसूबाईसाहेबांच्या ठिकाणीं पूर्णपणें जडलें होतें. तर, झुलफिकारखानाविषयीं औरंगजेबाच्या मनांत काळेंबेरें उत्पन्न करण्यास तें शहाजादीचें प्रेम आपल्यास उपयोगी पडेल, असें पंतांस वाटलें. कारण,

प्रेमाच्या मनुष्यावांचून त्या सरदाराच्या संबंधानें बादशहापाशीं बरा वाईट कसाही शब्द काढण्यास दुसरें कोणीही धजावयाचें नाहीं, व धजलें तरी पुनः त्याच्या हातून बादशहाचें मन झुलफिकारखानाविषयीं दूषित करवेल किंवा नाहीं, याची शंकाच. तेव्हां, मनांत आणिलेल्या मसलतीची घडी उत्तम प्रकारें बसली तर ती एक आईसाहेबांच्या द्वारें रोपणारकडूनच बसेल, असा विचार करून प्रल्हादपंतांनीं महाराजांस आपला पुढील हेतु कळविला; व बादशहाच्या छावणीसंबधानें पुरा माहितगार जो उदाजी कदम त्याला आईसाहेबांकडे पाठविण्याची तजवीज केली. कदम हा मोठा चतुर, हवी ती भाषा बोलण्यांत निष्णात व घतलेल्या सोंगाची बतावणी बेमालूम रीतीनें करणारा असल्यामुळें, तो जिंजीहून पुनः हकीमाचा वेश घेऊन जो निघाला, तो फिरत फिरत पंचवीस दिवसांनीं बादशहाच्या छावणींत येऊन पोंचला. पुढें एके दिवशीं संधि साधून त्यानें भक्ताजीची एकांतीं गांठ घेतली व त्याला महाराजांकडील एकंदर वर्तमान कळविलें. प्रल्हादपंतांची विनंति आईसाहेबांच्या कानावर घालावी व ह्या प्रसंगीं स्वराज्यावर येणारें संकट टाळण्याविषयीं हरप्रयत्न करावा, असें सांगून कदम आपला कार्यभाग आटपतांच कर्नाटकीं परतला.

उदाजीच्या मुखावाटें जिंजीकडील वर्तमान व स्वराज्यरक्षणासाठीं प्रल्हादपंतांसारख्या शहाण्या व कारस्थानी पुरुषाची दक्षता वगैरे गोष्टी ऐकून येसूबा-

ईस फारच आनंद झाला. आतां, आपल्या दुर्दैवाची रात्र सरून लवकरच भाग्यसूर्याचा उदय होईल, असें तिला वाटलें. पण, **झुलफिकारखानास** एकदम **महाराष्ट्रीं** परत बोलावण्याविषयीं **बादशहाचें** मन वळविण्याची **प्रल्हादपंतांनीं** सुचविलेली मसलत आपल्या हातून सिद्धीस जावी कशी व त्यांचें तें कारस्थान साध्य व्हावें कसें, एतद्विषयींच्या चिंतनें तिला रात्रंदिवस चैन नाहींसें झालें. इतक्यांत, **बादशहाचा** मुलगा **कामबक्ष** विजापुराकडे गेलेलें सैन्य घेऊन परत छावणींत आला, हें वर्तमान तिच्या कानीं पडलें. तेव्हांपासून तर **येसूबाईच्या** जिवांत जीव नाहींसा होऊन, आतां **बादशहा** विजापुराकडून आलेलें सैन्य **झुलफिकारखानाच्या** मदतीस पाठवील, ही तिला धास्ती पडली. पण, **येसूबाई** ह्मणजे खऱ्या धैर्याची व शहाणी बायको. तेव्हां, अशा प्रसंगीं दम न सोडितां तिनें कोणत्या युक्तीनें आपला हेतु सिद्धीस नेण्याचा घाट घातला, हें आतां पुढील भागीं कथन करूं.





# भाग ११ वा.

———०:०———

॥ उशना वेद यच्छास्त्रं यच्चवेद बृहस्पतिः ।
स्वभावादेव तच्छास्त्रं स्त्रीबुद्धौ सुप्रतिष्ठितं ॥

प्रल्हादपंतांनीं सुचविलेली मसलत सिद्धीस नेणें, हें काम सोपें नव्हतें. औरंगजेब बादशहासारख्याच्या मनावर आपला पगडा बसवून झुल्फिकारखानाविषयीं त्याचें अंतःकरण कलुषित करणें, ह्मणजे खरोखरी दुरापास्त गोष्ट. तथापि, कसलाही विषारी, फूत्कार करणारा तीव्र नाग असला, तरी तो जसा पुंगीच्या सुरानें मोहित होऊन गारुड्याच्या स्वाधीन होतो, तद्वत् कसलाही दुष्ट पुरुष असला, तरी तो स्त्रियांच्या कटाक्ष बाणानें विव्हल होऊन त्यांच्या कह्यांत वागूं लागतो. स्त्रियांच्या स्मितललित मुखेंदुदर्शनानें, त्यांच्या भुरळ पाडणाऱ्या वाक्जालानें व प्रेमपाशानें बद्ध न होणारा पुरुष जगांत विरळा. पुरुषांना वेसण घालून त्यांस पाहिजे तसें वळविण्याचा मतलब स्त्रियांसारखा दुसऱ्या कोणासही साधावयाचा नाहीं. पुरुषांच्या हातून एखादी गोष्ट साधून घ्यावयाची असल्यास, त्याचा खरा मार्ग स्त्री होय. तेव्हां, त्याच मोहिनी मंत्राची साधणूक करून घेतली ह्मणजे आपल्यास खचीत यश येईल, असा पूर्णपणें विचार करून येसूबाई त्या उ-

पायास लागली. एके दिवशीं, नेहमीं प्रमाणें **रोषणार** आपल्या आईसहवर्तमान **येसूबाईस** भेटण्याकरितां तिच्या तंबूंत आली असतां, **येसूबाई** मुद्दाम खिन्न वदन करून सुस्कारा टाकीत एकीकडे बसली. ' **वेढीचें सोंग घेतलें, ह्मणजे पाटाव फाडावा लागतो** ' या ह्मणीप्रमाणें पुढें **येसूबाईनें** कसकशी बतावणी केली, ती पहा.

**रोषणारः**—येसूबाई, आज तुमारा चेहरा मुतफिकिर नजर आताहै, इसका क्या बाईसहै? तुमारे चेहरेपर ताजगी व तवानाई और रवनक बिलकूल उडगयी दिखतीहै. ऐसी फिकर और दिलगिरी आजूर्दगी दिलमे आजाना, क्या सबब? खवास या खिदमतगारोंसे अगर लवंडीयोंसे कोई एकसेरेमो आपनी परसतारोंसे रूगरदान हुवाहो, याइनकार लायाहो, बशरतेके मालूम होजाय, जबान उसकी गुद्दीसे निकाली जाईगी; और बरसरेदार खिचवानें निनहार पसोपेश नकिया जाएगा. गोया, तुमारी इज्जत ऐन रोषनकी इज्जतहै; **बादशहा जमजा सलामत किबलाकी** हमेश इस तऱ्हेकी ताकीद रहतीहै की, कोइ तऱ्हेका रंज और जिलावतनीके गमसे तुमारी तव्बीयत मुकद्दर हरगीज नहोने पावे. अगर, इस उदासीका मोजब मफूम होजाय, तो इसके दफे करनेके लिये रोषन मौजूदहै. बेफिकिर बिस्राम कियाकरें.

[ **येसूबाई**, आज आपली मुद्रा चिंताग्रस्त कां बरें दिसते? तुमच्या ठिकाणचा उत्साह, प्रफुल्लितपणा कि-

वा आनंद, आज तुमच्या चर्येवर मुळींच दिसत नाहीं. तेव्हां, असा उद्विग्नपणा किंवा खेद मनांत उत्पन्न होण्याला, कांहीं तरी खचीत कारण झालें असावें. पदरच्या दासींपैकीं किंवा नोकरांपैकीं कोणी तुमच्या हुकुमाचा अवमान केला असला, अथवा कोणाच्या तोंडून दुरुत्तर निघालें असलें, तर कळलें मात्र पाहिजे; ह्मणजे, त्याची जिव्हा छाटून टाकण्यास देखील, ही रोषणार मागें पुढें पहाणार नाहीं. तुमचा जो अपमान, तोच ह्या रोषणारेचा अपमान; व तुह्मां उभयतां मायलेकरांचें जें सौख्य, तेंच माझें सौख्य, असें मी समजतें. जेणेंकरून तुह्मां उभयतांस सुख होऊन तुमचा काल आनंदानें जाईल, ते उपाय योजण्याविषयीं व तुमच्या प्रकृतीस जपून तुह्मांस आपण परक्या ठिकाणीं येऊन पडलों आहों, असें वाटूं न देण्याविषयीं बादशहाचें मला नेहमीं सांगणें आहे. तेव्हां, ह्या औदासीन्याचें कारण समजलें असतां, ही रोषणार तुमची काळजी दूर करण्यास सिद्ध आहे.

**बेगमः**—येसूबाई, तुम किसी तऱ्हेकी फिकर दिलमे हरगिज न करो. जैसी आपनी रोषन है, वैसीही तुम मानीजातीहो. जबके, तुम यहां सरकारे आलीमें रहतीहो, और तुमे कोई तऱ्हेकीभी हो तसदी व तकलीफ रवारखें, तो गोया यह बादशाही रुतबेको एकतऱ्हेका निहायत ऐब है. शिवाजी ये फरजंद तुमारा अभी तो खुर्दसाला है, क्या जानेके इसके पेश किस तऱ्हेका वाकेआ गुजरेगा, ऐसा समजके फिकरमंद

रहतीहो, एवी न चाहीयें. क्योंके, **रोषनने शिवाजी** को आपना मुजराई जान्नेसे **बादशाहा** सलामत हुजूरे आलीस मुदाम यीं खिताब होताहै के, जिसवख्त **शिवाजी** आकिल बालिग हो जायेगा, तो आपने जेरेहुकूमत किसीएक परगनेपर सरदारीसे मनसब मुकरर करदिया जायेगा. फिर, तुम अंदेशेमे रहेना, बिलकुल बेहासिल बातहै. इस कहेपर, खातिरजमे रहाकरो.

[ **येसूबाई**, तुह्मी कोणतीही फिकीर मनांत आणूं नका. जशी ही **रोषणार**, तशाच तुह्मी, असें मी समजतें. तुह्मी आमच्या येथें असून तह्मांस जर दुःख झालें, किवा तुमची काळजी आमच्यानें निवारण झाली नाहीं, तर आमचें हें एवढें वैभव, हें एवढें राज्य व आजवर मिळविलेली कीर्ति. हीं व्यर्थ होतील. **शिवाजी**विषयीं कदाचित् काळजी उत्पन्न होऊन मनाला त्रास झाला असल; पण त्याविषयीं सुद्धां तुह्मी मुळींच कष्टी होऊं नये. कारण, **रोषणारेनें** आपला ह्मटलेला जो छोटा **शिवाजी** तो किंचित् मोठा झाला, ह्मणजे त्याला जहागिरी देऊन आपल्या पदरचा सरदार करून ठेवावयाचें, असें वरचेवर मजजवळ बोलणें होतें. मग, तुह्मी उगीच कष्टी कां होता? ]

**येसूबाईः—मासाहेब,** मी **शिवाजी**ची जन्मदाती आई मात्र; तो आतां माझा, असें मी मुळींच समजत नाहीं. सर्वतोपरि त्याचें पालनपोषण करून कल्याण करणें, हा अधिकार त्यांच्यामागें ईश्वरानें आपल्याकडे दिला आहे, हें पाहून त्या खुदाचे मी सदोदित

आभार मानीत असतें. आपले उभयतांचे आह्मां अनाथ मायलेंकरांवर जे उपकार आहेत, ते जन्मजन्मांतरींही फिटावयाचे नाहींत. ही उपकारबुद्धि, शरण आलेल्यांचें पोटच्या पोराप्रमाणें कल्याण करण्याची इच्छा, व हा सदयपणा पाहूनच ईश्वरानें या ठिकाणीं **सार्वभौम पदाची** योजना केली आहे. नाहींपेक्षां, पृथ्वीच्या पाठीवर थोडे का राजे आहेत! पण उपयोग काय? **बादशहा सलामत** यांच्या मनाचा हा मोठेपणा ऐकूनच, मी आपल्या ह्या **पोटच्या गोळ्यास रायगडाहून** आणून सरकारच्या पायांवर घातलें. आणि, तेव्हां पासून सर्व परकीपणा टाकून मी आपल्यास मायबहिणी मानिल्या आहेत. मग, आतां मला काळजी ती कसची!

**रोषणारा**:—कुचही कहो, मगर, तुमारी पेशानीपर नशानी परेशानीकी रहती है; और चेहरेपे कुच तजल्ला बाकी नरहा. इसका क्या सबब है, हमसे साफ साफ कहियो तो, उसका माकुल इलाज किया जायेगा. अगर, तुम इस अमरसे इनकारभी करती हो, तबभी अलामत आजुर्दगीकी खुदबखुद पजमुरदा आपही नजर आती है.

[ कांहीं ह्मटलें तरी, तुमचें चित्त रोजच्या सारखें स्वस्थ नाहीं, हें खचीत. त्याचें कारण समजल्यावांचून मला कांहीं चैन पडणार नाहीं. तुह्मी तोंडानें जरी कांहींनाहीं ह्मटलें, तरी तुमची निस्तेज चर्याच आपोआप सांगते आहे.

**येसूबाई**:—बेगमसाहेब, माझा कोणीही अपमान केला नाहीं, किंवा कोणत्याही गोष्टीची मला उणीव

नाहीं. ईश्वरकृपेनं व सरकारच्या आशीर्वादानं मी आज मोठ्या सौख्यांत आहे. पण, धनाजी व संताजी ह्या चोरट्यांनीं कर्नाटकांतून परत महाराष्ट्रीं येऊन बंडाळी मांडल्याचं वर्तमान आपणच परवां मला सांगितल्यापासून मला कांहीं सुचेनासं झालं आहे. कारण, तो महाकपटी व मसलती प्रल्हादपंत जिंजीतून कशीं कशीं सुत्रं हालवील व काय काय कवटाळं रचील, याचा नेम नाहीं. कदाचित् ते दुष्ट पुनः बळावले, तर आह्मां मायलेकराचं पुनः दुर्दैवच ओढवलं ह्मणावयाचं. त्यांस आह्मी सुखांत आहों असं समजलं, कीं ते आह्मांवर केव्हां आग पाखडतील, याचा नेम नाहीं; ह्मणून मनाला हुरहुर वाटते. दुसरं काय?

**रोषणार**—हां! अगर प्रल्हादपंत गाहे या राजाराम मऱ्हाठी मुलुखमे सायर वो दायर हुवा, शायदके तुह्मारा बुराही होता है! भला, आपने लोगोंकी ख्वारी ओ खराबी कोई बशर सफहे दुनियापे चहाताहो, ऐसा कभी न होगा. अगरचे प्रल्हादपंत और राजाराम हरदोनफर मऱ्हेठे मुलखोंमे आमिल हुवे, तबतो यहांसे सदहाहिस्से शिवाजीपर शफक्त करेंगे. फिरतो कहां रोषन, कहां बादशहा, और किसका कोन?

[ वाः! प्रल्हादपंताची सरशी झाली, किंवा राजाराम पुनः महाराष्ट्रांत प्रबल होऊन त्याचें दैव उदयास आलें, तर तुमचें वाईटच होईल केवळ! आपल्या माणसांचें अकल्याण व्हावें, असें कोणाला तरी वाटेल का? प्रल्हादपंत व राजाराम यांनीं स्वराज्य

काबीज केलें, तर माझ्या **लाडक्याचें** ( **शिवाजीचें** ) ते आह्मांपेक्षां जास्त कौतुक करतील. मग कुठली ही **रोषणार**, कुठला **बादशाहा**, आणि कुठलें काय ? ]

**येसूबाई**—( सुस्कारा टाकून ) ह्या पोळलेल्या अंतःकरणावर दुःखाचे डाग देणं आपल्याला बरं वाटत असलं, तर मग काय करणार ? आपला काळच फिरला आहे, तिथं दुसऱ्याला बोल लावून काय उपयोग? कर्म केलं आहे, त्याप्रमाणें भोगलं पाहिजे. त्या दुष्टांच्या नांवांचा कोणी उच्चार केलेला ऐकिला, कीं तळव्याची आग मस्तकास पोंचते. त्यांचं मुखावलोकन देखील मला नको. आपलं आपल्याला लाभलं नाहीं, तिथं कोणाचे दीर आणि कोणाचे चुलते ! ह्मणतातना, **जाळावांचून कड नाहीं आणि मायेवांचून रड नाहीं.** आह्मांविषयीं त्यांचं काळीज जर चरचरलं असतं, तर ते कसाब आह्मां दीन मायलेंकरास टाकून कां बरे जाते ? किती झाला तरी सापत्न भावचना ? जळो त्यांचं तें राज्य व आग लागो त्या कौतुकाला ! परकी आमच्या जितके उपयोगी पडतील, तितके स्वकीय किंवा आप्तइष्ट आमच्या कधींही उपयोगी पडावयाचे नाहींत, हें मी पक्कं समजून चुकलें आहें. तो **मल्हादपंत** ह्मणजे आपमतलबी व स्वार्थसाधु पुरुष. **राजाराम** तर, तिकडं जिवंत असायचं तेंव्हांपासूनच दांतओंठ, चावीत, आमचा कधीं एकदांचा कुलक्षय होईल, याची वाट पहातच बसला होता. पण, **ज्याचं कोडं त्याच्या पुढं.** आई जगदंबेनं त्याचीच वाट लाविली,

ह्मणून बरं झालं. नाहींपेक्षां, पूर्वीचा आपला आपल्या आईसंबंधीं द्वेष धरून तो आमची काय दुर्दशा करून टाकिता, कोण जाणे. ईश्वरानंच डोळे उघडले; ह्मणून त्या प्रल्हादपंतास आह्मां मायलेंकरांस रायगडीं टाकून जाण्याची वांच्छा झाली व आह्मीं हे सुखाचे दिवस पाहिले. तेव्हां, आतां देवापाशीं इतकंच मागणं आहे कीं, बादशहास सदैव सुखी राख आणि त्याच्या राज्याचा सदोदित बोलबाला ठेव. ह्मणजे, आह्मांस कोणतीही काळजी नाहीं.

बेगमः—येसूबाई, ये तुमारा कहेना सुनकर और मोंगल बादशाहीकी सलामती चहानी देखकरके, बहुती मिजाज खुष होती है. देखो येसूबाई, अगर कभी ओ जिश्त मऱ्हेठा कमीरोज सर उचा कर नही सकेगा. मुवां, झुलफिकारखां प्रल्हादपंतको और राजारामको गोषमाली देके मुकैय्यद करलावेगा. उनको नेस्त करनेके लिये, अमीरदबीर झुलफिकारखानकेसे जवामर्दको एक लमहाभी न लगेगा.

[ येसूबाई, हें तुमचें भाषण ऐकून व तुमच्या मनांतील मोंगल राज्याविषयींची कळकळ पाहून संतोष होतो. येसूबाई, ते दुष्ट व कपटी मराठे आतां पुनः डोकें वर करतील, ही भीति मनांत बाळगूं नका. उद्यां, त्यांची खोड मोडून झुलफिकारखान राजराम व प्रल्हादपंत यांस बांधून आणील. त्यांचा नाश करावयास झुलफिकारखानासारख्या सरदाराला क्षणाचाही अवकाश लागणार नाहीं. ]

**येसूबाई**:—**बेगमसाहेब**, आपण आतां जें ह्मटलं, त्याचीच मला मोठी भीति वाटते. **झुलफिकारखान** ह्मणजे साधारण योद्धा नव्हे. त्याच्या मनांत आलं, तर तो **मराठ्यांस** हांहां ह्मणतां आपल्या बोटाखालीं चिरडून नाहींसे करून टाकील, एवढा तो पराक्रमी आहे यांत संशय नाहीं. पण 'तर' एक आहेना? आमचंच दुर्दैव ओढवलं असल्यास दुसऱ्याला बोल लावून उपयोग काय? आज एक वर्ष **झुलफिकारखान कर्नाटकीं** तळ देऊन बसला असतां ते दुष्ट हातीं लागत नाहींत ह्मणजे आश्चर्यच! पण, बाई बोलावं कोणी? **फट ह्मणतां ब्रह्महत्येचं पातक.** एक करतां एक झालं, ह्मणजे **भीक नको पण कुत्रा आवर** असं होईल.

**रोषणार**:—**येसूबाई**, तुह्मारी ऐसी शुभेकी बोलनेका हमे कुचही माना मालुम नहीं होता. **झुल्फिकारखां** जो **कर्नाटकपे** गालिब नहीं आता, इस बातमे कोई मुआम्मा तुह्मे मालुम है तो, खुल्लमखुल्ला बयानै करो. क्यौंके, ये मऱ्हेठोंकी शरारत एकदफे टूट जावे तो, **बादशहा देहलीकेतरफ** राही होजाएगें. जब वहां जाएंगे तो, **देहिली** शहरकी शानोशौकत, ऐशोअसरत पानेसे, और वहांकी बेहतरियां बखूबी तुह्मारी नजरमे आवेंगी. फिरतो, मै आपने **प्यारेको हिंदुस्थानमे** कोई जागीर **बादशाहाहीसे** इनायत करवाऊंगी.

[ **येसूबाई**, तुमच्या ह्या संदिग्ध बोलण्याचा मला कांहींच अर्थ समजत नाहीं. **झुलफिकारखानास** क-

**नाटकीं** यश न येण्याचें कांहीं कारण तुह्मांस माहित असल्यास, तें उघड करून सांगा. कारण, एकदां हें **दक्षिणें**तील **मराठ्यां**चें बंड पूर्णपणें मोडलें, ह्मणजे **बादशहा**ची स्वारी **दिल्ली**स परत जाईल. तेथें गेलों ह्मणजे त्या **राजधानी**ची शोभा व तेथील ऐश्वर्य तुमच्या दृष्टीस पडेल; आणि आपण सर्व आनंदोत्सवानें सौख्यांत दिवस घालवूं. मग, माझ्या **लाडक्यास** मी **बादशहा**कडून **उत्तरें**तच एखादी जहागिरी देववीन. ]

**येमूबाई**:—इतकं माझं भाग्य आहे कुठं? या दैवीं आणखी काय काय सोहाळे पहावयाचे आहेत, कोण जाणे? **जिंजी** अद्याप सर न होण्याचं कारण मी जें ऐकलं आहे, तें सांगिनलं असतं; पण बाई, एक करितां भलतंच झालं ह्मणजे मग निभावणार कोण? आज **झुलपिकारखान** ह्मणजे आपल्या कर्तबगारीनें **बादशहा**च्या पूर्ण मर्जीस उतरलेला. त्याच्यावर **सरकार**चं खरं प्रेम. आणि त्याजविषयींच जर कोणाच्या मनांत शंका आली व ती शंका खुद्द **बादशहा**च्या कानावर गेली, तर शंका घेणाराचं आणि ती सरकारच्या कानावर घालणाराचें काय होईल बरें? तेव्हां, **हात दाखवून अवलक्षण** म्हणून घेण्यापेक्षां, चाललं आहे तें ठीक आहे. आह्मी मायलेंकरें आज **सार्वभौम**पदाच्या आश्रयानें सुखांत दिवस काढीत आहों; तर, **बादशहा**ची मर्जी जेणेंकरून खप्पा होण्याची भीति, तें बोलून आपल्या पायावर आपण होऊन धोंडा पाडून घेण्यापेक्षां, ईश्वरावर भार टाकून जें जें होईल तें तें

पहात बसावं, हें बरं. कारण नसतां, **लहान तोंडीं मोठा घांस** कोणीही घेऊं नये.

**बेगम**—येसूबाई, इस गुफ्तगोमे तो छोटा मू बडी बात क्यैंकर साबीत होगी ? ये तो जायसर बात है. जो हक है, उसके कहेनेमे कीसी तऱ्हेका खौफ कुच जरूर नहीं. जबतकके हम है, तबतक तुमे किस बातका डर है? **झुल्फिकारखां**पर अगरचे **बादशहा** सलामतकी मर्जी खुष है, तो ताईके हसबे ख्वाहिश कामरानीये सुलतानीपरही होंगी; वरना बरखिलाफीपे उसके एतात्र होना सहेल है. **खुदावंत**की तबीयत तो अजीब है, हकिकत ऐसाही है तो **झुलफिकारखां** तो क्या, कोई **बडा मदानखां** होतभ्भी, कामरानीसे माजूल होजानी एक लहजावी न लगेगा. अलावे, जिसके हातों हिफाजते तख्तशाही न होतो, तमाह्मी कलमरोमें ताहलुका पड जानेका शुचा होता है. तुम अगर शबोरोज **बादशाही**के भलाई चहाती होतो, अगर कोई फितना मालुम हुवा हो तो, उसकु सरकारेआलीम साफ आगाही दिया चाहिये. कैबातें ऐसी हैं के, मर्दानेपे जिकर उसका बिलकुल नहीं आता है, वैसी बातें अचानक जनानीमे पोहोंच जाती हैं फिरतो, मर्दूये गोषगुजारी कराके, उसका मुआलेजा कराना लाजीम है. नहीं तो, कय तखलीफात दिखाई देते है. फिरतो, जो कुच तुम हमसे बयान करोगी, तब उसकी तसहील किया जाएगी. तुम मत डरो. तुमारेतक कोई बान आने न पावेगी.

[ **येसूबाई, यांत लहान तोंडीं मोठा घांस तो**

कमचा? खरें कारण असेल, तें सांगावयास भिण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. मी आहे ना, मग तुह्माला भीति ती कसली? झुलफिकारखानावर मर्जी असली, तरी ती, तो इमानेंइतबारें काम करीत आहे तोंपर्यंत. पण, त्याच्या हातून जर कां आपल्या कामांत जाणून बुजून कमूरी होत असली, किंवा त्याच्या मनांत कांहीं-कपटभाव उत्पन्न झाला असला, तर मग नाहीं हो तेथें कांहीं भीडमुरवत चालावयाची? तिकडची प्रकृति कांहीं विलक्षण आहे. तसें जर कांहीं असेल, तर झुलफिकारखान असो किंवा कोणीही असो. त्याच्या हातून योग्य कामगिरी बजाविली गेली नाहीं, तर तो मर्जीतून उतरावयास क्षणाचाही अवकाश लागत नाहीं. शिवाय ज्याच्या हातून गादीची सेवा विश्वासानें होईनाशी झाली, त्या मनुष्यावर प्रेम असल्यानें, एखादे वेळीं त्याच्या हातून राज्याला अपाय होण्याची सुद्धां भीति असते. तेव्हां, तुह्मी जर मोंगलराज्याचें रात्रंदिवस हित चिंतीत आहां, तर तुह्मांला अपायकारक एखादी गोष्ट समजली असल्यास ती तुह्मी कळविली पाहिजे. पुरुषांना न समजणाऱ्या गोष्टी सुद्धां केव्हां केव्हां बायकांना समजतात. त्या त्यांनीं पुरुषांच्या कानावर घालून त्यांच्या मनाचा भ्रम दूर केला नाहीं, तर मोठाले अनर्थ घडून येण्याचा संभव असतो. तेव्हां, मजपाशीं काय असेल तें सांगितलेंत ह्मणजे, पुढील तजवीज मी करीन. तुह्मी भिऊं नका. मी तुमच्यापर्यंत कांहीं येऊं देणार नाहीं.

**येसूबाई**:-इतकं अश्वासन असलं, तर सांगतें. **मासाहेब**, मी असं ऐकतें कीं, **राजाराम** व **प्रल्हादपंत** यांजकडून त्या **सरदारास** आंतून मधाचं बोट लागलं असल्यामुळें. तो त्यांना वश झाला आहे. नाहीं तर, आजवर **जिंजी**चा किल्ला सर झाल्यावांचून खचीत रहातांना. **झुलफिकारखाना**चा एवढा दरारा व इतका अम्मल असतां, **धनाजी** व **संताजी** ह्यांणीं **महाराष्ट्री** सैन्य घेऊन निर्वेधपणें परत यावं आणि दंगा मांडावा, हें त्यांत कांहीं गूढ आसल्यावांचून मुळींच संभवत नाहीं. शिवाय, **झुलफिकारखानानं रायगड** सर केला ते वेळीं सुद्धां, मला त्या सरदाराचा कांहीं वहीम आला होता. पण, मी होऊनच ह्या **सार्वभौमपदा**चा आश्रय करण्यास सिद्ध झालें. तेव्हां तो पुढं कांहीं बोलला नाहीं. त्यावरून मला तर खचीत वाटतं कीं, त्याचं व **प्रल्हादपंता**चं आंतून संगनमत खचीत आहे. तेव्हां, **झुलफिकारखानास** कांहीं निमित्तानें **कर्नाटकां**तून माघारा बोलावण्याविषयीं बादशहाचं मन वळलं व दुसऱ्या सरदाराची त्या कामा योजना झाली, तरच ते दुष्ट सरकारच्या हातीं लागतील. नाहींपक्षां, काय होईल तें कांहीं माझ्यानं सांगवत नाहीं. पण बाई, ह्या सगळ्या गोष्टी नाजूक. त्या बायकांच्या हातून निभावणाऱ्या नव्हेत. ह्मणून, आजवर मी बोललें नाहीं.

**रोषणार**:-**येसूबाई**, फलानी बात ऐसी है करके मालुम होवे, तो हरकोई इलाज कर सकताहै. जब न समजे, तो किसतऱ्हे दुरुस्त होगा? मासिवा, इसके अ-

गर ये मोहिम समजसे मौकूफ रहे जायेगा, तो तुह्मारीपे रंज लावेगा इतनाही नही, बल्के तमामी बादशाहीपर यूरिश हेनेका मनसुबा नहो. हुकूमत जो चलती है, तमामी एतेमादपर चलती है; जब हुकूमतके एतेमादे कुछीको बातिलसे घुन खाजाय, तो अरकाने सलतनको किसतऱ्हे कियाम रहेगा? तो, फिलफौर इस अमरको तजस्सुस हुवा चाहीये. ए तुमारे एत्तेलाअके मौजब जिमतऱ्हे जो बनसके, मुआलिजा करनेके लिये अम्माजान हाजिर हैं. तुम कुच फिकर नही करना.

[ येसूबाई, अमूक एक गोष्ट अशी आहे असें समजलं, ह्मणजे त्याचा कोणी तरी उपाय करितें; पण समजलेंच नाहीं, तर उपाय व्हावा कसा? त्यांतून, असली महत्वाची गोष्ट जर गुप्त राखिली, तर तुह्मांवर संकट येईल इतकेंच नाहीं, पण न जाणो बादशाही राज्यावर देखील एखादा प्रसंग गुदरावयाचा. राज्यें चालतात, तीं विश्वासावर; आणि त्याच विश्वामाला जर आंतून वाळवी लागली, तर राज्यरूपी इमारत केव्हां ढांसळून पडेल याचा नेम नाहीं. तेव्हां त्याचा वेळींच विचार झाला पाहिजे. ह्या तुमच्या सूचनेप्रमाणें योग्य तजवीज होण्याविषयीं आतां आई हवी ती खटपट करील. तुह्मीं कांहीं काळजी करूं नये.

ही हकीकत ऐकून बेगमेस अतिशय आनंद झाला. कारण झुलफिकारखानानें मागें एकवार कामबक्षाचा अपमान केला असल्यामुळें, त्याचें एकना एक दिवस तरी उटें काढावें, व आपणच कायतो शूर, प-

राक्रमी, शहाणा, अशी जी त्याच्या मनांत घमेंड उत्पन्न झाली होती, ती नाहींशी करावी, असें तिच्या मनांत फार दिवसांपासून वागत होतें. त्याला ही संधी आयतीच चालून आल्यामुळें तिनें मोठ्या सावधगिरीनें आपला कार्यभाग साधून घेण्याचा निश्चय केला, व ती त्या उद्योगास लागली.

---

## भाग १२ वा.

———०:०———

तावत्स्यात्सुप्रसन्नास्य स्तावद्गुरुजने रतः ।
पुरुषो योषितांयावन्न श्रृणोति वचो रहः ॥

उत्तरेकडे गेलेल्या मराठे सरदारांनीं गोंडवण, चांदा, वऱ्हाड, गोदातीर व गुजराथ इत्यादि प्रदेशांत बरीच धांदल उडवून कित्येक मोंगलांचीं ठाणीं काबीज केलीं. चौथाई व सरदेशमुखी हे हक्क जुलमानें वसूल करावे, दिल्लीहून औरंगजेबाच्या पलटणींत भरतीचे लोक किंवा खजिना येऊं लागला ह्मणजे त्यांजवर एकदम तुटून पडावें, लुटावें व त्यांची दुर्दशा उडवावी, असा त्यांनीं एकच कहर उसळून दिला होता. सोलापूर, गोंवळकोंडें, हैद्राबाद वगैरे प्रांतांत तर संताजी व धनाजी हे बाव, आज वस्ति कृष्णातीर तर उद्यां प्यावें तुंगानीर, अशा लांब लांब उड्या टाकीत, इकडून तिकडे व तिकडून इकडे धुमाकूळ घालीत होते. परशुराम त्रिंबक व संक्राजी ना-

**रायण** यांणीं **पुणें** प्रांत, **कोंकणपट्टी**, **सातारा** वगैरे प्रदेश रोंखून बरीच धामधूम मांडिली होती. चोहोंकडे अशा रीतीची एकच गडबड उडून राहिली असतां, **झुलफिकारखान** वेढ्याचें काम टाकून **त्रिचनापल्ली**कडे निघून गेला, हें वर्तमान **बादशहाच्या** कानीं पडलें. तेव्हां, तो अगदीं संतापून जाऊन मोठ्या विवंचनेंत पडला. **झुलफिकारखानास** आपण **जिंजी** सर करण्याकरितां पाठविलें असतां तो **दक्षिणे**कडे चालता झालयामुळें, **बादशहाचें** मन फारच विरस झालें. अशा वेळीं, त्या धूर्त, समयसूचक व मतलबी **बेगमेनें** एके दिवशीं संधि साधून एकांतांत मोठ्या युक्तीनें **बादशहा**पाशीं गोष्ट काढिली.

**बेगम**—( औरंगजेबको हैरतमे बिसतरे राहतपे लेटहुवे देखकर ) इनसान अस्मुबहताशाम कहांतक तुमार करे? परवर्दिगारने आज कोइबात अडी नही रखी है. हुकूमतमेतो के मोहिम्मातपे नजर गुजरानके ख़ुतको तखलापमे डालनेबगर कुछ हाशिल नजर नही आता. जेरेखिदमत हजारों मुताअल्लिकां तो रहेतेही हैं. उन्हीके ताहवील करनी बहुतही उमदा व आसानी है. अलावे इसके **कामबक्ष** जो नूरऐन हैं, इन्हीके सेपरूरुद करें तबभी बखूबी अनजाम होता है. तमामी उमरभर ऐसीही तशबीशोंमे गुजरे, तो तब इनतिजामे हुकूमत व राहतेनफस कबहो? जब हरगाके इतनी वसाहत राहत अपने कलमरोंमे रहते हुवे, फिर इनसानखुद हैरान रहे जाना बेमाना बात है. जब देखें तब मुतफिकिर.

[ ( **औरंगजेब** चिंतातुर होत्साता पलंगावर पडलेला पाहून ) मनुष्यानें उजाडल्यापासून मावळेपर्यंत किती तरी मेला उपद्व्याप करावा? ईश्वरानें आज कांहीं कमी का केलें आहे? राज्यकारभाराचीं यत्किश्चित् कामें देखील स्वतः पाहून उगीच जिवाला त्रास मात्र करून घ्यावयचा. पदरीं शेंकडों कामगार आहेत; त्यांजकडे निरनिराळीं कामें संपवून देऊन आपण त्यांच्यावर देखरेख ठेविली, म्हणजे झालें. शिवाय, आतां **कामबक्ष**ही प्रबुद्ध झाला आहे; त्याच्या गळ्यांत राज्यकारभार अडकवून त्याच्या हातून हरएक गोष्ट करविली, म्हणजे इतकी दगदग होणार नाहीं; व त्यालाही राज्यकारभाराचें शिक्षण मिळालेंसें होईल. सारें आयुष्य अशा दगदगींतच गेलें, तर राज्यसुख तें अनुभवावयाचें कधीं? एवढें अफाट राज्य आणि इतकें वैभव असतां, त्यापासून जिवाला जर एक दिवसही सौख्य झालें नाहीं, तर त्याचा काय उपयोग? सदानकदां पाहवें तेव्हां काळजींत.

**बादशहा**—( ठुड्डीपे हात धरके ) **जानियेके**, इतनी बडी हुकूमत जिसके जेरदस्त रहे, उसकु क्योंकर पेशअंदेशा व तफक्कुर न रहेगी? बादशाहोंके दामनगीर अठारे काररवायां रहते हुवे के इलाकोंके अमीर व दबीरपर दहशत नजर न रहे, तो सारी सलतनतमें तराईर आजावेगा. बादशाहोंको आपने नफ्सकी ख्वाहिशोंसे टल जाके रेआयाकी परवरिश रखनी खुदावंतकी ऐन इबादत है; वरना खुदावंदकेपास **बादशाहों**की बडी पूछ होंगी. इस मुलकरानिमें जितनाके हांसके

रातदिन तादमे हयात इसीकी इनतिजाममे गुजारें ला-
बख है.

[ ( हनुवटी धरून ) प्रिये, एवढें अवाढव्य राज्य ज्याच्या पदरीं आहे, त्याच्या मागें त्रास हा असाव-याचाच. पदरच्या अठराही कारखान्यांचीं कामें योग्य रीतीनें चाललीं आहेत किंवा नाहींत, व नोकर लोक आणि अनेक ठिकाणीं असलेले सरदार राज्याच्या अभिवृद्धीसाठीं आपल्या कर्तव्यांत दक्ष राहून, त्यांच्या-वर संपविलेलीं कामें उत्तम प्रकारें बजाविलीं जात आहेत किंवा नाहींत, ह्या गोष्टींचा विचार रोजच्यारोज करीत गेलें पाहिजे. नाहींतर, राज्यकारभार कधींही सुयंत्र चालणार नाहीं. तेव्हां, स्वतांच्या सौख्याकडे दृष्टि न देतां खुदाच्या कृपेनें ज्यांचीं सुखदुःखें आप-ल्या हातीं आलीं आहेत, त्यांच्या कल्याणाकडे विशेष लक्ष्य पोंचविणें, हेंच आह्मांसारख्यांचें कर्तव्य; आणि तें उत्तम रीतीनें बजाविलें जाणें, हेंच आमचें राज्यसौख्य. त्यासाठीं कितीही श्रम करावे लागले, तरी ह्या जिवाला त्रास किंवा कंटाळा यावयाचा नाहीं. ]

**बेगमः**—हां, बादशहासलामतको मुलुखगिरी और कामरानीपर किसकी मनाही है? मगर, हाशानशीनानेशा-ही आपनें मुऐय्यनातपर बजा रहते है या नहीं, ऐसा दरया-फ्त करना खुदावंतकी सजावर नहीं है. आज दोचा-ररोजसे मालुम होताहै के मिजाज मुबारिकमे मुखालेफत आई है. फिरतो, सिवा इसके कौनसा बार दिलपर गु-जरताहै क्या जाने! कै दिनो ये फिकर रहतीती के

गनीम दस्तअसीर कैसे हों, और उनपर फतह कब पावे. तो बफजलेखुदाएताला मन्हेटेजैसे सख्त गनीमको शिकस्त दे चुके और असीर करलिये. फिर दुबारा दिल फिकरमंद होनेका क्या मौजब है. मुलुखरानी व जहांबानीके कामोंमे मस्तूरातको बिलकुल दखल नही है. मगर, मुवाजीतो मयाकेमारे रह नहीं सकता है; इसलिये, ये मारुजापेश हुवा. क्योंके, ये कायदा कुल्लिया है के, मर्दां तो जनोंके हकमे गोया एक तऱ्हेकी सलामती ख्वाहांआ राहते जानुतन है; इत्तिफाकन, कभी मर्दोंके पैरमे ग्वार लगे, औरतोंकी जिगरमे पार होजाय. जबतो कुचकहेनेकी इजाजत मिले........

[ पण, मी राज्यकारभार पहावयाला कोणाला नको का ह्मणतें आहे? पदरचे लोक आपापलीं कामेंकाजें वेळच्यावेळीं बजावितात कीं नाहीं, हें पहाण्याला रात्रंदिवस अशी काळजी करावयास नको. आज दोन तीन दिवस झाले; पहातें, मन मुळींच थाऱ्यावर नाहीं. मग असली कोणती चिंता उत्पन्न झाली आहे, कोण जाणें! इतके दिवस, शत्रु कसे जिंकिले जातील, ही एक काळजी होती. पण, ईश्वराच्या कृपेनें तीही निवारण होऊन मराठ्यांसारखे त्रासदायक शत्रु धुळीस मिळाले. मग, आतां आणखी मन असें उदास होण्याचें कारण काय? राज्यकारभाराच्या कामीं बायकांनीं मन घालूं नये, हें खरें. पण जीव वेडा ह्मणून किंचित् वृत्ति खिन्न का दिसली, कीं त्याचें कारण विचारल्यावांचून राहवत नाहीं. बायकांच्या सुखदुःखा-

चीं सूत्रें पुरुषांच्या देहांत गुरफटलेलीं असल्यामुळें, पुरुषांच्या पायाला कांटा कां बोंचला, कीं बायकांचा जीव घाबरा होतो. तर विचारल्यासवरल्याचा राग....]

**औरंग०:**–**प्यारी**, जानियोंके इसमे क्या खपगी? जेंमे मर्दो औरतोंकी राहते जानुतन है, वैसीही मर्दोंकोभी कामकुशाई व राहतरसानी औरतोपरही मौकूफ है. जबतो, तुम औरतोंबगैर मर्दोंका राहतरसान कोइ नहीं होसकता. इसीबायस................

[ **लाडके**, यांत राग कसला? स्त्रियांचा आनंद किंवा सुख जसें पुरुषांवर अवलंबून, तशीं पुरुषांचीं सर्व दुःखें किंवा त्यांची मानसिक व्यथा उणावण्याचें खरें साधन काय त्या बायकाच. त्यांना तुह्मांवांचून विरामस्थान दुसरें कोणतेंच नाहीं. ह्मणूनच ना इतका–]

**बेगम:**–( थोडीसी घुस्से होके ) मुई मू देखी कहावत किफायत है. नौंके जबानका कहा, दांतोंपरही रहा. गोया य बातिनमे हज नहीं. सबब बोलनेका जब दिलमे नहीं, औरतोंमे कहेनी गैरे मुमकिन है, योंतो साफ मालुम होजाय तो नखूनखमा कोन करे? इनतिजामे मुलकी व मालीकी गुफतार व तक्रारसे किसीका कोई बेडा पार नहीं होता. आजसेतो तौबाकीके बारेसानी तादमे जिंदगानी ऐसा बरजबानी चूं व चरा कभी न निकालूं.

[ (किंचित् रागावून ) पुरे मेलें. नको तें तोंडापुरतें बोलणें मला ऐकायला. हे शब्द सगळे ओंठावरच्या ओंठावर; अंतःकरणांत त्याचा लेशही मिळावयाचा नाहीं. कारण सांगावयाचें मनांत नसलें, तर ' तें बा-

यकांना सांगण्यासारखें नाहीं ' असें एकदां स्पष्ट तोंडांतून निघालें, ह्मणजे कोण कशाला वरचेवर विचारतें! आह्मांला त्या राज्यकारभाराच्या गोष्टी आणि कारणें ऐकून मोक्षाला जायचें आहे थोडेंच. आजपासून कानाला खडा लावून घेतला; इतःपर ह्मणून अमूक एक गोष्ट कशी नि काय, असें ह्या तोंडांतून निघेल, तर शपथ. ]

**औरंगजेबः**—प्यारी, ऐसी तुम खशमनाक नहो. तुझे न समजांई ऐसी वो कौन पोशीदा बातहै. जो आदूके हमने नेस्त समजाथा वेही पोशीदे **कर्नाटक**मे जाके आपने अमीरोंके सुस्तकारीपर ताईद कररहे हैं. उधरतो दो तीन सालभर उनकी कोई कुच पूछपाछ न करनेसे तो उन्होंने लष्कर जमाके **कर्नाटक** और **महाराष्ट्र**मे पहिलेके जैसा शोर मचा रहे हैं. **कर्नाटक**मे उनके **जिंजी**किल्लेपर फतायाब होके और उनको असीर करनेकलिये **झुलफिकारखां** मये बीस हजार लष्करे जरारके साल शशमाहसे मुसलत हुवाहै. लायकिन तांई किल्ला दस्तयाब नही हुवा. करीबमे अखबार तो यौं आई है, मऱ्हेटोंके सरजोर होनेपे **झुल्फिकारखां** बिलकुल मायूस होके मुहासेरका मुकाबिला छोड करके **तंजावर**की जहत रूपोश होगयाहै. जबतो ऐसे अमीरके वजूदमे बेहिम्मती व खतरेआदू वारिद होना क्या सबब है, कुछ मालुम नही होता. अब क्या किया चाहिये इस तऱ्हेकी फिकर पैदा होनेसे, दिल आजुरदे रहताहै. और तो कुच नही.

[ प्रिये, अशी रागावूं नकोस. तुला न सांगण्यासारखें कारण तें कोणतें असणार? शत्रु नाहींतसे झाले असें आजवर आपण समजत होतों; परंतु, ते गुप्तपणें **कर्नाटकीं** जाऊन तेथें आपल्या सरदारांच्या दुर्लक्ष्यामुळें व हयगयीमुळें, पुनः बळावत चालले आहेत. तिकडे, दोन तीन वर्षें त्यांची कोणीच वासपूस न केल्यामुळें ते फौजबंद होऊन, **कर्नाटक** व **महाराष्ट्र** या ठिकाणीं त्यांनीं पूर्ववत् चोरटेपणा व बंडाळी मांडिली आहे. **कर्नाटकां**तील त्यांचा **जिंजी** किल्ला सर करून त्यांना कैद करून आणण्यासाठीं, **झुलफिकारखान** वीसहजार सैन्यानिशीं किल्ल्याम वेढा देऊन बसल्यास आज वर्ष सहा महिने होत आले; परंतु, अद्याप किल्ला हातीं येत नाहीं. परवां तर अशी बातमी आली आहे कीं, **मराठे** फार प्रबळ झाले असल्यामुळें, **झुलफिकारखान** निराश होऊन वेढ्याचें काम टाकून दक्षिणेकडे निघून गेला. तेव्हां, त्या **सरदारा**च्या आंगीं असा मलूलपणा येण्याचें किंवा शत्रूंविषयीं इतकी भीति उत्पन्न होण्याचें कारण काय, हें कांहींच समजत नाहीं. तर, आतां पुढें काय व्यवस्था करावी याविषयींची काळजी उत्पन्न झाल्यामुळें, मन किंचित् अस्वस्थ झालें आहे. दुसरें कांहीं नाहीं. ]

**बेगमः**–हैहै! ए कैसी लाफ जनी! शायदके कोई सचही समजे. औरतें अगरचे नादानहैं, तवभी नाकनिवाले नहीं लेजाते. सच न कहे जाते, मोफ्तमेही कोइ हजल उठाके बात बनानी दरुत बहिलानेको यहां

किसीकी कोइ तस्दी नहीहै. जिसके दामनमे आज ह-
जारों अमीरदबीर और फौजेकसीर जानफेशानीपे मौ-
जूद रहते हुवे, ऐसे **बादशहा**को एक अदनासे मऱ्हेटे
कमताखत नातवान आदूसे होजाय, ऐसातो कोइ बाव-
लाभी सच न जानेगा. फिर, औरत तो कुजा? अगर
किसी एकके भी हातसे न बनआये, दुसरे शेकडों मु-
हिय्याहैं. अब अगर कहिये तो, **झुलफिकारखां**भी
कोइ ऐसे नाजवामर्द नही. जिसने आपनी बलंदहिम्मती-
से तमामी मऱ्हेटोंके मुलुख बरबाद करदिया, ऐसेको
**जिंजी** किल्लेपर फतेपाना मुशकिल नजर आताहै, ए
बडी अजब बातहै. कोन जाने? '**मनीकाघर खा-
लीं**' कोनसेभी आदमीको हम आपना मोहितमिम
बनातेहैं तो वो आपनेको मुखतारेकुल जानके फर्मान
चलानेको मुखतारहूं समजकर, ओ कैसाही दानिशमंद
और आकिल व फाजिल रहेगा, तबभी उसकी तभी-
यत फोरन बदल जातीहै. इलाकेवालोंमेसे किसीने ज-
वामर्दी की, तो उसको शाबासी और ताहसीन किया
चाहीये. मगर, लियाकतसे अफजूद बढानाभी न चा-
हीये. आपने हातसे काहिली होनेसे मुखतारकी एता
बका दहशत उनके दिलमे रहाकरे. नही तो, वेही
नोकर बेकदर ठेर जातेहैं; और, कोइ मोहीम अमर
हलकरनेको जो तवानाई रहिती है, ओ मगरूरीके
बायस नेस्तनाबूद हो जाती है; जबतो इधरका हक्क
एतबार अगर जमानतेकुल अपनीही जातवे जानके,
और बडीबडी मोहिम अमर व मुशकिलहल आप-

नी बगैर हुकूमतेशाहिमे दुसरा कोइ बजाआवर न-हींहै, इसतऱ्हेका गरूर दिलमे ठराजाय, तो गनीम मगलुब क्यौं होगा? हां, फिर कहे कोन? **झुलफिकारखां** गोया गलेके हार!

[ अहाहा! किती योग्य तरी कारण पण! जणो, एखाद्याला खरेंच वाटायचें. बायका झाल्या, ह्मणून कांहीं कानाकडे घांस नेत नाहींत. खरें सांगावयाचें नसल्यास अशी कांहीं तरी लोणकढी झोकून वेळ मारून न्यायला कोणी जुलूम का केला आहे? ज्यांच्या पदरीं आज लाखों सेना आणि हजारों धुरंधर सरदार पाहिजे ती कामगिरी बजावण्यास सिद्ध आहेत, त्यांच्या मनांत **मराठ्यां**सारख्या दुर्बल शत्रुविषयीं काळजी, असें एखाद्या वेडसर मनुष्यानें ऐकिलें, तर त्याला देखील तें खरें वाटणार नाहीं; मग बाकीच्यांचें तर राहूंद्याच. एकाद्याच्या हातून तें काम न झालें, तर शेंकडों दुसरे सरदार आहेत. पण, **झुलफिकारखान** झाला तरी कांहीं सामान्य पराक्रमी सरदार नव्हे. ज्यानें आपल्या अपूर्व शौर्यानें संपूर्ण महाराष्ट्र दणाणून सोडिलें, त्याला **जिंजी** सर करणें कठीण वाटावें, ह्मणजे आश्चर्यच. पण बाई कोण जाणें? ह्मणतात ना, '**गर्वाचें घर खालीं**' कोणत्याही मनुष्याला, आपण करितों ती पूर्वदिशा, इतका आपला अधिकार चालूं लागला असें वाटलें, ह्मणजे तो कसाही शाहणा कितीही पराक्रमी व स्वामिकार्यदक्ष असला, तरी त्याची स्थिति तेंव्हांच बदलते, व त्याच्या ठिकाणचे बहुमोल गुण मातीं-

मोल होऊन जातात. पदरच्या माणसांनीं आपलीं कामें उत्तम रीतीनें बजाविलीं, तर त्यांच्या पाठी थोपटाव्या. परंतु, त्यांचे वाजवीपेक्षां फाजील देव्हारे कधींही माजवूं नये. आपल्या हातून एखाद्या कामांत कसूरी झाली असतां धन्याची इतराजी होईल, हा धाक सदोदित त्यांच्या मनांत वागत असला पाहिजे. नाहींपेक्षां, कोणतेंही एखादें महत्कार्य संपादण्याविषयींची त्यांच्या आंगची उमेद किंवा ईर्षा, अहंपणाच्या दर्पानें करपून जाऊन, ते कवडीच्या मोलाचे ठरतात. धन्याचा खरा विश्वास व सगळी भिस्त कायती आपल्यावर, कोणतीही जड जोखमीचीं किंवा महत्वाचीं कामें आपल्यावांचून दुसरा कोणीही करणार नाहीं, अशी पोकळ घमेंड एखाद्याच्या मनांत उत्पन्न झाली, ह्मणजे संपलेंच. मग, तो कितीही पराक्रमी असला, ह्मणून त्याच्या हातून काय होणार! पण बाई बोलाव कोणी? झुलफिकार ह्मणजे केवळ गळ्यांतील ताईत.

याप्रमाणें, त्या मानभावी स्त्रीनें आपल्या प्रेमळ वाक्जालानें औरंगजेबामागल्या विचारी, शहाण्या व कारस्थानी बादशहासही भुरळ पाडून झुलफिकारखानासंबंधानें त्याचें मन गढूळ करण्याविषयीं प्रयत्न केला; व त्यांत तिला यशही आलें. कारण, औरंगजेबास वाटलें कीं, बेगमेच्या ह्मणण्याप्रमाणें आपण झुलफिकारखानावर पूर्ण विश्वास टाकून त्याचा बंडजाव वाढविल्यामुळेंच कदाचित् तो आपला हुकूम नसतां, जिंजीच्या वेढ्याचें काम टाकून दक्षिणेकडे नि-

घून गेला असेल. तर, यावेळीं त्याला परत बोलावून त्याच्या हातून न झालेली कामगिरी दुसऱ्या एखाद्या सरदाराकडून करवावी; ह्मणजे, आपल्यापेक्षांही जास्त लायख व कर्तबगारी बजावणारीं माणसें बादशहाच्या पदरीं आहेत असें त्याला कळून येऊन, पुढें कोणत्याही कामीं त्याच्या हातून अशी हयगय किंवा अरेरावी होणार नाहीं. असा विचार करून, **औरंगजेब** त्या मानी सरदाराचा पाणउतारा करण्यास सिद्ध झाला. पण ' स्त्री बुद्धिः प्रलयावहा ' हें वृद्धवचन पुढें अक्षरशः खरें ठरलेंच. **बादशहाचा** हुकूम जातांच सर्व सैन्य व हाताखालचे सरदार **जिंजी** मुक्कामीं ठेवून **झुल्फिकारखान** तावडतोब हुजूर दाखल झाला. तो परत येतांच **औरंगजेबानें आसदखान** व **कामबक्ष** या उभयतांच्या हाताखालीं दहा हजार सैन्य देऊन, त्यांस **जिंजी**कडे पाठविलें.

भेटीअंतीं **झुल्फिकारखानानें** ताडिलें कीं, ज्या अर्थीं आपल्यास परत बोलावून **कामबक्ष** व **आसदखान** यांस **जिंजी** सर करण्याकरितां **बादशहानें कर्नाटकीं** पाठविलें, त्या अर्थीं आपल्याविषयीं **बादशहाच्या** मनांत कांहीं काळेंबेरं उत्पन्न झालें असावें. रात्रंदिवस त्याला त्या गोष्टीचा निजध्यास लागून राहिल्यामुळें, अनेक विचारतरंग त्याच्या मनांत घोळूं लागले. एके दिवशीं रात्रीचा खाना खाऊन तो आपल्या तंबूंत हुक्का पीत पडला असतां, त्याच्या उद्विग्न झालेल्या चित्तास कांहीं केल्या आराम वाटेना. **बाद-**

शहाच्या मनांत असें काळेंबेरें उत्पन्न करून आपला उपमर्द करविण्याचा घाट घालणारा कोण मायेचा पूत स्वकुलाचा नाश करून घेण्यास तयार झाला असेल, व ही बिघडलेली घडी पुनः नीट रीतीनें बसण्यास काय केलें पाहिजे, ह्याबद्दल आपल्या मनाशीं विचार करीत असतां त्याला वाटलें कीं, हें कृत्य साधारण मनुष्याच्या हातून तर खचीत झालेलें नाहीं. **बादशहाच्या** पदरचे **अमीरउमराव** किंवा **सरदार** ह्यांच्या हातून अशा अविचाराचें किंवा धाडसपणाचें काम होणें, हें तर असंभाव्य. शिवाय, आपणाविषयीं इतकी कुडीबुद्धि, इतका कृतघ्नपणा, इतका द्वेष व इतकी दुस्मानगिरी मनांत उत्पन्न होण्याजोगें आपल्या हातून कोणाचेंही अकल्याण, कोणाचाही मनोभंग अथवा कोणाचीही मानहानि झालेली नाहीं. तेव्हां, पुत्रवात्सल्य अनिवार भडकल्यामुळें, त्या कुटिल **बेगमनें** हें बंगाली गारुड पसरून **बादशहाचें** मन भारलें असावें, असें त्याचें मन त्याला वरचेवर सांगूं लागलें.

अंतःकरणांत उत्पन्न झालेल्या त्या हृद्रोगाच्या भावनेची चिकित्सा करितां करितां खूण पटून शेवटीं त्याच्या उपपत्तीचीं खरीं कारणें त्याला समजून आलीं. तेव्हां तो आपल्या मनाशीं ह्मणतो; "वाहवा! **मोंगल** राजसत्तेची अभिवृद्धि व्हावी, **बादशहाचा** विजयध्वज सर्व **हिंदुस्थानभर** चिरकाल फडकत रहावा, व त्याच्या प्रतापी नांवाचा आणि साम्राज्यपदाचा महिमा त्रैलोक्यांत गाजावा, यासाठीं आजपर्यंत हाडांचीं का-

डें करून स्वामिकार्यांत देह झिजविणाऱ्या **झुलफिकारखानास** त्याच्या एकनिष्ठपणाच्या विश्वासू नोकरीबद्दल अशा प्रकारचें बक्षीस मिळालें काय! असो. त्यांत **बादशहाची** चूक नाहीं. मनुष्य **स्त्रैण** झाला ह्मणजे, तो कितीही सावध असला, तरी त्याचें सर्व शहाणपण, त्याचा धूर्तपणा, त्याची अक्कल, त्याचें कर्तृत्व, त्याचा सुस्वभाव किंवा पदरच्या मंडळीची खरी पारख करण्याविषयींचें त्याच्या आंगचे गुण लोपून जाऊन बुद्धि विपर्यास पावते, असें ह्मणतात, तें कांहीं खोटें नाहीं. त्याचीं उदाहरणें व्यवहारांत नेहमीं आपल्या दृष्टीस पडतात. स्त्रीपाश खरोखर दुर्निवार; त्याच्या सत्तेपुढें महान् तेजस्वी, पराक्रमी किंवा भाग्यशाली पुरुषांच्या शहाणपणानें देखील हात टेंकिले आहेत. स्त्रीदृष्टीपुढें अमोलिक हिरा देखील कांचमणि ठरतो; मग, खरी शिपायगिरी दोपास पात्र झाली, किंवा बिनमोल सद्गुण दुर्गुणाच्या नांवानें विकूं लागले, तर त्यांत नवल तें कोणतें! **विजापूर** व **गोंवळकोंडें** या सारखीं बलाढ्य राज्यें पादाक्रांत झालीं, **मराठ्यांसारखे** त्रासदायक शत्रु देशोधडीस लागले, व **संभाजीचा** वध होऊन त्याची स्त्री व पुत्र हीं **बादशहाच्या** ताटाखालचीं मांजरें होऊन खेळूं लागलीं; तेव्हां, आतां हा **झुलफिकारखान** अविश्वासू, निरर्गल, कृतघ्न व निकामी कां नठरेल? '**गरज सरो वैद्य मरो,** अशी ह्मणच आहे. मदतीस सैन्य पाठवा असें घटकोघटकीं लिहीत गेलों असतांही त्याकडे **दुर्लक्ष करून,** उलट

जिंजी सर झाली नाहीं ह्मणून **सरकारची** या **सेव**-**कावर** इतराजी ! ठीक आहे; अद्याप शत्रु निर्मूल झाले नाहींत. कोणकोणते **सरदार** व ओंठ पिळला असतां दूध निघणारीं **कामबक्षासारखीं** अर्भकें, काय काय कर्तबगारी करितात किंवा तलवारबहादुरी गाजवितात, हें आपेआप **दृष्टीस** पडेल. उगीच निराश होऊन उतावीळपणा करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मुशींत पडल्यावर सोनें तें सोनें, आणि पितळ तीं पितळ ठरेलच. पण, आपला शूर पिता **आसदखान कामबक्षा**बरोबर गेला आहे, त्या अर्थीं त्याच्या पराक्रमानें किंवा शत्रु फार दिवस कोंडले गेले असल्यामुळें, कदाचित् किल्ला हातीं लागण्याचा संभव आहे. तर, त्याविषयीं मात्र कांहीं युक्ति लढवून बंदोबस्त केला पाहिजे; ह्मणजे मग **जिंजी** कशी सर होते, तें पाहूं. अशा विचारांत त्या सरदाराचें मन गढून गेलें असतां, एकाएकीं तंबूबाहेर कोणीएक **फकीर 'क्या न पावे जल सखे, क्या न सिंधु समाय॥ क्या न अबला कर सखे, क्याही जग-काल न खाय'** असा दोहरा ह्मणत व सवाल पुकारीत चालला होता, त्याकडे त्याचें लक्ष गेलें. आतां, हा फकीर कोण, व तो तेथें कशाकरितां प्राप्त झाला होता, हें जाणण्याकरितां वाचक उतावीळ झाले असतील; पण, हा भाग बराच लांबला असल्यामुळें, येथेंच किंचित् विश्रांति घेऊं.

---



# भाग १३ वा.

—o:o—

। अनुकूलः शुचिर्दक्षः प्रभोर्भृत्योहि दुर्लभः ।

मागें सांगितल्याप्रमाणें, झुलफिकारखानाच्या मनांत बेगमेविषयीं पक्का संशय येऊन चुकला. तेव्हां, तो त्या द्वादशस्थानीं आलेल्या पापग्रहाप्रीत्यर्थ कोणतें दान केल्यास आपल्याविषयीं बादशहाच्या मनांतील किंतु नाहींसा होईल व तो पूर्ववत् आपल्याशीं प्रेमभावानें वागूं लागेल, असा विचार करीत असतां, 'क्या न अबला कर सखे' हा फकीराचा सवाल अकस्मात् त्याच्या कानीं पडला. वाचक हो, बादशहानें झुलफिकारखानास महाराष्ट्रीं परत बोलावून त्याचा उपमर्द केला असें प्रल्हादपंतांस समजतांच, हा गृहकलह जास्त पेटविण्याचा यत्न केल्यास आपण रचलेला व्यूह खचीत फलद्रुप होईल असें प्रल्हादपंतांस वाटल्यामुळें, त्यांनीं उदाजी कदम यास फकीराचा वेश देऊन बादशहाच्या छावणींत पाठविलें होतें. हें आतां तुमच्या लक्षांत येऊन चुकलेंच असेल. फकीर ह्मणत चाललेला तो तुळशीदासाचा दोहरा, झुलफिकारखानाच्या मनांत घोळत असलेल्या विचारांस अगदीं अनुलक्षून असल्यामुळें, त्याचें लक्ष चटकन् त्याकडे गेलें; व त्याच्या अंतःकरणसमुद्रावर

नानाविध कल्पनातरंगाच्या लाटा उसळूं लागून स्त्रीचरित्र खरोखरच अगाध आहे, अशी त्याच्या मनाची खात्री झाली. तथापि, स्त्रीलंपट होऊन सुरतरसाच्या कैफांत आपल्या प्राणापेक्षांही स्वामिकार्यास जास्त जपणाऱ्या एकनिष्ट सेवकजनांचा अपमान करणाऱ्या **बादशहाला**, '**तोबातोबा**' ह्मणवायास लाविल्यावांचून रहावयाचें नाहीं, असा **झुलफिकारखानाच्या** मनाचा निश्चय ठरला.

**फकीर**—सिपायभाई, ये फकीर मुसाफिर बमक्का है. **बादशहा** सलामतकी सखावत व दयानत दीनदारी सुनकरके ये फकीर उनके खैरकी उमेदवारीसे इतनी मुसाफत तैकरके आपनेको इसदरे दौलत्तक आज पोंचाया जहे किसमत. हां, मगर दरबारबादशाहीमे मुझसे गदासाइलकी रसाई किसतऱ्हे होंगी ? ऐसी तशवीसमे किसीनें इस **फकीरसे** यौं कहा के आपके **अमीर बादशहासलामतके** मुसाहिब और मोतमिद हैं; इसवास्ते उनके इसतिमदाबसे कुच कहा जाय, मुरादमुज मुसाफिरकी निकल आयेगी. इसतऱ्हे ठराके उनकी मुलाकातका उमेदवार हों. आप अगर रहाम फरमाके जनाब खानसाहेबकी हुजुरमे मुज गरीबकी इतला करवाते हैं, तो ऐनएहसान और इनदल्ला अजरेअजीम है.

[ **शिपाईबुवा**, हा गरीब फकीर **मक्केचा** यात्रेकरू आहे. स्वधर्माच्याठायीं **बादशहाची** निष्टा व त्याच्या दातृत्वाविषयींची कीर्ति ऐकून, त्याजपाशीं कां-

हीं साहाय्य मागावें या हेतूनें, मी इतका दूर आल्यास आज बरेच दिवस झाले. पण, **बादशहापाशीं** ह्या गरीबाची दाद कशानें लागते? तेव्हां, आतां पुढें काय करावें ह्या विवंचनेंत असतां मला कोणी असें सांगितलें कीं, आपले **सरदार बादशहाच्या** पूर्ण कृपेंतले असल्यामुळें, त्यांच्या द्वारें कांहीं खटपट केल्यास, माझा कार्यभाग सहज होईल. ह्मणून, त्यांची भेट घ्यावी ह्या इच्छेनें मी येथवर आलों आहे. आपण कृपा करून **खानसाहेबापाशीं** माझी वर्दी पोंचवाल, तर गरीबाचें मोठें कार्य करून दिल्याचें श्रय तुह्मांस येईल व **महायात्रेचें** पुण्यही अंशतः तुमच्या पदरीं पडेल.

**पहारे०—फकीरसाहेब,** तुम जैसे अदमीको ओ कौन है के नेकीमे मदत न करेगा? हो, जिस् वखत आपनीसे न बनसके तो किसी देतेदाताका दार दिखाना, गोया आपही नेकी करनाहै. **जनावखानसाहेबके** रूबरू आपकू मै लेजानेसे एकीनही है के आपआपनी मुरादको पोहोंचतेही होतो, बहुत बेहेत्तर हैके मै जरूर मुलाकत करवाऊं. मेहेरबान **खानसाहेब** आपके जैसे गरीबगुरबांकी मदतगारीमे हमेश तलाशी रहतेहै, और **बादशाहोंकी** जनाबमे पोहोंचाया करते है, ये सच है.लायूकिन आजही ऐसी जलदीमे आपका काम हो जायेगा, ए ऐसा बावर नहीं होता. क्यौंके, **कर्नाटक**की जमानें बाजगस्तीमे आजलग कदरदान **खानसाहेब**की तब्बीयत ठिकाणेसर नहींहै. वो नहोकरके, आज दो तीन रोजसे उनकी मिजाजभी आलील रहतीहै.

जबतो जैसे आज आप तशरीफ लायेहैं, वैसेही बारदिगर कदमरंजा फरमावतो मै तुझे मिलादूंगा.

**पाहरेकरी०**–फकीरसाहेब, तुह्मांसारख्या यात्रेकरूंस पुण्याचे कामीं कोण बरें साहाय्य करणार नाहीं? आपल्या आंगीं जरी परोपकार करण्याचें सामर्थ्य नसलें, तरी एखाद्यास दात्याचें घर दाखवून देणें, हाही पुण्याचाच मार्ग आहे. **खानसाहेबा**पाशीं दाद लावून त्यांची भेट करविल्यानें जर तुमचें कार्य होणार आहे, तर मी तें खचीत करीन. आमचे **खानसाहेब** मोठे दयाळू असून गरीबागुरिबांस **बादशहा**कडून साहाय्य देवविण्याचे कामीं सतत झटत असतात. पण, आजच घाई केल्यानें मात्र तुमचें काम होईल किंवा नाहीं, याची मला शंका वाटते. कारण, **कर्नाटकां**तून परत आल्यापासून आमच्या **खानसाहेबांचें** मन थाऱ्यावर नाहीं. शिवाय, आज दोन दिवस तर त्यांच्या प्रकृतीस आराम नसल्यामुळें ते फिकीरींत आहेत. तेव्हां, आणखी एखादे दिवशीं तुह्मी आजच्या प्रमाणें सहज फिरत आल्यास सवड पाहून मी तुमची भेट करवीन.

अशा रीतीनें तंबूबाहेर उभयतांचें भाषण चाललेलें ऐकून 'बाहार किसकी आहाट है' असें **झुलफिकारखानानें** पाहरेकऱ्यास विचारिलें. तें ऐकून 'कोई राहगीर मक्केका मुसाफिर आपकु पुछता है.' असें त्या पाहरेकऱ्यानें सांगितलें. तेव्हां, त्यास आंत येऊं देण्याविषयीं लागलीच परवानगी मिळाली. **खानसाहेबांची** भेट होतांच त्या **फकीरानें** मोठ्या नम्रतेनें व आदबीनें आ-

पत्रा वरपांगी हेतु कळविला, व बादशहाकडून कांहीं साहाय्य मिळवून देण्याविषयीं विनंति केली. शेवटीं निरोप घेतांना, आपल्याबरोबर आणिलेला मोहोरबंद लाखोटा जाजमाखालीं शिरकवून, तो फकीर आपल्या मकाणीं निघून गेला. दुसरे दिवशीं सकाळीं बिछाईत झाडते वेळीं, तो लाखोटा एका चाकराच्या दृष्टीस पडला. त्यानें तो आपल्या यजमानाचा कांहीं कामाचा कागद चुकून बाहेर राहिला आहे असें समजून, खानाच्या हातीं नेऊन दिला. फोडून पहातो, तों आंत उर्दू भाषेमध्यें लिहिलेलें राजारामाच्या शिक्काच्या मोर्तबाचें विनंतिपत्र खानाच्या दृष्टीस पडलें. प्रल्हादपंतांसारख्या शहाण्या, धोरणी व मुत्सद्दी पुरुषाचे ते उमदे विचार, भाषेचा गौरव, दुसऱ्यांची चित्तवृत्ति आकर्षण करून घेऊन आपल्याविषयीं त्यांच्या अंतःकरणांत कळकळ उत्पन्न करण्यासारखें तें लेखनपटुत्व पाहून खानास अतिशय आनंद झाला. कारण, हवें होतें तेंच चालून घरीं आलें, किंवा मनाजोगा योग प्रयत्न न करितां जुळून आला, तर कोणाच्या अंतःकरणांत हर्षाच्या गुदगुल्या होणार नाहींत बरें! प्रल्हादपंतांच्या विज्ञप्तीस मान देऊन होतां होईल तों मराठ्यांची बाजू राखण्याचा यत्न केल्यावांचून बादशहाचे डोळे उघडावयाचे नाहींत किंवा आपला अपमान भरून येण्यास त्यावांचून दुसरा कोणताच मार्ग नाहीं, असा विचार करून झुलफिकारखानानें प्रथम त्या फकीराचा शोध करविला. परंतु,

तो आपला कार्यभाग आटपतांच **बादशहाची** छावणी सोडून निघून गेल्यामुळें, त्याचा पत्ता लागला नाहीं. तेव्हां, आपला पिता **आसदखान कर्नाटकीं** गेला आहे, त्याला आपल्या ह्या अपमानाविषयींचा मजकूर कळवून त्याजकडून **जिंजी** सर न होईल अशी तजवीज करावी, ह्मणजे **प्रल्हादपंतांच्या** विनंतीस मान दिल्यासारखा होईल व आपला हेतुही साधेल, असें मनांत आणून **खानानें** आपल्या बापास तावडतोब पत्र लिहिलें.

इकडे, **आसदखान** व **कामबक्ष** हे उभयतांही सैन्यासहवर्तमान **जिंजीस** पोंचले. तेथें जातांच **आसदखानानें** किल्ल्यास एकदम वेढा देऊन मोर्चेबंदी करविली. पण इतक्यांत, **झुलफिकारखाना**कडून पत्र आल्यामुळें त्यानें आपली सर्व मसलत बदलली, व किल्ला सर करण्याचें काम लांबणीवर टाकिलें. आपण शत्रूंस कोंडून बाहेरील मुलूख लुटीत बसलों, ह्मणजे थोडक्याच दिवसांत त्यांची आंतील अन्नसामुग्री संपून ते आपल्या स्वाधीन होतील, अशी त्यानें **कामबक्षास** मसलत दिल्यामुळें, दोन चार महिने तसेच लोटले. **बादशहा**कडून किल्ला लवकर सर करण्याविषयीं वरचेवर हुकूम येत, पण **आसदखान** स्वस्थ.

**उदाजी** आपला कार्य भाग आटपतांच **बादशहाच्या**छावणींतून निघाला, तो **धनाजी** व **संताजी** यांस जाऊन भेटला. ह्या वेळीं हे उभयतांही **सरदार** **कृष्णेच्या उत्तरेस हैद्राबाद, एलोर** वगैरे प्रांतांत

लुटालूट करीत होते. त्यांनाही वेढ्याविषयींची एकंदर हकीकत व **प्रल्हादपंतांचा** निरोप कळतांच ते आपल्या सैन्यासहवर्तमान एकदम **दक्षिणेकडे** वळले. पण, **जिंजीस** पोहोंचण्यापूर्वी वाटेंतच **कोन्हेरपांक** येथें **अलिमर्दिखान** नामें जो **मोंगल** सरदार रहात असे, त्याची व **मराठ्यांची** गांठ पडली. तेव्हां, अशा अडचणीच्या प्रसंगीं आपण उभयतांही येथेंच गुंतून राहिलों, तर तिकडे शत्रु कदाचित् किल्ला सर करण्याचा झटून यत्न करतील, असा विचार करून **धनाजी** निम्मे सैन्यासहवर्तमान **जिंजीकडे** निघून गेला; व **संताजी** आठ हजार सैन्य घेऊन **अलिमर्दिखानाशीं** टक्कर देण्यास ठाण मांडून तेथेंच उभा राहिला. भुकेनें व वाटेच्या श्रमानें **मराठ्यांच्या** आंगीं अतिशय थकवा आल्यामुळें, किंचित् विश्रांति घेण्याकरितां निवाऱ्याची जागा पाहून त्यांनीं एका ओढ्याच्या कांठीं तळ दिला होता. तेथें हे भागलेले मराठेगडी आपल्या मांडीखालच्या घोड्यांस दाणा देऊन हाश हुश्श करीत आडवे होतात, तों शत्रूंकडील हालचाल दुरून **संताजी**च्या दृष्टीस पडली. **अलिमर्दिखान** आपले लोक बरोबर घेऊन हांहां ह्मणतां ओढ्याजवळ येऊन पोंचला. शत्रु जवळ आले, असें पाहून **संताजीनें** आपल्या लोकांस इशारत दिली व आंगांत चिलखत चढविलें. खंद्या घोड्यावर स्वार होऊन तो तलवार चमकवीत अग्रभागीं येतो, तों मागून सर्व सैन्य सिद्ध झालें. शत्रूंकडील गोळीबार सुरू होतांच, **मानाजी निंबाळकर**

यास पूर्व बाजूकडून बाणाची वृष्टि करण्याविषयीं संताजीनें हुकूम दिला. त्या सरशीं एकदम पर्जन्याप्रमाणें बाणांचा वर्षाव होऊं लागून **मोंगल** लोक पटापट पडूं लागले. ती आपल्या लोकांची स्थिति पाहून **अल्ली** दांत ओंठ चावीत स्वतः तीन हजार स्वारांनिशीं **निंबाळकरावर** घसरला. त्यानें मोठ्या शिताफीनें प्रथम शेंदोनशें **मराठे** कापून काढिले. त्या त्याच्या विजातीय शौर्यश्रीपुढें **मराठे** एकएक पाऊल मागें हटत चालले, व त्यांची गाळण होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. असें पहातांच **संताजी** खवळून जाऊन, त्यानें मोठ्या आवेशानें एकदम **अल्लीवर** चाल केली. ' **वीरहो** ह्या हरामखोर **अविंधांच्या** रक्तानें आपले हे भाले माखण्याचा आज सुसमय प्राप्त झाला असतां, असे कावरेबावरे कां झालांत. क्षात्रकुलांत उत्पन्न होऊन मरणाची भीति!! छीः! शत्रूंस पाठ दाखवून इहलोकीं परवशतेचें दुःख व परलोकीं रौरव नरक भोगण्यापेक्षां मरण बरें. पूर्वजांच्या आशीर्वादानें यश आलें, तर आपला लौकिक ह्या विस्तीर्ण **भरतखंडभर** दणाणून **मराठ्यांचा** प्रतापरवि गगनीं सदैव तळपत राहील. दुर्दैवानें तसा योग नच आला, तर स्वदेशासाठीं धारातीर्थीं देह अर्पण करणें हें जें क्षत्रियांचें खरें कर्तव्य, तें आपण बजाविलेंसें होऊन स्वर्गप्राप्ति होईल. तर पहातां काय! नामर्दपणाचा कोणताही विचार मनांत न आणितां ह्या **शिवछत्रपतींचें** नांव आणि गाजवा तलवार. '

यात्रमाणें वीरश्रीयुक्त भाषण करून **संताजी** आ-

पली समशेर परजीत व सिंहगर्जना करीत शत्रूंची फळी फोडून एकदम गर्दीत शिरला. असें पहातांच बाकीचे मराठे 'हरहर महादेव' असा एकच गंभीरध्वनि करीत मोठ्या त्वेषानें त्याच्या मागून धांवले. उभयपक्षांकडील वीर हातघाईवर आल्यामुळें, शस्त्रास्त्रांची गर्दी उसळली. तास दोन तास एकसारखा रक्तपात चालला होता. असा घनघोर संग्राम चालला असतां, संताजीनें दुरून लक्ष ठेऊन एकाएकीं अलीवर चित्यासारखी उडी टाकली व त्याच्या छातीवर वार केला. त्यासरशीं तो मोंगल सरदार घोड्यावरून धाडकन् खालीं पडला व त्याचें प्राणोत्क्रमण झालें. मग काय विचारतां! शत्रूंच्या सैन्यांत हलकल्होळ उसळून त्यांची दाणादाण उडाली. त्यांचें बहुतेक सामानसुमान मराठ्यांच्या हातीं लागलें. याप्रमाणें, कोन्हेरपांकच्या लढाईत अलीची पायमल्ली करून एक दोन दिवस तेथेंच मुक्काम केल्यावर, ते विजयी मराठे जिंजीकडे वळले.

इकडे जिंजी मुक्कामीं, शत्रूनीं आपल्या सैन्यांत अशी कंडी उठविली कीं, कोन्हेरपांक येथें अलिमर्दिखानानें संताजीस ठार मारून मराठ्यांच्या सैन्याची दुर्दशा उडविल्यामुळें त्यांतील जिवंत राहिलेले कित्येक लोक महाराष्ट्रीं परतले. ती बातमी मराठ्यांच्या छावणींत पसरतांच धनाजीची छाती फुटून तो आपल्या प्रिय मित्राच्या विरहदुःखानें शोकाकुल होऊन गेला.

**धनाजीः**-मित्रा, आजपर्यंत स्वधर्म व स्वराज्य यांच्या रक्षणार्थ आपल्या अपूर्व तेजानें, निस्सीम स्वामिभक्तीनें, व विजातीय पराक्रमानें संपूर्ण **भरतखंड** दणाणून अविंधांस **'दे माय धरणी ठाय'** ह्मणवायास लाविलेंस, त्या तुजवर ईश्वरानें एकाएकीं असा निर्वाणीचा प्रसंग आणिला ना! **मित्रा**, हायरे हाय!! आज तुजसारखा **मराठी** राज्याचा वैभववृक्ष कडाडून पडल्यामुळें, या **धनाजी**ची सर्व हिंमत करपून कोरे गेली! **वीरश्रेष्ठा**, ज्या कुळांत एकापेक्षां एक शौर्यशाली पुरुष स्वामिभक्तीचा झेंडा दिगंत फडकवून रण मंचकावर अक्षय्य निद्रित झाले, त्या **घोरपड्यां**चा वंश तूं आपल्या अजब कर्तबगारीनें आज धन्य केलास, व आपल्या रक्तानें स्वर्गस्थ पूर्वजांस शेवटची तिलांजली देऊन त्यांच्या उपकारऋणांतून मुक्त झालास, हें खरें. पण **संताजी**, ह्या दुर्दैवी **धनाजी**ला पुनश्च असा अमूल्य मित्रलाभ कोठेंरे मिळेल! **जिंजीहून प्रल्हादपंतां**चा निरोप घेऊन निघते वेळीं, स्वराज्याची मुक्तता करून मुसलमानांचें नांव या **भरतभूमी**तून पार नाहींसें केल्यावांचून परलोकची वाट धरावयाची नाहीं, अशी जी आपण **भीष्मप्रतिज्ञा** केली, तिचा तुला कसारे विसर पडला! हायरे दैवा!! मला आज माझ्या यशाचा व संकटाचा वांटेकरी अंतरलाना! **मित्रा**, अंतकाळीं तूं माझी आठवण केली असशील, व स्वराज्य स्वराज्य ह्मणून तुझा प्राण घुटमळला असेल. ( त्वेषानें ) नीचा **काशिमखाना**, तुझ्यां अविंधांचा

प्रत्यक्ष काळ असा हा **धनाजी** जिवंत असतां, कपट साधून ज्या हातानें त्या माझ्या वीरबंधूवर वार केला असशील, त्याचे या तलवारीनें लाही लाहीएवढे तुकडे केल्याशिवाय, किंवा त्या तुझ्या मस्त अशा धिप्पाड छातीवर पाय देऊन तोंडांत रणधूळ कोंबल्याशिवाय हा **धनाजी** पाणी देखील पिणार नाहीं, हें खचीत खचीत समज. (सुसकारा टाकून) हे निष्ठुरा **यमा**, यावज्जन्मांत ज्यानें आपल्या विमल कीर्तीस अपयशाचा डाग कधींही लागूं दिला नाहीं, स्वदेशसेवा ही ज्याची इतिकर्तव्यता, हातांत चमकणारें खड्ग हीच ज्याची अर्धांगी, व **मोंगल** रसातळास नेऊन स्वदेशबंधूंस आणि **आर्यजननीस** सुख देणें हेंच ज्याचें आमरण व्रत, अशा **संताजीवर** निःशंकपणें आपले पाश टाकण्यास तुला देखील शरम वाटली नाहींना! पण, तुला तरी काय ह्मणून बोल लावावा? ब्रह्मलिखितापुढें तुझा तरी काय इलाज! **मित्रा**, इतका निर्दय कसारे झालास? सकल बंधुवर्ग दुःखसमुद्रांत लोटून स्वर्गाची वाट धरितांना तुला कोणाचीच कींव आली नाहीं काय? ( किंचित् विचार केलासें करून ) हां, समजलें. **संभाजी**च्यामागें सर्व **भरतभूमि** अविंधिमय होण्याचा प्रसंग आला असतां, ईशकृपेनें, **मोंगलां**सारख्या बलाढ्य शत्रूंचा बहुतेक नाश होऊन परत स्वराज्याच्या भगव्या झेंड्याची छाया **महाराष्ट्रियांस** लवकरच प्राप्त होण्याचा सुसमय आला आहे, ही आनंदाची वार्ता **आबासाहेबांस** कळविण्याकरितां, सर्वांच्यापुढें तूं धांव घेत-

लीस वाटतें. असो. **सरदार** हो, आतां ज्या रणांगणांत **संताजीचा** देह पडला असेल, तेथें शत्रूंच्या रक्ताचे सडे शिंपून, आपल्या प्रिय मित्रानें आजपर्यंत पाळलेल्या क्षात्रव्रताचें उद्यापन करण्याकरितां, रणकुंड भडाडून त्यांत **काशिमखाची** पूर्णाहुति देण्यासाठीं उदईक निघण्याची तयारी करा.

अशा रीतीनें, **धनाजी** आपल्या जिवलग मित्राचे गुण आठवून त्याच्या अकालिक मृत्यूविषयीं दुःख करीत बसल्याचें पाहून, बाकीचे सर्व लोक अगदीं हवालदिल होऊन गेले. इतक्यांत, **संताजीनें** पुढें पाठविलेला स्वार, **मराठे** विजयी होऊन **जिंजीकडे** येत असल्याची बातमी घेऊन छावणींत येऊन दाखल झाला. ती आनंदाची बातमी हांहां ह्मणतां सर्वत्र पसरून, ईश्वरानें हें मोठेंच संकट टाळलें, असें सर्वांस वाटूं लागलें. जिकडे तिकडे आनंदीआनंद होऊन **धनाजी** मोठ्या उत्साहानें आपल्या वीरबंधूस सामोरा गेला. उभयतांच्या भेटी होतांच एकमेकांस मोठ्या प्रेमानें आलिंगून **धनाजीनें संताजीस** सर्व मजकूर कळविला. पुढें, उभयतांच्या विचारें अशी मसलत ठरली कीं, **जिंजी**-सभोंवती वेढा देऊन बसलेल्या शत्रूंस आपणही बाहेरून घेरून टाकावें, ह्मणजे त्यांच्या सैन्यांत **बादशहाकडील** बातमी व घांसदाणा वगैरे सामुग्री येण्याचे मार्ग बंद होऊन, ते लवकरच जेरीस येतील. मग, आपण खालून व किल्ल्यावरील फौजेनें वरून एकदम शत्रूंवर आग पाखडावी. ह्मणजे, शत्रूंस

'भीक नको पण कुत्रा आवर' असें होऊन, ते परत जिंजीकडे वांकड्या नजरेनें पहाण्यास देखील धजणार नाहींत. असा त्या उभयतांचा एक विचार होतांच मोंगल सैन्यासभोंवती एकदम मराठ्यांचा गराडा पडला. ती आपल्या शत्रूंची हालचाल पाहून, त्यांजवर हल्ला करण्याविषयीं कामबक्षानें आसदखानास दोन चार वेळ सांगून पाहिलें. पण, तो खान स्वस्थ. जवळची अन्नसामुग्री संपेपर्यंत त्यांचा कांहीं विचार झाला नाहीं. शेवटीं, बाहेरील सर्व मार्ग बंद होऊन जेव्हां मोंगल सैन्यांत उपासमार होऊं लागला, तेव्हां मात्र कामबक्षाच्यानें धीर धरवेना. तो कठीण प्रसंग पाहून त्यानें खानाचा नाद सोडून दिला, व आतां एक मारावयाचें किंवा मरावयाचें, असा त्याच्या मनाचा निश्चय झाला. अशा प्रकारें शहाजादा लढण्यास सिद्ध होतांच, निराश होत चाललेले कित्येक पदरचे सरदार व सेना, धैर्यानें कंबर बांधून उभी राहिली.

प्रथम कोणत्या बाजूनें शत्रूंवर घसरून लढाईचें तोंड लावावें, ह्या विचारांत कामबक्ष असतां, मराठ्यांच्या सैन्यांतून हळूहळू गोळीबार सुरू झाला. असें पाहतांच, शत्रूंनीं मोठ्या शहामतीनें आपल्या तोफा डागून मराठ्यांची बरीच दुर्दशा उडविली. परंतु, कांहीं वेळानें किल्ल्यावरून तोफांची आग भडकूं लागून जेव्हां मोंगल सैन्यांतील लोक पटापट मरूं लागले, तेव्हां मराठ्यांस धीर पोंचून लागलीच लढाईचा रंग पालटला. धनाजी आपले निवडक स्वार बरोबर घेऊन

शत्रूंवर चालून जातो, तों दोन्हीकडून **मराठ्यांच्या** माऱ्यांत सांपडल्यानें जिवावर उदार झालेले कित्येक **मोंगल सरदार, 'दीन दीन'** असा शब्द करीत ऐन गर्दींत शिरले. **नजीबखान, मिराखान** व **आसद्‌खान** हे सरदार डाव्या बाजूस **संताजीशीं** मोठ्या निकरानें लढत होते. पण, तो घनघोर युद्धसंग्राम टाकून, **मिराखान** एकाएकीं दांत ओंठ चावीत पूर्वेकडे वळला.

कारण, इकडे पूर्वभागीं **कामबक्ष** व **सर्जेखान** हे दोघे मोठ्या त्वेषानें **मराठ्यांच्या** स्वारांवर एकाएकीं तुटून पडल्यामुळें, त्यांजवर दमानें हत्यार चालविण्याविषयीं **धनाजी** आपल्या वीरांस प्रोत्साहन देण्यांत अगदीं गर्क होऊन गेला होता. ती संधि पाहून त्याजवर मागून वार करण्याच्या हेतूनें जिवाची आस्था सोडून **मिराखान** आपली समशेर परजीत गर्दींतून **धनाजी**कडे निघाला. तें दुरून **विश्वासरावाच्या** दृष्टीस पडतांच, तो धाडसी बाणेदार सरदार, मांडी खालचा घोडा वाऱ्यासारखा फेंकीत, त्याच्या मागोमाग धांवला. **मिराखान** आतां वार करणार, इतक्यांत **विश्वासरावा**सारख्या त्या हिंमतदार **मराठे** गड्याचा वज्रप्राय प्रचंड भाला अकस्मात् पाठींत शिरल्यामुळें, **मिराखान 'या खुदा, या नभी,'** असें ह्मणत धाडकन् जमिनीवर पडला. **विश्वासरावाची** ती हुशारी व तो पराक्रम पाहून, **'मित्रा, शाबास; वीर श्रेष्ठा, शाबास'** असा **धनाजीच्या** व सर्व लोकांच्या तोंडून आनंदाचा ध्वनि गर्जू

लागला. 'काळ आला होता, पण वेळ आली नाहीं' या न्यायानें धनाजीवरील हें संकट टळलें, असें पाहून मराठे नव्या दमानें शत्रूंची कत्तल उडवीत पुढें सरले. ' हरहर महादेव ' व ' दीन दीन ' अशा उभय सैन्यांतील वीरांच्या गर्जनेनें आकाशपाताळ एकच होऊन गेलें. बहुतेक योद्ध्यांच्या आंगीं खरा आवेश चढून त्यांनीं काळस्वरूप धारण केल्यामुळें, तो युद्धाचा आखाडा क्षणभर यमपुरीच बनून गेला. चोहोंकडे प्रेतराशि पडून रक्ताचा व मांसाचा चिखल उसळून गेला. तिकडे संताजीनें, नजीबखानाची व आसदखानाची दुर्दशा उडवून त्यांचा बहुतेक रिसाला धुळीस मिळविल्यामुळें, शत्रूंची दाणादाण होऊन ते सैरावैरा पळत सुटले. आसदखानाच्या मनांतून जरी लढाई देण्याचें पूर्वींपासून नव्हतें, तरी बादशहास कदाचित् आपल्याविषयीं संशय येईल, या भीतीनें तो लढत होता. कामबक्ष व सर्जेखान यांनीं आपल्या हातून होईल तितकी लढण्याची पराकाष्ठा केली; परंतु, धनाजीच्या अजब युद्धचापल्यापुढें व मराठ्यांच्या जबरदस्त भाल्यांपुढें त्यांचा कांहींच कटाव न चालतां, मोंगल सेना अगदीं हवालदिल होऊन गेली. तेव्हां, आतां उगीच प्राणहानि करून घेण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें समजून, कामबक्षानें मराठ्यांशीं तहाचें बोलणें लाविलें. शत्रु शरण आले असें पाहून, संताजी व धनाजी यांनीं लढाई बंद केली. नंतर, प्रथम किल्ल्यावर चढून त्या उभयतां वीरांनीं मोठ्या आनंदानें महाराजांची

व **मल्हारपंतांची** भेट घेतली, आणि त्यांस **शहाजदा कामबक्ष** याचें तहाविषयींचें बोलणें कळविलें. तेव्हां, शत्रूंनीं एकंदर तोफा, जवळचें अमोलिक सामान, व खजिना **मराठ्यांचे** स्वाधीन करावा, आणि **मराठ्यांनीं** त्यांस कांहीं एक उपद्रव न देतां **वांदिवाशपर्यंत** पोंचवावें, असें ठरलें. याप्रमाणें तह होऊन **कामबक्ष, आसदखान, सर्जेखान** वगैरे मंडळी **महाराष्ट्रीं** परतली.

---

## भाग १४ वा.

---o:o---

। खड्गाल्लक्ष्मीस्तथा राज्यं यशः खड्गादवाप्यते ।

उत्तरेकडे **गुजराथ, खानदेश, वऱ्हाड, बागलण, नांदेड,** व **गोदातीर** या प्रांतांत **रामचंद्रपंतांनीं** आपला अंमल बसविण्याकरितां कित्येक मोठे सरदार पाठविले होते, असें मागें सांगितलेंच आहे. त्यांत **परसोजी भोंसले, नेमाजी शिंदे, हैबतराव निंबाळकर, दाभाडे, आठोळे, पवार, थोरात** वगैरे सरदार **भोंसलेकुळाचें** यश गाजविण्यासाठीं सारखे दोन तीन वर्षें जिवापाड श्रम करीत असल्यामुळें, त्यांनीं **दाऊदखान, अबदुलअली, महंमदवजीर, रुस्तुमबहादर** वगैरे **मोंगल** सरदारांस अगदीं जेरीस आणून सोडिलें होतें. **बादशहाचीं** ठाणीं असतील त्यांजवर छापा घालावा, लूटावें, मुलूख मारावा व

**चौथाई** खंडण्या घ्याव्यात. एखादें ठाणें बळावून झाडीच्या आश्रयानें छावणी करावी, प्रसंग पडल्यास शत्रूंवर तुटून पडावें, व त्यांच्या कुमकेस फौज आली कीं, पुनः फुटून नाहींसें व्हावें. आज येथें, तर उद्यां पंचवीस कोसांवर. अशा रीतीनें, **मोंगल** सरदारांस कोणताही अदमास लागूं न देतां, जागोजाग **मराठ्यांनीं** धुमश्चक्री उडविल्यामुळें, **उत्तरेंत** स्वराज्याचा झेंडा फडकूं लागला. **परसोजी, हैबतराव, आठोळे** वगैरे पराक्रमी पुरुषांचा दरारा बहुतेक मुलुखांत बसून त्या जयशाली पुरुषसिंहांची गर्जना जिकडे तिकडे गर्जूं लागली. ती त्यांची करामत व त्यांचा हिय्या पाहून **रामभाऊंस** हर्षाच्या गुदगुल्या होऊं लागल्या. त्यांनीं त्या सरदारांच्या पराक्रमाबद्दल **जिंजीस** लिहून **प्रल्हादपंतांकडून** त्यांस बहुमानाच्या पदव्या देवविल्या. **परसोजी भोंसले** यास **'सेनासाहिब सुभा' निंबाळकरास 'सरलष्कर' दाभाड्यास 'सेनाधुरंधर' पवारास 'विश्वासराव' थोरातास 'दिनकरराव'** व **आठोळ्यास 'समशेरबहादर'** असे किताब देऊन, **प्रल्हादपंतांनीं** त्यांच्या त्यांच्या मानाप्रमाणें त्यांस वस्त्रें व अलंकार **जिंजीहून** पाठवून दिले. याप्रमाणें **कर्नाटक, महाराष्ट्र,** व **उत्तरेस विंध्याद्रिपर्यंत** जिकडे तिकडे मराठ्यांचे सरदार व सेना पसरून त्यांनीं आपल्या क्षात्रतेजानें **मोंगलांस** दिपवून सोडिल्यामुळें, **रामराज्याचा** यशोदुंदुभि सर्वत्र गाजूं लागला.

**कामबक्ष** व **आसदखान, सर्जेखान** वगैरे **मोंगल** सरदार **मराठ्यांस** पाठ दाखवून **जिंजी** सर न करितां **महाराष्ट्रीं** परतले, असें मागें सांगितलेंच आहे. तें **कामबक्षाचें** लाजिरवाणें वर्तन व **मोंगल** सरदारांची उडालेली दुर्दशा, यांच्या योगानें **'शेपं कोपेन पूरयेत्'** अशी **औरंगजेबाची** अवस्था होऊन गेली. खदिरांगारासारखा तप्त होऊन आतां **मराठ्यांस** भाजून काढूं, कीं त्यांस रसातळीं गाडून टाकूं, असें त्यास होऊन गेलें. खातां पितां, बसतां उठतां, चालतां बोलतां, चैन नाहींसें होऊन त्याला स्वप्नांत देखील **मराठे** दिसूं लागले. तेव्हां, ठिकठिकाणच्या आपल्या फौजेस व सरदारांस शत्रूंवर एकदम हत्यार धरण्याविषयीं सक्त हुकूम फर्मावून **बादशहा** स्वतः **ब्रह्मपुरीयेथील** छावणी उठवून **विजापुराकडे** निघून गेला. **जिंजी** सर न झाल्यामुळें क्रोधाविष्ट होऊन गेलेल्या **बादशहाच्या** हुकुमाप्रमाणें, **मोंगल** सरदार बेफामपणें **महाराष्ट्रांत** व **कर्नाटकांत** धुमाकूळ घालूं लागले. तें वर्तमान **प्रल्हादपंतांस** समजतांच, त्यांनीं **धनाजीच्या** हाताखालीं वीस हजार सैन्य देऊन त्याला ताबडतोब **महाराष्ट्रीं** पाठवून दिलें; व बाकीची फौज **संताजीच्या** स्वाधीन करून त्याला **कर्नाटकांतील** **विजापूरसंबंधीं** मुलूख लुटण्याविषयीं हुकूम दिला. त्याप्रांतीं **कासिमखान** नांवाचा मोठा प्रबळ व शूर **मोंगल** सरदार राहत असे. त्याला ही **संताजीची** चळवळ दृष्टीस पडतांच, त्यानें मदतीविषयीं **बादशहास** लिहून लढाईची तयारी केली. **का-**

**शिमखान** हा मोठा बाणेदार सरदार असल्यामुळें, त्याला सैन्याचें चांगलें पाठबळ मिळाल्यास तो **मराठ्यांचा** कंडू शमवून त्यांस **कर्नाटकांतून** पिटाकून लाविल्यावांचून राहणार नाहीं, असें **औरंगजेबास** वाटून त्यानें त्याच्या मदतीस **विजापुराहून इसफरजंग** ह्यास वीस हजार सैन्यानिशीं पाठवून दिलें.

ही **मोंगल** फौज **काशिमखानास** येऊन मिळतांच, त्याच्या आंगीं जास्त ईर्षा उत्पन्न झाली. तो **पठाण** मोठा दिलदार व हाडाचा खरा मुसलमान असल्यामुळें, ज्या **संताजीचा** त्यानें हा वेळपर्यंत एवढा पराक्रम ऐकिला होता, त्याच्याशीं लढून आपलें शौर्य त्याला दाखवावें, व **मराठ्यांस** एकदम गांठून त्यांची धुळधाण उडवावी, असा त्यानें बेत केला. पण, ती त्याची मसलत सिद्धीस जाण्यापूर्वींच **संताजीनें** एके दिवशीं रात्रीं पंधरा हजार घोडेस्वार, पांचहजार पायदळ व कित्येक तोफा बरोबर घेऊन एकाएकीं **काशिमखानाच्या** छावणीसभोंवती वेढा दिला. हें **संताजीचें** धाडस पाहून त्या **मोंगल** सरदारास मोठा अचंबा वाटला. रात्रभर **मराठ्यांनीं** आपल्या बाणांच्या योगानें **मोंगल** सैन्यापैकीं जरी कित्येक लोक जाया केले होते, तरी ती काळोखरात्र असल्यामुळें, **काशिमखानानें** फारशी हालचाल केली नाहीं. दुसरे दिवशीं, सूर्योदयापासून तिसरा प्रहर होईपर्यंत उभय सैन्यांतील लोक मधून मधून गोळीबार सोडीत होते; परी लढाईचें तोंड नीटसें लागलें नाहीं. तिसरे प्रहरीं शत्रूंनीं उत्तम ठिकाण पाहून

व्यवस्थेनें आपल्या तोफा डागल्या, **व मराठ्यांवर** एकदम गोळ्यांचा वर्षाव सुरू केला. **मराठ्यांचा** तोफखानाही धडाडूं लागून एक दोन घटकांपर्यंत धुरानें व धुळीनें दशदिशा धुंद होऊन गेल्या. पण, **मोंगलां**च्या तोफांची आग भारी; त्यांच्या मारापुढें **मराठ्यां**च्या किरकोळ तोफांचें कांहीं तेज पडेना. तेव्हां, आतां शत्रूंच्या आंगावर पडून आपल्या भाल्यांच्या अजब फेंका व तलवारीच्या सफई हातांची करामत दाखविल्यावांचून आपला निभाव लागणें कठीण, असें **संताजीस** वाटून त्यानें आपल्या सरदारांस व सैन्यास इशारत दिली. त्यासरशीं एकदम १९ हजार स्वारांची मांड उठून ते तिरासारखे सोसावत शत्रूंच्या तोफांशीं जाऊन भिडले. असें होतांच, **मोंगलां**कडील स्वारांनींही लगट केली. तोफा बंद पडून उभय सैन्यें परस्परांच्या आंगाशीं भिडल्यामुळें, एकच गर्दी उसळली. घोड्यांच्या टापांनीं, योद्ध्यांच्या सिंहगर्जनेनें व तलवारींच्या आणि भाल्यांच्या ‘ खाड खाड ’ अशा शब्दांनीं आकाश पाताळ एकच होऊन गेलें. **संताजीच्या** मांडी खालचा घोडा जायबंदी होऊन त्याला स्वतांलाही कित्येक जखमा लागल्या होत्या; तथापि, हा आपला **भीष्माचार्य** सर्वांग रक्तानें व धुळीनें भरून गेलें असतांही नव्या घोड्यावर स्वार होऊन, धिमेपणानें ‘**मर्दहो, शाबास; वीरहो, शाबास**’ अशा वीरश्रीयुक्त भाषणानें आपल्या लोकांस उत्तेजन देत सैन्यामध्यें बिजलीसारखा इकडून तिकडे व तिकडून इकडे चमकत होता. **काशि-**

मखान व इसफरजंग हे उभयतां **मोंगल** सरदारही मोठ्या शौर्यानें लढत व आपल्या लोकांस दम देत संध्याकाळपर्यंत रणांगणीं आपला पराक्रम गाजवीत होते. परंतु, शेवटीं **मराठ्यांच्या** जबरदस्त मारामुळें आपले लोक हैराण होऊं लागले, असें **काशिमखानास** दिसलें. तेव्हां, अंधार पडतांच, आपलें कांहीं सैन्य पुढें तोंडावर लढत ठेवून बाकीच्या सैन्यानिशीं तो मोठ्या युक्तीनें हळूहळू एकएक पाऊल मागें सरूं लागला. मध्यरात्रीच्या सुमारास तो आपल्या लोकांसहवर्तमान मागें हटत हटत तेथून पांच मैलांवर **दादोरी** नांवाचा एक लहानसा किल्ला होता, त्याच्या आश्रयास जाऊन पोंचला.

शत्रु मागच्यापायीं हटत चालले आहेत असें दृष्टीस पडतांच, **संताजीही** आपल्या सैन्यानिशीं लढत लढत मैल दोन मैलपर्यंत पुढें आला होता. परंतु, रात्र होऊन काळोख मिट्ट पडल्यामुळें, आतां काळोखांत आपण शत्रूंच्या नादीं लागून असेच चाललों व कदाचित् एखाद्या धोक्याच्या जागीं सांपडलों तर पंचाईत, असें **संताजीच्या** मनांत येऊन तो तेथूनच मागें परतला. **मराठ्यांनीं** ती सारी रात्र त्या रणभूमीवरच काढिली. सूर्योदय होतांच **मराठ्यांचे** कित्येक स्वार शत्रूंच्या शोधार्थ फिरूं लागले. **मोंगल** तेथून जवळच एका बळकट किल्यांत आश्रय धरून मोठ्या बंदोबस्तानें राहिले आहेत असें **संताजीस** समजतांच, त्यानें आपल्या सैन्याच्या दोन टोळ्या करून लगेच **दादो-**

री किल्यास वेढा दिला. परंतु, **शत्रूंस** बळकट जागा सांपडल्यामुळें, त्यांनीं कित्येक दिवस **संताजीस** दाद दिली नाहीं. आपली ही अवस्था **बादशहाचे** कानीं जाऊन तिकडून सैन्य येईल, व आपण पुनः लढाई देऊं, अशा आशेनें **मोंगलांनीं** दमादमानें बरेच दिवस काढिले. पण, शेवटीं **काशिमखानाची** निराशा होऊन किल्ल्यावरील धान्याचा सांठा संपल्यामुळें लोकांस उपासमार पडूं लागले. एकमेकांस चावून खाण्याची पाळी येऊन पोंचली. साक्षात् मृत्यूचें भयंकर स्वरूप लोकांच्या डोळ्यापुढें दिसूं लागल्यामुळें ते जिवावर उदार होऊन, त्यांनीं बाहेर पडण्याचा निश्चय केला. मग एके दिवशीं पहांटेस **मराठे** बेसावध आहेत अशी संधि साधून कोणी खुशाल घोरताहेत, कोणी उठून मुखमार्जन करिताहेत, कोणी घोड्याची चाकरी करिताहेत व कोणी प्रातःस्नान करीत ओलेत्यानेंच उभे आहेत, अशावेळीं पूर्वेकडील दरवाज्यानें पांच चार हजार **मोंगल** जिवाची पर्वा न बाळगतां '**दीन-दीन**' शब्द करीत एकदम **मराठ्यांच्या** मोर्चावर तुटून पडले. जिकडे तिकडे एकच हलकल्होळ उसळून गेला. **मराठे** प्रथम बेसावध असल्यामुळें, **मोंगलांनीं** त्यांचा बराच नाश केला. पण इतक्यांत सज्ज होऊन जेव्हां त्यांनीं आवेशानें शत्रूंचा सप्पा उडविण्यास प्रारंभ केला, तेव्हां क्षणभर ती रणभूमी प्रत्यक्ष **यमपुरी** बनून रक्ताचे पाट वाहूं लागले. सरदार एकीकडे, तर घोडा भलतीकडे; कोणाचा पत्ता कोणास नाहीं अशी

स्थिति होऊन, त्या पोटास आळलेल्या **मोंगलांच्या** पहाऱ्या तिकडे प्रेतराशि दिसूं लागल्या. ही आपल्या सोबत्यांची अवस्था पाहून किल्ल्यावरील हतभाग्य लोकांत एकच हाहाःकार उसळला. मग कोठचा धनी आणि कसचा हुकूम! सर्व लोक निराश होऊन जीव वांचविण्याकरितां **संताजीस** शरण आले. पण, **काशिमखान** हा खरा प्रामाणिक व महा मानी सरदार असल्यामुळें, त्याला **मराठ्यांस** शरण जाणें न आवडून त्यानें विष खाऊन प्राण दिला. याप्रमाणें **कर्नाटकांत** कृष्णेच्या पश्चिमभागीं **संताजीनें** खरा पराक्रम व खरी मर्दुमकी गाजवून, सन १६९६ च्या अखेरीस संपूर्ण **कर्नाटकांत** आपला दरारा बसवून सोडिला.

**मोंगलांच्या** व **मराठ्यांच्या** शौर्याची, युद्धकौशल्याची, आंगबळाची, सोसिकपणाची आणि वाकबगारीची खरी परीक्षा या प्रसंगीं झाली. **अकबराची** सौम्य राज्यपद्धति, **जहांगीरच्या** कारकीर्दींतील अनास्था व **शहाजनाच्या** वेळची स्वस्थता, इत्यादि कारणांमुळें **मोंगलांच्या** लष्कराची कैद, त्यांचा लढाऊपणा, त्यांचें धाडस व त्यांची उग्र प्रकृति इत्यादि गुण फिक्के पडत जाऊन, त्यांच्या गरम स्वभावाचें स्वरूप नरम होत चाललें होतें. अमिरउमरावांच्या आंगीं बडेजावी, ऐषआराम, अहंकार व बेदिलपणा वाढत जाऊन आलस्य आणि हतवीर्यपणा यांच्याशीं त्यांचें खरें सख्य बनत चाललें होतें. **मोंगल** सरदारांचीं स्वारी ह्मणजे केवळ वरातीचा थाट. त्यांचे घोडे उमदे व देखणे अ-

मून ते शृंगारलेले असत. त्यांच्या पाठीवरील अवजड जिनें सोन्यारुप्याच्या सांखळ्यांनीं जखडलेलीं असावयाचीं. त्यांजवर मखमालीचे सुरेख गाशे असून दोहों बाजूंस वनगाईच्या केसांचीं मोरचेलें लटकत असत. घोडेस्वारांची शिस्त ही साधारण अशाच मासल्याची असे. त्यांच्या आंगांत अतिशय जाड अशा जापुरणी कापडाचे डगले असून त्यांवर आणखी तारेचीं किंवा पत्र्याचीं चिलखतें चढविलेलीं असत. त्यांच्या घोड्यावरील सामानही फार अवजड असल्यामुळें एखादा प्रसंग आला असतां, मोंगल आपल्या घोड्यांचे चारजामे ठाकठीक बसविताहेत व चिलखतें चढविताहेत तों शत्रूंनीं छापा घालून पार लुटून जात असावें. मोंगल शिपाई ह्मटले ह्मणजे जरी जात्या धिप्पाड, खरे लढवय्ये व साहसी असे असत, तरी त्यांच्यामध्यें दिवसेंदिवस चैनबाजी व ऐषआरामीपणा माजत गेल्यामुळें, हळूहळू त्यांचें खरें तेज लोपून गेलें होतें. ते पक्के मिजासखोर बनल्यामुळें, आपआपल्या ठिकाणीं शरीरसुखाची तजवीज पहात दुसऱ्याची पर्वा न बाळगितां गुडाखूच्या झुरक्यांत निमग्न असत. असा प्रकार असल्यामुळें, त्यांची तब्बेत लागून ते खऱ्या तयारीनें लढावयास एके ठिकाणीं उभे राहिले ह्मणजे जरी शत्रूंस भारी होते, तरी दीर्घ प्रयत्न करण्याची उमेद किंवा एकसारखे कष्ट व हाल सोसून टिकाव धरण्याची कुवत त्यांच्या आंगीं मुळीच नव्हती.

मराठे बांध्यानें जरी लहान, तरी जात्या चपळ असून

मेहनतीच्या कामाची त्यांस सतत संवय असल्यामुळें, त्यांची शरीरें बनलेलीं दिसत. त्यांचे घोडे त्यांच्या प्रमाणेंच आंगानें जरी लहान तरी जोमदार, बळकट, व काटक असत. स्वारानें किंचित् मांडी दाबिली कीं, भरधांव पळत असतांही चौखूर उडी टाकणें जणों काय त्यांच्या आंगवळणींच पडून गेलें होतें. त्यांच्या पाठीवरील जिनें अगदीं साधीं व हलकीं असावयाचीं. स्वारांचा किंवा शिपायांचा पोषाख ह्मटला ह्मणजे, डोकीस एक लहान पगडी, तंग मांडचोळणा, आंगांत हलकारूदार आंगरखा व कमरेस भिडलेला एक लहानसा कांचा, एवढीं काय तीं साडेतीन वस्त्रें. तीरकमठा, पाणीदार तलवार, तोड्याची बंदूक, किंवा सुमारें ८ हात लांब बांबूच्या काठीचा भाला, हीं त्यांचीं हत्यारें. मोंगल शिपायांप्रमाणें त्यांजबरोबर तंबू किंवा डेरे नसत. प्रत्येक स्वारानें आपला भाला आपल्या जवळ जमिनींत रोंवून तो एका हातानें धरावयाचा, व दुसऱ्या हातास घोड्याची लगाम बांधून उघड्यावर किंवा पाहिजे तेथें पडावयाचें. शत्रूंनीं अकस्मात् गांठल्यास एकदम घोड्यावर उडी मारून स्वार होतां यावें, अशी त्यांची नेहमीची तयारी असे. ऊनपाऊस किंवा खाणेंपिणें यांचा ते फारसा दरकार करीत नसत. प्रसंग पडल्यास घोड्यावरच कांदाभाकर खाऊन, ते दोनदोन तीनतीन दिवस काढीत. जशी वेळ येईल तशा रीतीनें वागण्यास त्यांची सदोदित सिद्धता असल्यामुळें, त्यांना पराजयाचें भय कधींच वाटत नसे. बलाढ्य

शत्रूंशीं गांठ पडून कदाचित् आपला मोड होतो असें वाटलें, तर एकदम फुटून चोहोंकडे चार नाहींसे होण्याची कला त्यांस उत्तम साधली होती. दोन चार दिवस गेले कीं, पुनः एकत्र होऊन शत्रूंची पाठ पुरविण्यास मराठे तयार आहेतच. अशी त्यांची शिस्त व एकोपा असल्यामुळें, ते आपल्यापेक्षां प्रबल शत्रूंवरही बेधडक चालून जाऊन तलवार गाजवीत.

---

## भाग १५ वा.

---

करुणाविमुखेन मृत्युना
हरता त्वां वद किं न मे हृतम्। रघुवंश.

कर्नाटकांत काशिमखानाचा पूर्णपणें पराभव होऊन तो शूर सरदार प्राणास मुकला व महाराष्ट्रांतील सिंहगड, पुरंदर वगैरे किल्ले आपल्या हातीं आले, असें ऐकून राजाराम महाराजांस व इतर मंडळीस फार आनंद झाला. पण, अशा रीतीनें चोहोंकडे मराठ्यांचें प्राबल्य वाढत जाऊन स्वराज्याची उन्नति होत चालली असतां, मध्येंच एक दुःखकारक गोष्ट घडून आली; तिच्यायोगानें संपूर्ण महाराष्ट्रमंडळाच्या उत्साहभरित अंतःकरणास एकाएकीं मोठाच धक्का बसला. प्रल्हादपंतांच्या आंगांत अकस्मात् कांहीं विकार उत्पन्न होऊन, त्यांची प्रकृति क्षीण होत चालली. औषधोपचार बरेच झाले; परंतु, कांहीं गुण न येतां दिवसेंदिवस ते जास्त थकत चालले. आतां आ-

पण ह्या दुखण्यांतून खचीत पार पडत नाहीं, असें त्यांस समजून चुकलें. नेहमीं सायंकाळीं **राजाराम महाराज** व पदरची प्रमुख प्रमुख मंडळी त्यांच्या समाचारास येत. त्याप्रमाणें एके दिवशीं बहुतेक मंडळी जमली असतां त्यांस मोठ्या प्रेमानें जवळ बोलावून **प्रल्हाद-पंत** ह्मणाले:—**महाराज व मानकरी** मंडळीहो, माझी इहलोकची वस्ति आतां फार थोड्या दिवसांची राहिली आहे. आजपर्यंत तुह्मीं माझ्या हातून होईल तशी स्वराज्याची सेवा करवून तींत यश दिलेंत, यामुळें माझी या जगांतील इतिकर्तव्यता मला आतां मरणाची भीति मुळीच वाटूं देत नाहीं. कारण, हा मृत्युलोक आहे त्याअर्थीं प्रत्येक देहावर केव्हां ना केव्हां तरी ती पाळी यावयाचीच. परंतु ती येण्याचा काल आपल्यास माहीत नसल्यामुळें, जो मनुष्य आपलीं ऐहिक कर्तव्यें बजावण्याविषयीं सतत दक्ष असतो, त्याचा अंतकाळ सुखानें जातो. यासाठीं, प्रत्येकानें आपल्यास या जगीं काय काय करावयाचें आहे, व आपण काय करीत आहों, याचा नेहमीं त्रिकाळ विचार करीत असावें. नाहींपेक्षां, खऱ्या कर्तव्यकर्माचा विसर पडून मनुष्याची मनोवृत्ति भलत्याच कामीं गुंग करून टाकण्याविषयीं लालूच दाखविणाऱ्या ज्या कित्येक दुष्ट व घातुक वासना आहेत, त्या मनुष्यास आपलासा करण्यासाठीं सतत टपत असतात. ह्मणून सावधगिरीनें वागून, केवळ स्वसुखसाधनाकडे किंवा आत्मलाभाकडेच दृष्टि न देतां, आपल्यास ह्या नरजन्मांत इतर पुष्कळ

गोष्टी साधावयाच्या आहेत, हें पक्कें लक्षांत ठेवा. ह्मणजे उरलेला आयुष्याचा काल सुखानें जाऊन तुह्मी इह-परलोकीं खचीत धन्य व्हाल.

**शिवाजी महाराजांच्या** पुण्याईमुळें व **भरतभूमीस** स्वातंत्र प्रदान करणाऱ्या तुह्मांसारख्या निःसीम स्वदेश भक्तांच्या महत् भाग्यानें या **मराठी** राज्याचे दुर्दिन संपून, आतां त्याचा उदयकाळ प्राप्त होण्याची वेळ जवळ आली आहे. तर, आजपर्यंत तुह्मी सर्व जसे या **भोंसले** कुलाचें गेलेलें यश परत मिळविण्याच्या कामीं एक दिलानें तनमन अर्पून शत्रूंची पायमल्ली करीत आलांत, तद्वतच माझ्यामागेंही हा स्वराज्याचा होत चाललेला उत्कर्ष कायम राखण्याचे कामीं सतत झटा. ह्मणजे, आजपर्यंत सर्वांनीं काढिलेल्या दुःखांचा शेवट खरोखर गोड होईल. एखादें राज्य संपादण्यास जितका यत्न व जितका खटाटोप करावा लागतो, त्या तोलाचेच किंबहुना त्यापेक्षां जास्त परिश्रम संपादिलेल्या राज्यरक्षणाचे कामीं करावे लागतात, हें तुह्मी जाणतच आहा. जितका व्याप तितका ताप. ह्या जगांत मनुष्याच्या आंगीं जसजसा मोठेपणा येतो, तसतशी त्याची जबाबदारीही वाढत जाते. '**ऐरावती रत्न थोर । त्यासि अंकूशाचा मार**' हें महानुभावांचें वाक्य कधींही विसरतां कामा नये. कोणतीही गोष्ट जोडावयास वर्षाचीं वर्षें लागतात, पण मोडावयास घटकाही लागत नाहीं, असें ह्मणतात तें कांहीं खोटें नव्हे. ऐश्वर्यानें मदोन्मत्त होऊन हिंदुधर्माचा उच्छेद करूं पाहणाऱ्या

अविंधांची पुरी रग जिरवून **महाराष्ट्रांत** हिंदुपदपादशाहीची उभारणी करण्याचे कामीं **थोरल्या महाराजांस** केवढा भगीरथ प्रयत्न करावा लागला बरें!! पण, **संभाजी महाराजांच्या** कारकीर्दींत वडिलांनीं घालून दिलेला राज्यव्यवस्थेचा व नीतीचा पाया ढांसळतांच, इतक्या कष्टानें संपादिलेली राजसत्ता लयास जाण्यास पुरतीं दहा वर्षें सुद्धां लागलीं नाहींत. तेव्हां, **धनाजी संताजीं**सारख्या वीरांच्या आणि **रामचंद्रपंतां**सारख्या शहाण्या पुरुषांच्या करामतीनें आज जेवढी सत्ता आपल्या हातीं आली आहे, तेवढी फार हुषारीनें संभाळून पुढें ती हळूहळू वाढविण्याविषयीं यत्न करीत जा.

**महाराज** शहाणे, सुस्वभावी, धोरणी, गुणज्ञ व हुषार आहेत. तथापि, त्यांच्या हातून प्रजेचें योग्य रीतीनें पालन करवून राज्याची वृद्धि करण्याविषयीं व स्वकीयांचें यश त्रिभुवनांत गाजविण्याविषयीं, तुह्मांसारख्या विश्वासू, कुलीन, स्वामिकार्यदक्ष व राजनीति जाणणाऱ्या पदरच्या मंडळींनीं सतत जपलें पाहिजे. कारण, धनी कितीही सुजाण असला, तरी पदरच्या मंडळींनीं एकोप्यानें वागून हरएक बाबतींत त्याला योग्य मसलत दिल्यावांचून कोणतेंही राज्य किंवा कारभार सुरळीत चालत नाहीं. ह्मणूनच, विचारी, निस्पृही, कार्यकर्ते व विश्वासू असे गुणिजन पदरीं असणें हीच राजांची मुख्य संपत्ति, असें मानिलें आहे. ज्ञानी जनास मनानें दिसतें; प्राकृत जनांस चर्मचक्षूंनीं दिसतें; पण,

राजे लोकांस पदरचे लोक समजावितील तसें दिसतें. यासाठीं, जवळचे पारिपार्श्वक व कारभारी मंडळ हेंच राजांचे उपनेत्र होत. **समर्थांनीं** कथन केलेला **राजधर्म** व **सेवकधर्म** यांमध्यें जी नीति सांगितली आहे, किंवा **महाभारतांत शुक्रनीति, नारदनीति, विदुरनीति** इत्यादि जे राजनीतिपर ग्रंथ आहेत, त्यांत दाखविलेल्या मार्गाप्रमाणें **महाराज** व तुह्मी वागत गेलांत, ह्मणजे थोडक्याच कालांत शत्रु पादाक्रांत होऊन स्वराज्याचा उत्कर्ष होईल.

दुधाची इच्छा करणारास गाईची कांस छेदून ज्याप्रमाणें कधींही दूध मिळत नाहीं, त्याप्रमाणें राजनीती सोडून अन्यायानें प्रजेस पीडा देणाऱ्या राजास सुखोत्पत्ति व्हावयाची नाहीं. राजानें यत्नेंकरून आपली सत्ता वाढविण्याचा निरंतर यत्न करीत असावें. यत्नावांचून केवळ प्रारब्धानें कोणताच अर्थ सिद्ध होत नाहीं. यत्नेंकरून कार्योत्पत्ति झाल्याशिवाय दैव समजत नाहीं; याकरितां यत्नच श्रेष्ठ होय. ज्या कामास जें साहित्य पाहिजे, त्याची पूर्वींपासूनच तरतूद ठेवण्याविषयीं सावध असावें. नाहींपेक्षां, कार्य शेवटास न जातां उलटा त्रास मात्र होतो. **कुऱ्हाडीच्या घायाप्रति तरु जसा कां तुटतसे। अहा आयुष्याचे दिन रजनि घायें स्फुटतसे ॥** असें थोराचें वाक्य आहे. तें लक्षांत ठेविलें ह्मणजे हयगयीनें आजचें काम उद्यावर टाकण्याविषयीं कधींही मनाची प्रवृत्ति होत नाहीं. '**रात्र थोडी, पण सोंगें फार.**' या शता-

वधि आयुष्यामध्यें आपल्यास अनेक कामें करावयाचीं असतात. ह्यासाठीं, क्षणहीं फुकट दवडूं न देतां सतत उद्योग करीत असणें हेंच प्रत्येक जिवाचें कर्तव्य आहे. आतां, कित्येक कामें उद्योग केल्यावांचून काळेंकरून आपोआप साध्य होणारीं असतात. पण, तींच आज कितीही उद्योग केला, तरी साध्य होत नाहींत. तर, तशा कामांत हात घालण्यापूर्वींच विचार करावा. जो पदार्थ आपल्यास खावयास योग्य, जो खाल्ला असतांही आपणास जिरविण्याची आंगीं शक्ति आहे, व जो जिरला असतांही शरीरास अपकार न करितां उपकारच करील, तो केव्हां ही भक्षावा.

ज्या कुळांत उत्तम आचरण आहे, तेथें संपत्ति नसली तरी तें कुल श्रेष्ठ होय. द्रव्यानें हीन झाला, तो हीन नव्हे. तर, आपलें कर्तव्य विसरून, आपल्या कुळाची थोरवी विसरून, व सदाचाराचा त्याग करून जो हीन होतो, तो मात्र खरा हीन होय. मनुष्यानें निराश होऊन किंवा रागाच्या स्वाधीन होऊन कधींही आंगीं संताप करून घेऊं नये. कारण, संतापापासून शरीरसंपत्तीचा नाश होऊन आंगीं आधिव्याधि जडतात. जें साध्य होण्यासारखें असेल, तें प्रयत्नानें संपादावें. पण, जें उद्योगानेंही प्राप्त होत नाहीं, अशा विषयीं संताप किंवा खेद केल्यानें आंगचा उत्साह नाहींसा होऊन, पुढें कोणतेंही कार्य करण्याचें सामर्थ्य किंवा हौस रहात नाहीं. पुढें येणाऱ्या दुःखास जो आजपासून उपाय करितो, एकवार प्राप्त झालेलें दुःख

भोगिल्यावांचून सरत नाहीं असें जाणून तें निमूटपणें सोशितो, व एकवार भोगिलेल्या दुःखाचा अनुभव न विसरतां तसा प्रसंग पुनः न येऊं देण्याविषयीं सार्व काल जपत असतो, त्याला कोणत्याही कामांत यश-प्राप्ति झाल्यावांचून रहात नाहीं.

पदरच्या लोकांचा व प्रजेचा संतोष राखण्याचें नित्य धोरण ठेवावें. कारण, पदरचे लोक व प्रजा राजी असेपर्यंत राज्यावर कितीही व कसलींही संकटें आलीं, तरी राजाला भिण्याचें कारण असत नाहीं. ' **मनुष्य राजी राखणें । हींच भाग्याचीं लक्षणें । कठीणपणें दूरी धरणें । कांहींएक ॥** ' असें ह्मटलें आहे. लोकांना राजी राखण्याचे उपाय अनेक आहेत. पण त्यांत, ' **अडलें गांजिलें जाणावें । यथाशक्ति कामास यावें । मृदुवचन बोलत जावें । समस्तांसीं ॥** ' या रीतीनें वागत गेलें, ह्मणजे लोक पाहिजे तीं कामें करण्यास तयार असतात. फुकाच्या एका सुखाच्या शब्दाची किंमत लाख रुपयांहूनही जास्त आहे. ह्मणून पदरच्या लोकांकडून गोडीगुलाबीनें कामें घेऊन त्यांस शाबास ह्मटलें कीं, राजसेवेंत नेहमीं तत्पर रहाण्याविषयीं त्यांच्या आंगीं जास्त उमेद चढते. पदरच्या लोकांच्या हातून अजाणपणें एखादी चूक झाल्यास एकदम त्यांजवर न घसरतां, प्रथम त्यांस त्याबद्दलची क्षमा असावी. कारण, थोरांस क्षमेसारखें दुसरें भूषण नाहीं.

शत्रु प्रबल असो किंवा दुर्बल असो, त्याची उपेक्षा

न करितां सदोदित त्याच्या नाशाविषयीं दक्षतेनें उद्योग करीत असावें. कारण, '**वैरी थोर अथवा मानु । ययासि यत्नें जागिजे सावधानु । काळ सर्प कीं हुताशनु । वाढल्या सर्वथा नावरे ॥**' असें ह्मटलें आहे. धनुष्यबाण हेंच क्षत्रियांचें दैवत; व युद्धांत पराभव पावून पाठ दाखविणें, हाच त्यांचा मृत्यु. '**जयासि जिवाचे वाटे भय । त्यानें क्षात्रधर्म करूं नये । कांहीं तरी करोनि उपाय । पोट भरावें ॥ १ ॥ विन्मुख मरणीं नरक होती । वांचून येतां मोठी फजीती । इहलोक परलोक जाती । पहानाकां ॥ २ ॥**' हा समर्थांचा उपदेश क्षत्रियांनीं अंतःकरणपटावर सतत रेखून ठेवावा. आपल्या राज्यांत छिद्र ह्मणजे शत्रूंना हात घालितां येईल असा कमीपणा कोणता आहे, प्रजा सुखी आहे किंवा नाहीं, प्रजेला न आवडणारा एखादा अधिकारी किंवा जेणेंकरून प्रजाजन आपल्यास दोष देईल असें एखादें व्यसन आपल्या आंगीं आहे किंवा काय, ह्याचा राजानें सदोदित विचार करावा. गरोदर स्त्रीस एखादा पदार्थ प्रिय असला, तरी तो गर्भास पीडा देणारा असल्यास ती स्त्री त्या प्रिय पदार्थाचाही त्याग करून जसें गर्भाचें रक्षण करिते, त्याप्रमाणें राजानें एखादा सेवक, कामदार किंवा एखादें व्यसन आपल्यास प्रिय पण प्रजेस अप्रिय असेल, तर त्याचाही त्याग करून प्रजेच्या हितासाठीं प्राणापेक्षां जास्त जपावें, अशी राजनीति आहे.

स्त्रिया, द्यूत, पारध किंवा मद्यपान यांचे ठायीं लंपट होणें, लहान अन्यायास मोठी शिक्षा देणें, राज्यवैभवानें धुंद होऊन नीति सोडणें, आणि मूर्ख, चेंगट, आळशी व खुशामती लोकांच्या मसलतीनें वागणें, ह्या गोष्टी राज्यनाशास कारण होतात; तेव्हां, शहाण्यानें त्यांपासून नेहमीं दूर रहावें. निरंतर गोड बोलणारे पुष्कळ मिळतील; परंतु, कडू बोलून आपल्या बऱ्याची गोष्ट सांगणारा व ऐकणारा हे दोन्ही दुर्मिळ होत. एखादी हिताची गोष्ट कमी योग्यतेच्या मनुष्याच्या तोंडून निघाली, तरी ती ग्रहण करावी. सत्पात्र पाहून जें देणें तें द्यावें. लोकांनीं विश्वास ठेवावा, असें आचरण ठेवण्याविषयीं थोरांनीं सदोदित जपावें. ज्याचें मन सरळ, भाषण मृदु व आंगीं कर्तृत्व असतांही ज्याची वृत्ति शांत, अशा पुरुषास शिष्टही मान देतात. सदाचरणानें धर्म समजतो, भयप्राप्तीचे वेळीं शौर्याची खरी पारख होते, दारिद्र्यांत धैर्य कसास लागतें, व संकटसमयीं मित्राची परीक्षा होते. शीत, उष्ण, मानवरी किंवा गरीबी, भय किंवा प्रीति, यांपासून जो आपल्या कार्यास कधींही विघ्न होऊं देत नाहीं, तोच खरा धैर्यवान. पक्का विचार केल्यावांचून कोणतेंही काम हातीं घेत नाहीं, व एकवार आरंभिलेलें कार्य शेवटास नेल्यावांचून ज्याला चैन पडत नाहीं, त्याजपुढें **ऋद्धिसिद्धि** सदोदित हात जोडून उभ्या असतात.

जे सेवकजन धन्याचें मनोगत जाणून सर्व कार्यें निरालस्यपणें करितात, ते धन्याच्या प्रेमास पात्र हो-

तात इतकेंच नव्हे, तर त्यांची एकनिष्ठ सेवा त्यांना परलोकचें साधन करून देण्यासही समर्थ होते. याकरितां धन्यानें केलेल्या उपकारांचें स्मरण ठेवून त्यांच्या दौलतीसाठीं, लौकिकासाठीं, व प्राणासाठीं सेवकांनीं सतत जपावें. प्रसंगोपात् धन्याचा कोप झाला असतांही, त्याजविषयीं कुडा भाव मनांत न आणितां, हमेषा त्याचा उत्कर्षच इच्छीत जावा; ह्मणजे, आपली सहनशीलता व चांगुलपणा धन्याच्या मनांत भरून तो कृपा केल्यावांचून राहत नाहीं. धन्याच्या हातून एखादी अन्यायाची गोष्ट घडत असेल किंवा गैरसमजुतीमुळें राजनीतीचें उल्लंघन करण्याविषयीं त्याचें मन वाहीलें, तर त्या वेळीं अमुक गोष्ट अशी आहे, असें निस्पृहतेनें सांगण्याविषयीं पदरच्या मंडळींनीं व सेवक जनांनीं कधींही मागें सरूं नये. कारण, यजमानाचा रोष होईल या भीतीनें पदरच्या मंडळींनीं जर ती गोष्ट गुप्त राखिली, तर त्यांच्या हातून धन्याचें अकल्याण झाल्यासारखें होतें. धनी जे नियम घालून देईल त्याप्रमाणें वर्तून विश्वासानें स्वामिसेवा करीत जावी. "**कार्य करितां कांहीं न मागे ॥ तयाची चिंता प्रभूसि लागे ॥ ऐसें विवेक जागे ॥ ह्मणिजे बरें ॥ १ ॥ समर्थाचे मनोगत ॥ तैसेच वर्तणें उचित ॥ तेथें चुकतां आघात ॥ नेमस्त आहे ॥ २ ॥ सेवक तोचि अडेना ॥ शब्द भुईस पडेना ॥ काम चुकलें हें घडेना ॥ कदाकाळीं ॥ ३ ॥ आपस्वार्थ उदंड करणें ॥ आणि स्वामिकार्य बुडविणें ॥**

**ऐसीं नव्हेचि कीं लक्षणें ॥ सेवकांचीं ॥ ४ ॥**
**स्वामींनीं जें जें बोलावें ॥ तेंचि सेवकीं प्रतिष्ठावें ॥**
**वेळ चुकवूनि बोलावें ॥ विनित होउनी ॥ ५ ॥"**
अशा प्रकारें **समर्थांनीं** सेवाधर्माचीं लक्षणें सांगितलीं आहेत, तीं लक्षांत ठेवा.

आतां शेवटीं एवढेंच सांगावयाचें कीं, '**शक्तिः संघे कालियुगे**' हीं बावन्नकशी सोन्याचीं अक्षरें सदासर्वदां चित्तांत वागवून तदनुसार वर्तत जा. एकीचें बळ मोठें आहे. जमिनींत लांबवर मुळें गेलेला व मोठा बळकट असा जरी वृक्ष असला तरी, तो एकच असला कीं मोठा वारा त्याचा क्षणांत नाश करूं शकतो. परंतु, जे अनेक वृक्ष एकमेकांच्या आश्रयानें एकत्र असतात ते लहान असले, तरी झंझावातास देखील तिलमात्र भीत नाहींत. तेव्हां सर्व एकदिलानें वागून स्वामिकार्याची चाड धरा. आज ह्या प्रसंगीं **संताजी** व **धनाजी** हे उभयतांही जवळ नाहींत, हें पाहून मनाला फार वाईट वाटतें; पण, उपाय नाहीं. त्यांनाही माझी शेवटची विनंति कळवा, आणि त्या दिलदार व स्वराज्याविषयीं पूर्ण अभिमानी पुरुषांस हातीं धरून ज्याप्रमाणें आजपर्यंत मी कार्य करीत आलों, तद्वतच **महाराज** व तुह्मी पुढें वागा. ह्मणजे, ते **अहीमही** आपल्या अलौकिक सामर्थ्यानें शत्रूंस रसातळीं गाडून स्वराज्याचें यश संपूर्ण दुनियेंत गाजवितील. आतां माझ्यानें फार बोलवत नाहीं.

या प्रमाणें उपदेश करून **प्रल्हादपंतांनीं** सर्वांस

निरोप दिला. पुढें दोन चार दिवस लोटतात, तों निर्वाणीचा प्रसंग दिसूं लागला. हळूहळू शरीराचे सर्व व्यापार बंद पडत जाऊन प्रल्हादपंत इकडचें सर्व ध्यान विसरले. नाडी पाहून वैद्यानें सांगितलें कीं, आतां घटका पळें जातील तीं खरीं. तेव्हां, महाराज व बाकीची सर्व मंडळी जवळ येऊन बसली. घरघर लागलीच होती; ती कमी कमी होत जाऊन शेवटीं त्या निर्दय मृत्यूनें प्रल्हादपंतांवर झडप घातली. हाय हाय!! हा वेळपर्यंत स्वदेश व स्वराज्य यांच्या सेवेंत निरपेक्ष बुद्धीनें देह झिजविणारे प्रल्हादपंत गेले! नाहींसे झाले!! '**भला रे भला बोलती तें करावें ॥ बहूता जनांचें मुखें यश घ्यावें ॥ परी शेवटीं सर्व सोडूनि जावें ॥ मरावें परी कीर्तिरूपें उरावें ॥**' या समर्थांच्या उक्तीप्रमाणें इहलोकचा क्षणिक व्यापार आटपतांच, अक्षय्य कीर्तीस मागें ठेवून त्यांनीं परलोकची वाट धरिली.





# भाग १६ वा.

——o:o——

भर्तुर्ये प्रलयेऽपि पूर्वसुकृता संगेन निसंगया ।
भक्त्या कार्यधुरं वहन्ति कृतिनस्ते दुर्लभास्त्वादृशाः

वीरकुलावतंस शिवछत्रपतींनीं महाप्रयासें करून उभारलेली स्वराज्याची इमारत त्यांच्या मागें रसातळास चालली असतां तिला टेंका देऊन सांवरणाऱ्या, आणि आपल्या दृढनिश्चयानें, बुद्धिमत्तेनें, व अलौकिक गुणांनीं जगाच्या स्तुतिस्तोत्रास पात्र झालेल्या प्रल्हादपंतांवर एकाएकीं काळानें झडप घातल्यामुळें, महाराष्ट्र कुटुंबांतील आबालवृद्धांचीं अंतःकरणें विव्हल होऊन गेलीं. वास्तवीकच आहे. साधारण एका दहा पांच मनुष्यांच्या कुटुंबांतील कर्ता पुरुष गत झाला, तर त्या कुटुंबावर दुःखाचा डोंगर कोसळतो. मग, स्वदेशबांधवांचें जें दुःख तेंच आपलें दुःख, व त्यांच्या सौख्याची अभिवृद्धि तोच आपला संतोष असें मानून त्यांच्यासाठीं ज्यानें अनेक कष्ट सोशिले, आणि कठीण प्रसंग प्राप्त झाला असतां सर्वांस धैर्य देऊन स्वराज्याच्या संरक्षणार्थ व उन्नत्यर्थ रात्रंदिवस आपला देह झिजविला, त्या चतुर मुत्सद्याचें मृत्युवृत्त कोणाच्या शोकास बरें कारण होणार नाहीं? स्वराज्याची खरी कळकळ बाळग-

णारा व तत्संबंधानें अंतःकरणास पीळ देऊन काया-वाचामनें झटणारा **प्रल्हादपंतांसारखा** पुरुष आपल्या देशाच्या इतिहासांत खरोखरच विरळा. त्यांना लहान-पणापासूनच वडिलांच्या हाताखालीं सद्बोधाचें व राज-नीतीचें शिक्षण मिळालें असल्यामुळें दप्तरी जमाखर्च, दरबारी कामकाजासंबधीं माहिती, कार्यकुशलपणा, हरएक कामांत धिमेपणानें वागण्याची संवय, थोरप-णाची चाड, स्वराज्याचा अभिमान, व हातीं घेतलेलें काम निश्चयानें शेवटास नेण्याची हुरूप इत्यादि सद्गु-णांचीं तत्वें त्यांच्या कोमल मनावर पूर्णपणें उमटलीं होतीं. '**ऐका सदैवपणाचें लक्षण ॥ रिकामा जाऊं नेदी क्षण.**' या सत्पुरुषाच्या वाणीस अनुसरून सदो-दित त्यांचा वर्तनक्रम असे. बोलल्याप्रमाणें चालण्या-विषयीं ते फार खबरदारी बाळगीत. कारण, लोकांचा आपणावर विश्वास बसावा असें ज्याच्या मनांत असेल त्याच्याठायीं निरपेक्षबुद्धि, व '**बोले तैसा चाले**' एवढी सामुग्री असली, ह्मणजे तिच्या जोरावर मोठ-मोठीं कष्टसाध्य कामें ही त्याच्याहातून हाँहाँ ह्मणतां पार पडतात, हा सिद्धांत त्यांच्या अंतःकरणपटावर उत्तम रीतीनें रेखिला गेला होता. वडील जिवंत असतां, **शिवाजी महाराजांच्या** वेळीं **गोंवळकोंडकरांच्या** पदरीं ते कांहीं दिवसपर्यंत **वकील** होते. **संभाजीच्या बेबंदशाहींत, प्रल्हादपंतांच्या** आंगच्या खऱ्या गुणांची पारख करणारा कोणी नसल्यामुळें ते जरी उदयास आले नव्हते, तथापि पुढें वेळ येतांच त्यांचा पूर्ण वि-

कास होऊन आह्मां महाराष्ट्रियांचा यशोदुंदुभी भरतखंडभर गाजण्यास तेच त्यांचे अलौकिक गुण कारणीभूत झाले, यांत संशय नाहीं. प्रल्हादपंतांच्या वागणुकीचे नियम फार सचोटीचे असत. धन्याचें कल्याण व मराठी राज्याचा उत्कर्ष एवढाच त्यांचा हेतु असल्यामुळें, 'हे तो सत्पुरुष स्वकार्य सजिती, अन्यार्थही साधिती' या वामन पंडिताच्या उक्तीप्रमाणें स्वसुखास लाथ मारून त्यांनीं एकनिष्ठपणें जन्मभर स्वराज्याची सेवा केली, व मानवजन्मास भूषणप्रद अशी जी अक्षय्य कीर्ति ती संपादिली. तेव्हां, अशा लोकोत्तर पुरुषाचें सतत् स्मरण ठेवणें व त्याचे गुणानुवाद गाणें हें आमचें कर्तव्य असल्यामुळें, त्यांच्या अकालिक मृत्यूबद्दल पुनः एकवार शेवटचे दुःखाश्रु ढाळून आतां आपल्या पुढील कार्यभागाकडे वळूं.

मराठी राज्यांतील खरे मुत्सद्दी प्रल्हादपंत मरण पावले ही वार्ता शत्रूंस समजतांच, आतां मराठ्यांस धुळीस मिळविण्यास क्षणाचाही अवकाश नको, असें औरंगजेबास वाटलें. कारण, प्रल्हादपंत जिवंत असेपर्यंत त्यांच्या दूरदर्शीपणामुळें व शहाणपणामुळें मोंगलांचें कोणतेंही कारस्थान शेवटास न जातां, काशिमखानासारखे पराक्रमी सरदार प्राणास मुकून कर्नाटकांत व महाराष्ट्रांत मराठ्यांच्या सत्तेचें पाऊल पुढें पडत चाललें होतें. तेव्हां मराठी राज्याचा स्तंभ नाहींसा होतांच, आतां जिंजी सर करून क-

र्नाटकांतील मराठ्यांचें बंड मोडण्यास हाच समय योग्य आहे असा विचार करून बादशहा त्या तजविजीस लागला. परंतु, जिंजी सर करण्याचें काम झुलफिकारखानावांचून दुसऱ्यांच्या हातून शेवटास जावयाचें नाहीं असें बादशहास वाटून, त्यानें त्या सरदाराची एकांतीं गांठ घेतली; व त्याच्या मनांतील वैपम्य नाहींसें होईल अशा रीतीनें त्याची समजूत केली.

औरंगजेबः—झुलफिकारखां जबके तुझे मुलुके कर्नाटकमे हुजूरे आलीमे तलबी हुई, मालुम होतां है के उन दिनोंसे तुह्मारी मिजाजेमे आजुर्दगी आगई है शायद. सचहै के, कैएक वाकेआते रूदाद होनेके बाइस हमे ऐसा करनाही लाजीम था. सरकारी दामने हुकूमतमे कै सरदार रहते है; लायकिन इनको बनिसबत खुरबत ओ मुसाहिबत तुमारे हसद आता है, तो इनका जामेदिलावरी दूर होनेकेलिये, और मोकाबेले आदूमे कैसी कैसी मोहिम्मात वो मुशकिलात पेश आते हैं, इसकी कदर इनको खूब मालुम होजाय. तुह्मारी मुलके मऱ्हेटोंसे बाजगस्ती करानेमे शरीरोंकी पायमाली ताई हुई नही. अगरचे सची जानफिशानी वो कामरानी वेदुन इज्जत वो ताजीम हांसिल होतीही नही? और जिसके वजूद नाबूदमे ये खुबी मफकूद होय, फेर साहिबानें आली हिंमत वो जी हिकमतकी जनाबमे बदगोई करनी ऐन नादानी है. इसका वकूफबखूबी जाहिर हो चुका बेहत्तर हुवा. बाइस यहांसे ऐसोंकी

दिलमे जो शरारत समाईथी, इसको आपने खियालि खामसे दूर करके आपने आपने कारखाईपर हमेश चुस्त वो चालाख रहें. जबतो इनदिनो खतशाते गुजस्तापर न नजर करते तुम जिंजी किलेकी चढाई और मऱ्हेटोंपर फतेयाबीकी नंगवआर आपनेपर जरूरतर जाने एही तमन्नाये बादशाही है. प्रल्हादपंतके मरनेके बाइस मऱ्हेटोंकी रंजीदगी और गमगीनी अजहद है, ऐसे कावू दस्तयाबमे इनपर हमला करना और शिकस्त देना एही वख्त हैं; फिरतो बगैरे तकामुलके जानीब कर्नाटक राही होनेपे मुस्तइद होजाव. ए कै मुद्दतसे बादशहा सलामतकी इरादेका मुद्दुआ बरामदनीकेलिये तुह्मारे जैसे दानिशमंदपरही मौकूफ है.

[ झुलफिकारखान, तुह्मांस कर्नाटकांतून परत बोलविल्यापासून तुमचें मन उदास झालें आहे, हें मी जाणतों. परंतु, कांहीं कारणाकरितां नाइलाजास्तव मला तसें करणें भाग पडलें. माझ्या हाताखालीं इतके सरदार असतां त्या सर्वांपेक्षां तुह्माविषयीं माझ्या मनांत जी विशेष पूज्यबुद्धि व दृढविश्वास वागत होता व वागत आहे, त्याविषयीं कित्येकांच्या मनांत मत्सर उत्पन्न झाल्यामुळें, त्यांचा भ्रम दूर करण्यासाठीं जिंजीहून परत बोलावून मराठ्यांसारखे कावेबाज शत्रु जिंकण्याचें काम किती कठीण आहे, हें त्यांचे प्रत्ययास आणून दिलें. आतां, त्याच्यायोगानें शत्रु आजपर्यंत पादाक्रांत व्हावयाचे ते जरी झाले नाहींत, तथापि खऱ्या गुणावांचून प्रतिष्ठा किंवा मान मिळत नाहीं,

व स्वतांच्या ठायीं तसे गुण नसतां खऱ्या गुणी मनुष्याविषयीं हेवा करणें यासारखें मौर्ख्य दुसरें कोणतेंच नाहीं, हें त्या सरदारांच्या अनुभवास येऊन चुकलें, ही गोष्ट एका प्रकारें बरीच झाली ह्मणावयाची. कारण, इतःपर त्यांच्या मनांत अशा कोणत्याही कुकल्पनेची बाधा न होतां ते आपआपलीं कामें लक्षपूर्वक करतील. तेव्हां, आतां झालेल्या गोष्टीबद्दल कांहीं एक मनांत न आणितां **जिंजी** सर करून शत्रूंस **कर्नाटकां**तून बांधून आणण्याविषयीं तुह्मी पूर्वींप्रमाणें ईर्षा धराल, अशी उमेद आहे. **प्रल्हादपंतां**च्या मरणानें बहुतेक मराठे ह्या वेळीं अगदीं हवालदिल असल्यामुळें, त्यांजवर चालून जाण्यास हा समय योग्य आहे. तर दिवसगत न करितां एकदम **कर्नाटकीं** जाण्याची तयारी करा. हीं फार दिवसांपासून **बादशहा**च्या मनांत असलेली कामगिरी बजाविण्यास तुह्मांवाचून दुसरा कोणताही सरदार समर्थ नाहीं, हें मी बोलून दाखवावयास नको. ]

**झुलफि०**:—जहापन्हा, ये **झुलफिकारखां** मुतीये फरमान है. किसीही कामपे जो फरमान आलीशान होता है, उसके बजावरीमे बसरोचश्म बेतअम्मुल हमातनसे हाजीर रहेने, और जानफिशानी करने, और **मोंगलों**की खैरख्वाही करने इसी अमरको आपना आदतो पेशाही समजताहै. फिरतो हुकूम फर्मानेमे क्या ताखीर है ? **कर्नाटक**से बापस्सतलबी होनेके बाइस बंदेको बिलकुल अंदेशाही नहींहै. हरएक वजेसे

**शरीरों**की शिकस्त व नाबूदी होनी और **दखन**पे फतहयाबी और काबीज होजाते, बहुती खूब होता. येतो कुजा; बलके उलटे **मऱ्हेटों**की शुशेनशानी **कर्नाटक**मे नमूद होना और **बादशाही** फौजका और **नजीबखान** जैसे सरदारकी बाजगश्ती कराके **कामबक्ष**पर यूरिशलाके फरार दिया, इस्से निहायत रंजीदगी मालुम होती है. हां, जो गुजरा गुजरा; उसकी क्या परवा? **जिंजी** फते होकरके **मऱ्हटे** गिरफतार होजाना, **बादशहा जमजा** इसकी बिलकुल फिकर न करनी चाहीये. ये **झुलफिकारखां** ता व **कर्नाटक** पोंचनेकीही मोहलत.

[ **सरकार**, हा **झुलफिकारखान** हुकुमाचा बंदा आहे. कोणतीही कामगिरी बजावण्याविषयीं एकवार आज्ञा झाली, ह्मणजे ती शेवटास नेण्याच्या कामीं जिवाचीही पर्वा न बाळगतां झटणें, व **मोंगलराज्याच्या** अभिवृद्धीसाठीं रात्रंदिवस यत्न करणें, हेंच आपलें कर्तव्य असें हा समजतो. मग आज्ञा करण्याविषयीं मनांत इतका संकोच तो कां? **कर्नाटकांतून** परत बोलाविल्यामुळें मला वाईट वाटण्याचें मुळींच कारण नाहीं. कोणत्याही रीतीनें शत्रूंचा नाश होऊन **दक्षिण** जिंकण्याचा सरकारच्या मनांतील हेतु साध्य झाला असता, ह्मणजे बस होतें. पण, तसें न होतां उलट **मराठ्यांचा** सुळसुळाट **कर्नाटकांत** जास्त माजत जाऊन त्यांनीं **बादशाही** फौजेचा आणि **नजीबखानासारख्या** सरदाराची दुर्दशा उडवून **कामबक्षास** मागें पिटाकून ला-

विलें, ह्याबद्दल मात्र मोठी दिलगिरी वाटते. परंतु झाल्या गोष्टीस इलाज नाहीं. **जिंजी** सर होऊन **मराठे** कसे हातीं लागतील, ह्याविषयीं आतां खुदावंत **बादशहानें** मुळीच काळजी करूं नये. हा **झुलफिकारखान कर्नाटकीं** पोंचण्याची मात्र फुरसत.

याप्रमाणें उभयतांचीं भाषणें होऊन, ज्या कामगिरीच्या पायीं त्या मानी सरदाराचा अपमान झाला होता ती परत हातीं येतांच, तो चाळीस हजार फौजेनिशीं **कर्नाटकीं** जावयास सिद्ध झाला. बरोबर **दाउदखान** व **सर्जेखान** ह्या उभयतां सरदारांस घेतलें. मजल दर मजल करीत त्यांनीं **जिंजी** गांठिली, व किल्ल्यास एकदम वेढा दिला. ह्यावेळीं **धनाजी महाराष्ट्रांत** व **संताजी कृष्णे**च्या उत्तर भागीं आपापल्या फौजांसह मुलूख काबीज करण्यांत गुंतले असल्यामुळें, **जिंजी**च्या किल्ल्यावर **मराठ्यां**ची पांच सात हजारच फौज होती. त्यांतून **प्रल्हादपंतां**विषयींच्या दुःखानें किल्ल्यावरील बहुतेक मंडळी उदासीन होऊन पुढील व्यवस्थेच्या विवंचनेंत असतां हा शत्रूंचा एकाएकीं वेढा येऊन पडल्यामुळें, **राजाराम महाराज** व पदरचे एकंदर लोक घाबरून गेले. शत्रूंनीं तर चोहोंकडे कडेकोट बंदोबस्त करून हल्ल्याची तयारी चालविली. तेव्हां अशा बिकट प्रसंगीं काय तजवीज करावी याविषयीं **महाराजांनीं** किल्ल्यावरील प्रमुख व शहाण्या लोकांची मसलत घेऊन शत्रूंशीं तहाचें बोलणें लाविलें. पण **झुलफिकारखान** तह करण्यास कबूल होईना. 'ह्यावेळ

किल्ला सर न करितां तह केल्याचें वर्तमान **बादशहा-च्या** कानीं गेल्यास सरकारची मर्जी खप्पा होऊन स्वतः **औरंगजेब** सर्व सैन्यासहवर्तमान **कर्नाटकीं** उतरल्या वांचून राहणार नाहीं. तर तुह्मी चार दिवसांचे आंत काय तो आपला विचार करा. पांचवे दिवशीं किल्ल्या-वर तोफ सुरू होईल' असें **महाराजां**कडून गेलेल्या वकीलास **खानानें** सांगितलें. तेव्हां, शत्रु तर तह क-रण्यास कबूल नाहींत व **धनाजी, संताजी** वगैरे सर-दार आपल्या मदतीस येऊन पोंचेपर्यंत किल्ल्यावरील लोकांचा निभाव लागणें कठीण, असें पाहून **खंडोब-ल्लाळानें महाराजांस** मसलत सुचविली कीं, चाळीस हजार **मोंगलां**बरोबर लढून किल्ल्यावरील लोकांची व्यर्थ प्राणहानि करण्यापेक्षां **शत्रूंनीं** हल्ला केला नाहीं तोंपर्यंतच, कांहीं युक्तीनें येथून बाहेर पडण्याची तजवीज करावी. ह्मणजे **खानाच्या** शब्दास मान दिलासें हो-ऊन, आज किल्ला जरी शत्रूंनीं सर केला, तथापि मागें पुढें तो आपल्यास सहज घेतां येईल. **खासा** स्वारी बाहेर पडून **महाराष्ट्रीं** गेल्यावर मागाहून शत्रूंनीं किल्ला जरी सर केला, तरी चिंता नाहीं. इतर मंडळींची व्यवस्था कशीही करितां येईल. या मसलतीस सर्वांचें अनुमोदन मिळतांच **खंडो बल्लाळ** पुढील उद्योगास लागले. **मोंगलांच्या** पदरीं **शिर्के** व **मोहिते** नांवाचे जे **मराठे** सरदार होते, ते ह्या वेळीं **झुलफिकारखा-नाबरोबर** आले असून त्यांची किल्ल्याच्या वायव्येक-डील मोर्चेबंदीचे कामीं नेमणूक आहे, असा त्यानें तपास

काढिला. पुढें, त्यांना वश करून घेतल्यास आपल्यास पाहिजे तें करितां येईल, असें समजून **खंडोपंत** त्याच दिवशीं रात्रीं पाळण्यांत बसून तटाखालीं उतरले. **शिर्क्यांच्या** तंबूसभोंवतीं **मराठी** शिपायांचा पाहरा असल्यामुळें, त्या सरदारापाशीं **खंडोपंताची** वर्दी पोंचण्यास फारसे प्रयास पडले नाहींत.

भेटीअंतीं **गणपतरावानें खंडो बल्लाळास** 'तुह्मीं एवढ्या रात्रीं येथें कसे आलांत, व असा वेष पालटून येण्याचें कारण काय, वगैरे हकीकत पुसली. **संभाजी** जिवंत असतां त्यानें **शिर्के** कुलाचा अतिशय छळ करून त्यांतील बहुतेक पुरुषांस यमसदनीं पाठविल्यामुळें आपली विनंति **गणपतराव** व **राणोजी** या उभयतां बंधूंस कशी मान्य होते व आपला कार्यभाग कसा शेवटास जातो, ही भीति **खंडोपंतांच्या** मनांत होतीच. तरी, त्यांच्या पाठीशीं पडून आलेलें संकट टाळण्याचा यत्न केल्यावांचून दुसरा मार्गच नसल्यामुळें, **खंडोपंतांनीं** ती सर्व भीति एकीकडे ठेवून धैर्यानें आपला हेतु **गणपतरावास** कळविला. तो ऐकतांच पूर्व गोष्टीचें स्मरण होऊन **राणोजी** त्वेषानें बोलला, "**खंडोपंत**, ज्या अधमाधम **संभाजीनें** आमच्या कुलाचें **शिर्कांण** करून आह्मांस अशा रीतीनें शत्रूंची सेवा पत्करण्याची वेळ आणिली, त्याच्या कुलाचें कल्याण व्हावें, अशी ह्या **शिर्केकुलांत** जन्म घेणाऱ्या पुरुषांची मनीषा कशी बरें वाहील, याचा तुह्मीच विचार करा. तर, तेवढी गोष्ट खेरीज करून बाकी स्नेहासाठीं आह्मी दुसरें

काय पाहिजे तें करण्यास सिद्ध आहों. पण, **भोंसले**कुलाची अभिवृद्धि आणि त्या कामीं आमचें साहाय्य, हे शब्द देखील तोंडावाटें काढूं नका." हें **राणोजी**चें रागाचें भाषण ऐकून **खंडोपंतां**चें मन अगदीं खिन्न होऊन गेलें. तरी त्यांनीं त्या उभयतां बंधूंस आपलेसे करण्याची होईल तितकी खटपट केली, व ईशकृपेनें तींत त्यांस यशही आलें.

**खंडोपंतः**–**राणोजी**, अमळ शांत व्हा. एखाद्या मनुष्यानें आपला नाहक छळ केला, ह्मणजे त्याविषयीं मनांत किळस व चीड उत्पन्न होऊन त्याचा सूड उगविण्याकडे बुद्धीचा कल वाहणें, हें स्वाभाविकच आहे. पण, कोणत्याही गोष्टीला वेळ ह्मणून आहे. तर, ती जाणून क्रोधाच्या स्वाधीन न होतां दूरवर दृष्टि पोंचविणाऱ्या मनुष्यांसच या जगांत थोर असें ह्मणतात. ज्या **संभाजी**नें आपल्या अमानुषकृतींनें सर्व **हिंदूं**च्या **हिंदुपणास** डाग लाविला, त्याला '**एका हातानें करावें व दुसऱ्या हातानें भरावें**' या ह्मणीप्रमाणें ईश्वरानें इहलोकींच योग्य शासन दिलें. मग, ती मागील गोष्ट आतां मनांत वागवून उपयोग काय? तुमच्या **शिर्काणा**च्या वेळीं आमच्या घराण्यांतीलही दोन तीन कर्तेपुरुष हत्तीच्या पायीं गेले. पण काय करणार? '**आपलेच दांत व आपलेच ओंठ.**' कांहीं जरी झालें, तरी ज्या **भोंसले** कुलांतील पुरुषांच्या अजब कर्तृत्वावर **मराठ्यां**चीं अनेक कुलें उदय पावलीं, व आपला **मायदेश क्रूर म्लेंछां**च्या तावडींतून सुटून आह्मां **महाराष्ट्री**यांस स्वातंत्र्यसुखाचा लाभ झाला, त्या

पूज्य व श्रेष्ठ कुलाकडे नजर पोंचविली पाहिजे. '**एकानें गाय मारिली, ह्मणून दुसऱ्यानें वासरूं मारणें**' हें योग्य नव्हे. तुह्मी विचारी आहांत.तेव्हां कोणतीही गोष्ट—

**राणोजीः**—**खंडोपंत**, आपण ह्मणतां, तें सर्व खरें. पण, तो समय मनांत आला ह्मणजे जीव कसा अगदीं संतापून जातो, व कोठलें **भोंसलेकुल** व कोठलें काय, असें होऊन जातें. **आबासाहेबांचे** आह्मां महाराष्ट्रीयांवर अनंत उपकार आहेत, व त्यांची फेड आमच्या हातून कधींही व्हावयाची नाहीं, हें मी जाणतों. परंतु, ज्याअर्थीं आह्मीं एकवार **शत्रूंची** सेवा पत्करिली आहे, त्याअर्थीं आतां तो भाग मनांत येऊनही व्यर्थच.

**खंडोपंतः**—मनुष्याला प्रसंगविशेषीं जरी भलत्या पुढें तोंड वेंगाडावें लागलें, हीनसेवा पत्करावी लागली, किंवा स्वतःचा पेशा टाकून अप्रिय मार्गाचें अवलंबन करावें लागलें, तरी खऱ्या कुलीन पुरुषांच्या अंतःकरणांतून बंधुप्रेम, स्वातंत्र्येच्छा, स्वराज्याविषयींचा अभिमान व तें स्थापन करण्यासाठीं ज्यांनीं आपल्या जीवाचे स्वधास्वाहाकार केले त्यांच्या कुलाविषयीं पूज्य बुद्धि हीं कधींही नाहींशी होत नाहींत. तेव्हां, या प्रसंगीं तुह्मी उभयतांही आपल्या कर्तव्यास जागून ह्या गरिबास यश द्याल, तर तुह्मींच आज **भोंसलेकुल** उदयास आणिलें असें होईल, व तुमची कीर्ति '**यावच्चंद्रदिवाकरौ**' स्वकीयांच्या मुखीं राहील.

**गणप०ः—चिटणीस,** काय करावें? **आबासाहेबांनीं** आपल्या पूर्वजांवर काय काय उपकार केले आ-

हेत व **मराठीराज्यासाठीं** कोण्यापरीचे कष्ट सोशिले आहेत, त्या सर्व गोष्टी मनांत आल्या ह्मणजे त्यांच्या कुलरक्षणार्थ जितकें करावें तितकें थोडेंच, असें वाटतें खरें. पण काय उपयोग? आह्मी पडलों परतंत्र व शत्रूंचे नोकर. तेव्हां अशा स्थितींत कोणतीही एखादी गोष्ट करणें, ह्मणजे खरोखरीच मोठ्या धोक्याचें आहे. बरें, तितकेंही असून स्वराज्यासाठीं आह्मी धाडस करण्यास तयार झालों व त्यांत यश आलें, तथापि पुढें धन्याच्या मनांत त्या गोष्टी वागून त्याचें चीज झाल्यास उपयोग. नाहींपेक्षां, '**तेलही नाहीं व तूपही नाहीं**' अशी अवस्था होऊन आह्मांस कोठेंच तोंड दाखविण्यास जागा नाहींशी होईल. त्यापेक्षां, आहे तें बरें आहे असें समजून आयुष्याचा काळ घालविणें हें चांगलें.

**खंडोपंतः—गणपतराव,** अशा गोष्टी तुह्मी मनांतही आणूं नका. कृतज्ञताबुद्धि ज्याच्या हृदयांत वागत नाहीं, तो मनुष्य कसचा? पशूसारखे बुद्धिहीन प्राणीदेखील उपकार कर्त्यावर प्रेम करितात; मग मनुष्य तर राहूंद्याच. त्यांतून **राजाराम महाराजांसारखे** धनी ह्मणजे तर, केवळ **धर्माचाच** अवतार. त्यांच्या ठिकाणची ती दयादृष्टि, तो त्यांचा सलील स्वभाव, व ती त्यांची पदरच्या लोकांविषयीं कळकळ पाहिली, ह्मणजे शत्रु असला तरी देखील त्याच्या मनांतील वैरभाव आपोआप नाहींसा होईल, अशी त्यांची वृत्ति आहे. तसें नसतें तर **धनाजी, संताजी, मल्हादपंत, रामचंद्रपंत** वगैरे मंडळी त्यांच्यासाठीं इतकी दगदग,

इतका दीर्घ प्रयत्न, व इतके सायास करण्यास कधींही तयार होतेना, व ईश्वरानें त्यांत त्यांना यशही दिलें नसतें. पण, आजपर्यंत सर्व गोष्टी सुयंत्र चालून **राम-राज्याचें** यश बरेंच रंगारूपास आलें आहे. तर, ह्या-वेळीं तें कायम राखून पुढें त्याच्या वृद्धीची इच्छा धा-रण करणें व स्वदेशबांधवांस स्वराज्यसुखाचा लाभ देणें, हें केवळ तुह्मांकडे आहे.

याप्रमाणें भाषण होऊन **खंडोपंतांनीं** त्या उभयतां-बंधूंचें अभिवचन घेतलें, व **महाराजांकडून रत्नागिरी** तालुक्या पैकीं पांच गांवच्या उत्पन्नाची सनद त्यांच्या नांवानें करून देण्याचें अभिवचन दिलें. परंतु, तेवढ्यानें त्या उभयतां बंधूंची आशा तृप्त झाली नाहीं. तेव्हां, प्रभु-कार्यासाठीं मागेंपुढें न पाहतां तो राजनिष्ठ सेवक **दाभो-ळें** येथील स्वतांचें **देशमुखी** उत्पन्न देखील सोडून दे-ण्यास तयार झाला. त्रिवर्गांच्या आणाभाका होऊन **महाराजांस** कोणत्याही रीतीनें पार पाडून देण्याचें **शिर्के** बंधूंनीं कबूल केलें. इतकें होतांच, उजाडण्यापूर्वीं **खंडोपंत** किल्ल्यावर चढले. झालेली सर्व हकीकत त्यांनीं **महाराजांस** कळविली. **खंडोपंतांची** ती स्वा-मिभक्ति, स्वराज्याविषयींची कळकळ व शहाणपणा पाहून **महाराजांस** फार आनंद झाला. आतां, ही सर्व मंडळी किल्ल्यांतून पार पडून कोणत्या रीतीनें **महाराष्ट्रीं** सुरक्षितपणें दाखल झाली, वगैरे वृत्तांत दे-ण्याचें काम पुढील भागावर टाकून हा भाग येथेंच संपवूं.

---



# भाग १७ वा.

---

## उपसंहार.

सततसुकृती भूयाद्भूपः प्रसादितमण्डलः ।

वेणीसंहार

मागील भागीं सांगितल्याप्रमाणें खंडोपंत शिर्क्यां-शीं राजकारण करून किल्ल्यावर येतांच नारो प्रल्हाद ( प्रल्हादपंतांचे चिरंजीव ) व महाडीक यांस मागील सर्व व्यवस्था करावयास सांगून महाराजांनीं निघण्याची तयारी केली. चौदा घटका रात्रीच्या सुमारास महाराज, खंडोपंत, अंताजीपंत वाकनीस, चव्हाण व शितोळे इतकी मंडळी पाळण्यांत बसून गुप्तपणें किल्ल्याखालीं उतरली. शिर्क्यांनीं त्यांस रात्रीची रात्र आपल्या तंबूंत ठेवून घेतलें. दुसरे दिवशीं सूर्योदय होण्यापूर्वींच सर्वांस स्वारांचे वेष देऊन शिकारीस निघण्याच्या मिषानें उभयतां शिर्के बंधु मंडळींसहवर्तमान छावणींतून बाहेर पडले. जिंजीपासून दहावीस कोसपर्यंत मंडळींस पार केल्यावर महाराजांचा निरोप घेऊन शिर्के माघारे फिरले. महाराज मजलदरमजल करीत गुत्तीपर्यंत येतात तों, महाराष्ट्रीं जिंजीच्या वेढ्याचें वर्तमान समजून धनाजी व दाभाडे हे उभयतां सरदार सैन्यासहवर्तमान कर्नाटकीं जाव-

यास निघाले होते, त्यांची व मंडळींची गांठ पडली. तेव्हां, पुढें जिंजीस जाण्याचा बेत रहित करून धनाजी व दाभाडे हेही महाराजांबरोबर महाराष्ट्रीं परतले.

इकडे जिंजी मुक्कामीं झुलफिकारखानानें आपण वचन दिल्याप्रमाणें चार दिवस दम खाऊन पांचवे दिवशीं किल्ल्यावर हल्ला केला. दोनप्रहर पर्यंत किल्ल्यावरील मराठे लोकांनींही दम धरिला होता. परंतु, शेवटीं किल्ल्यास शिडी लावून जेव्हां हजारों मोंगल वर चढले व त्यांनीं कत्तल मांडिली, तेव्हां मराठ्यांनीं हत्यारें खालीं ठेविलीं. किल्लेदार शरण आला, असें पाहून झुलफिकारखानानें लढाई बंद करण्याविषयीं हुकूम दिला. सर्जेखान व दाउदखान यांणीं राजवाड्या सभोंवती चौकी पहारे बसवून प्रथम महाराजांचा तपास केला. परंतु कोठें थांग लागला नाहीं. तेव्हां त्यांनीं किल्ल्यावरील एकंदर प्रमुख प्रमुख लोकांस कैद करून त्यांस माराहाण केली; कित्येकांचे हाल हाल करून प्राण देखील घेतले. परंतु, महाराजांचा पत्ता लागला नाहीं. शेवटीं त्यांस असें समजून आलें कीं, राजाराम, कित्येक सरदार, व मुत्सदी लोक, पूर्वींच किल्ल्याखालीं उतरून महाराष्ट्रीं निघून गेले. हें वर्तमान ऐकून झुलफिकारखानानें वरपांगीं मोठें आश्चर्य वाटलेंसें दर्शविलें, व शत्रु आपल्या हातीं न लागल्या बद्दल दिलगिरी मानिली. इतकें झाल्यावर वाड्यांतील एकंदर कारभारी मंडळीस व बायका पोरांस कैद करून छावणींत नेण्याविषयीं हुकूम देऊन झुलफिका-

**खानानें** मौल्यवान चीजबस्त, जवाहीर, खजिना व हत्ती, घोडे, तोफा वगैरे युद्धोपयोगी सामान आपल्या ताब्यांत घेतलें. याप्रमाणें फारा दिवसांपासून **बादशहाच्या** मनांत असलेला हेतु सिद्धीस जाऊन सन १६९८ च्या जानेवारी महिन्यांत **मोंगलांचें** हिरवें निशाण **जिंजीच्या** तटावर फडकूं लागलें.

**महाराज** वगैरे मंडळी सुखरूपपणें **विशाळगडीं** पोंचून कांहीं दिवस लोटतात, तों **शिर्क्यांनीं जिंजीहून महाराजांचे** कबिले व धाकटे **शिवाजी** यांस **महाराष्ट्रीं** पोंचते केलें. ' **राजारामाच्या** पदरीं चाकरीस असलेल्या आमच्या कित्येक सोयऱ्या धायऱ्यांचीं बायकापोरें आपल्या छावणींत कैद करून आणिलेल्या लोकांमध्यें आहेत. त्यांचे भ्रतार लढाईंत मरण पावले असल्यामुळें, आतां त्यांची अब्रू संभाळून त्यांना त्यांचे त्यांचे घरीं पोंचतें करणें, हें आमचें कर्तव्य आहे. ' अशी **शिर्के** व **मोहिते** या उभयतांनीं त्रिवर्ग **खानांस** भीड घातल्यामुळें, त्यांनीं त्या **मराठे** सरदारांच्या म्हणण्याप्रमाणें कित्येक बायकामुलें त्यांच्या स्वाधीन केलीं. याप्रमाणें बिकट प्रसंग प्राप्त झाला असतां खऱ्या स्वामिभक्तीस जागून मंडळीस पार केलें, व मागून मोठ्या युक्तीनें कबिलेही शत्रूंच्या हातून सोडवून **विशाळगडीं** पोंचविले, याबद्दल **शिर्के** व **मोहिते** या उभयतांचे उपकार मानून त्यांस **महाराजांनीं** मोठ्या देणग्या दिल्या, व कित्येक गांवच्या उत्पन्नाबद्दलच्या सनदा त्यांचे नांवें करून दिल्या. **रामचंद्रपंतांनीं** आ-

पल्यामागें मोठ्या शहाणपणानें, दीर्घोद्योगानें व एकनिष्ठपणें स्वराज्याची सेवा केली, आणि **मोंगलां**साररूया जबरदस्त शत्रूंच्या दाढेंतून बहुतेक किल्ले व मुलूख सोडवून **मराठ्यां**ची सत्ता नांवारूपास आणिली, यामुळें सर्व दौलतीचा कारभार त्यांजकडेसच सोंपवून **महाराज** त्यांच्या सांगण्याप्रमाणें वागूं लागले. **सुवर्णदुर्ग** येथील **आंग्रयानें** वेळोवेळीं साहाय्य देऊन **कोंकणपट्टी**चें रक्षण केलें असल्यामुळें, त्याला **महाराजांनीं** ' **सरखेल** ' असा किताब देऊन त्याचा सन्मान केला. **खंडो बल्लाळानें** तर देशमुखीच्या उत्पन्नाकडे किंवा जिवाकडेही न पहातां मोठालीं राजकारणें करून स्वामिकार्यार्थ देह झिजविला होता. तेव्हां, त्याची ती निःसीम सेवा मनांत आणून त्याला वीस हजारांचें उत्पन्न व कांहीं गांवच्या **नाडगौडी** वतनाबद्दलच्या सनदा करून दिल्या. त्याप्रमाणेंच **परशुरामपंत, संक्राजी नारायण** वगैरे ज्या ज्या मंडळींनीं मोठा पराक्रम गाजवून राज्यवृद्धि केली होती, त्यांस त्यांस त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें इनामें व बक्षिसें देऊन सर्वांस संतुष्ट केलें.

अशारीतीनें **विशाळगडीं** कारभार चालू लागून चोहोंकडे **भोंसले** कुलाचें यश गाजूं लागलें असतां, **राजाराम महाराजांनीं उत्तर हिंदुस्थान**च्या मोहिमेवर जाण्याचें मनांत आणिलें. परंतु, मोहिमेस निघण्यापूर्वी **रामचंद्रपंतांनीं महाराजांस** विनंति केली कीं, **महाराष्ट्रांत मध्यप्रांतीं** कोठेंतरी **मराठ्यांची** गादी स्थापावी, असें बहुत दिवसांपासून मनांत आहे. तर,

त्यास **सातारा** ही जागा सर्व तऱ्हेनें योग्य असल्या-मुळें, तेथें हिंदुपदपादशाहीचें तख्त स्थापून नंतर कोणतेंही कार्य करावें. कारण, तसें झाल्यानें सर्व **महाराष्ट्र**वासी जनास मोठा आनंद होऊन नवीन स्थापन झालेल्या स्वराज्यपदाचा अभिमान प्रत्येक हिंदु ह्मणविणाराचे आंगीं उत्पन्न होईल, व त्याच्या अभिवृध्यर्थ कोणतीही कामगिरी जास्त ईर्षेनें बजावण्याचा उत्साह त्यांच्या ठायीं खेळूं लागेल. ही **रामचंद्रपंतां**ची विनंति **महाराजां**स व पदरच्या एकंदर मंडळींस मान्य होऊन स्वारी **विशाळगडाहून साताऱ्यास** आली. सुमुहूर्त नेमण्यांत येतांच जिकडे तिकडे तयारीची गर्दी उसळली. पदरच्या सर्व मानकरी व सरदार लोकांस पत्रें गेलीं. शहरांत गुढ्या तोरणें उभारून मोठा समारंभ चालू झाला. नेमलेल्या वेळीं दरबार भरवून मोठ्या थाटामाटानें **रामचंद्रपंतांनीं महाराजांस** गादीवर बसविलें आणि त्यांच्यानांवें जयजयकार केला. याप्रमाणें सन १६९८ ह्मणजे शके १६२० बहुधान्यनाम संवत्सरीं **सातारा** येथें **मराठ्यांचें तख्त** स्थापिलें गेलें. हा आनंदाचा सोहाळा आटपल्यावर पुढें **राजाराम महाराज** पंचवीस हजार सैन्यासहवर्तमान **उत्तर हिंदुस्थान**च्या मोहिमेवर निघून गेले.

येथें हा ग्रंथ आटपला. आतां शेवटीं शिष्ट संप्रदायास अनुसरून ह्यापासून आपल्यास काय काय शिकलें पाहिजे, याबद्दल दोन शब्द लिहून वाचकांची रजा घेतों. व्यक्तिमात्र असो, देश असो, किंवा एखादें मोठें

राष्ट्र असो, कालचक्राचा फेरा कोणासही चुकला नाहीं. ह्या जगांत आळीपाळीनें उन्नति किंवा अवनति, वृद्धि किंवा क्षय ह्या स्थितिद्वयांचा अनुभव प्रत्येक प्राणिमात्रासच नव्हे, पण प्रत्येक वस्तुमात्रास देखील घ्यावा लागतो. ह्मणून, चालताकाळ असतांना मदांधपणें वागणें किंवा पडत्याकाळीं, जे ऊर्जित स्थिति पावले असतील, त्यांजकडे पाहून खेदयुक्त मुद्रेनें आतां आपली स्थिति सुधारण्याची मुळींच आशा नाहीं असा सुसकारा टाकून हातपाय गाळणें, हें शहाण्यांचें काम नव्हे. अवनत दशा प्राप्त झाली ह्मणून आपलें तितकें सर्व वाईट व दुसऱ्याचें तेवढें सर्व कांहीं चागलें, अशी मिथ्या कल्पना करून विचारपूर्वक खऱ्याखोट्याचा निर्णय न करितां आळसानें जांभया देत पूर्वजांवर घसरणें, किंवा दूरवर दृष्टि न पोंचवितां आपसांत दुही माजवून शहाणपणाचा टेंभा मिरविणें, यासारखें बालिशपणाचें काम दसरें कोणतेंच नाहीं. तर स्वधर्मनिष्ठा, स्वदेशप्रीति व कर्तव्यजागृति अंतःकरणांत निरंतर वागवून आपण एकदिलानें, खऱ्या कळकळीनें, व धिमेपणानें यत्न करीत गेलें असतां, कितीहीं संकटें कोसळलीं किंवा कसल्याहि दुर्धरावस्थेनें पाठ पुरविली, तरी त्यांतूनही पार नेऊन ते **अखिलब्रह्मांडनायक सच्चिदानंद प्रभु** कृपा करितो.

